॥ श्रीसमर्थ ॥

नवयुगधर्ममाला—खंड दुसरा, पुस्तक दुसरें

# नव-वैदिक-धर्म

अथवा

# आर्यसमाजाचा विवेचक इतिहास

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।

—श्रीमद्भगवद्गीता.

शास्त्रांत असें सांगितले आहेना, मग तेंच खरें.

ग्रंथकार

सदाशिव कृष्ण फडके

प्रथमावृत्ति—सन १९२८

॥ श्रीसमर्थ ॥

श्रीमद्दयानंदांस एकच एक प्रमाणभूत असलेले जे
अपौरुषेय वेद त्यांमधील भासणारे विरोधादि दूर
करून एकवाक्यता करणारीं ब्रह्मसूत्रें ज्यांनीं तयार
केली, साऱ्या जागतिक व्यवहारास आदर्श-
भूत होणारा इतिहास ज्यांनी सांगितला,
साऱ्या जगत्कल्पना ज्यांनी
अगोदरच करून ठेवल्या,
ज्यांनी 'सगुणनिर्गुणाच्या पूर्व-
पश्चिम कक्षा सांधल्या,
त्या चिरंजीव आणि
त्रिकालज्ञ

**भगवान् श्रीवेदव्यास**

यांच्या पुण्यस्मरणार्थ
जनता-जनार्दन सेवेस
नम्रपणें सादर केला असे.

सदाशिव कृष्ण फडके.

# नव-वैदिक-धर्म

अथवा

# आर्यसमाजाचा विवेचक इतिहास

भाग १ ला

# श्रीमद्दयानंद

किंमत दीड रुपया

# पुरस्कार



ह्या ग्रंथाचे लेखक श्रीयुत सदाशिव कृष्ण फडके, वकील (पनवेल) ह्यांनीं ह्या ग्रंथाची हस्तलिखित प्रत छापण्यास देण्यापूर्वी मजकडे पाठविली होती. एका कट्टया सनातनी लेखकाने लिहिलेले स्वामी दयानंदांचे हे अशा प्रकारचें चरित्र आणि आर्यसमाजाचे विवेचक समीक्षण मोठें मनोरंजक झाले आहे. त्याची हस्तलिखित प्रत मी बारकाईनें वाचली आहे आणि त्यावरून मी असे म्हणतो की, आर्यसमाजाच्या कार्यक्षेत्रापासून लेखक फार दूर रहात असून-ही दयानंदांचे चित्र त्यांनी मूळ स्वरूपातच उठावदार रीतीनें रंगाविले आहे; व तसें करताना ग्रंथकारांनी माझ्या कांहीं सूचना मान्य केल्या आहेत याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. या ग्रंथावरून वाचकांस आर्यसमाज आणि त्याचे संस्थापक यांच्याबद्दल महत्त्वाच्या सर्व गोष्टी कळून येतील

ह्या ग्रंथाचे लेखक चाणाक्ष आणि अनुभवी दिसतात पुस्तकाची भाषा सरळ आणि सुबोध आहे. आर्यसमाजी गृहस्थांकडून आपल्याला मिळावी तशी माहिती मिळत नाही, असे ग्रंथकारांनी मला अनेक वेळां कळविलें आहे. पण असें असतांही आर्यसमाजाच्या वाङ्मयावरून त्यांना वस्तुस्थितीची कल्पना बरोबर झालेली दिसते

त्यांच्या लिहिण्याशी आर्यसमाजी गृहस्थांचा कोठे कोठे मतभेद होईल. पण त्यांनी हे विसरतां कामा नये की, हा ग्रंथ एका सनातनी विद्वान लेखकानें सनातन धर्माच्या दृष्टीने लिहिलेला आहे आणि अर्थातच तसा त्यास लिहिण्याचा पूर्ण हक्क आहे. वास्तव अशा परिस्थितीत त्या विद्वान् ग्रंथकाराने या ग्रंथलेखनांत जे विलक्षण यश मिळविलें आहे, त्याबद्दल त्यांचे अभिनंदन केल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं

नम्र निवेदक

ज्वालापुर
ता. १ नवंबर १९२८  **नरदेवशास्त्री वेदतीर्थ,**
व्यवस्थापक, ज्वालापुर **महाविद्यालय.**

  

आपलें आर्यसमाज-विवेचक-इतिहासापैकी पहिलें पुस्तक मी वाचून पाहिलें. आपण यांत श्री० स्वामी दयानंद सरस्वती यांचे जे चरित्र दिलें आहे व त्यांच्या मताचे जें प्रतिपादन केलें आहे ते वाचकांस चांगले मार्गदर्शक होईल असें मला वाटतें.

स्वाध्याय-मंडळ, औंध,
तारीख ? नवंबर १९२८  **श्री. दा सातवळेकर.**

# प्रस्तावना

नव-युग-धर्म ह्या आरंभिलेल्या ग्रंथाचा पहिला खंड गेल्या बलिप्रतिपदेस प्रसिद्ध केला त्या वेळीं त्यापुढील खंडांचेही लिहिणें तयार आहे, अशी कित्येकांची समजूत झाली. परंतु वस्तुस्थिति तशी नव्हती. नव युग धर्म ह्या समग्र ग्रंथाची रूपरेषा अगोदर आखून ठेविली होती खरी, पण त्या ग्रंथाचा पहिला खंड कितपत विद्वन्मान्य होतो आणि त्यास लोकाश्रय कितपत मिळतो याचा अगोदर कांहींच अंदाज नसल्यामुळें दुसरा खंड लिहिण्यास घेणें मनांतच येईना. शिवाय त्यास जरूर असणारा वेळही मिळाला नाहीं. पण त्यानंतर पहिल्या खंडावर विद्वानांनीं आपल्या उदार बुद्धीनें मान्यतेचा छाप मारला. इतकेंच नव्हे तर या पुढील भागही लवकरच प्रसिद्ध व्हावेत अशीही आपली सदिच्छा प्रदर्शित केली. तेव्हां श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य, महात्मा गांधी, प्रो॰ पाठकशास्त्री, प्रो॰ रानडे, श्रीमंत पंतप्रतिनिधीसाहेब, श्री॰ तात्यासाहेब केळकर अशा अनेक श्रेष्ठ पुरुषांची ही सदिच्छा माझ्या हातून कशी पुरी होईल हा एक मोठीच विवंचना उत्पन्न झाली.

लहान मुलाला आईनें कौतुकानें कडेवर घ्यावें, त्याप्रमाणें माझ्यासारख्या अनभ्यस्ताच्या ह्या पहिल्याच प्रयास विद्वानांनीं जें डोक्यावर उचलून धरलें, ते थोरांच्या औदार्यबुद्धीस साजेसेंच आलें. पण केवळ कडेवर घेतल्यानेच ज्याप्रमाणें मुलाची भूक शमत नाहीं त्याप्रमाणें केवळ विद्वानांच्या पसंतीनेंच पुढील खंड कसा प्रसिद्ध करावा हा प्रश्न सुटण्यासारखा नव्हता. प्रपंचाच्या अनेक व्यवधानें आणि विवंचना ह्या संभाळून ग्रंथ तयार करण्यास वेळ काढून आणावा, आणि त्यांतही मोठ्या शिकस्तीनें तो तयार केलाच तरी ग्रंथप्रकाशनास लागणाऱ्या खर्चाची व्यवस्था कशी व्हावी, हे दोन मोठेच प्रश्न होते. पैकीं पहिला प्रश्न जरी कांहींसा माझ्याच स्वाधीनचा असला तरी दुसरा प्रश्न तितका माझ्या आटोक्यांतील नसल्यामुळें तो सुटणें पहिल्या खंडास मिळणाऱ्या लोकाश्रयावर अवलंबून होतें. त्याही बाबतींत मुंबई सरकारनें प्रथम खंडाचे चार भाग शाळांच्या वाचनालयांकरितां मंजूर केले, तसेंच इंदूरच्या ग्रंथोत्तेजक मंडळानें शंभर व ग्वाल्हेरसरकारनीं दीडशें रुपये उत्तेजनादाखल दिले व अशा रीतीनें त्यांनीं खुद्द महाराष्ट्रांतील संस्थानांवरही आघाडी मारली. ज्या प्रांतांतील मुख्य भाषाही मराठी नाहीं, अशा दूरच्या इंदूर व ग्वाल्हेर संस्थानांतून आलेल्या ह्या प्रोत्साहनाबद्दल त्यांचे आभार मानावे

तेवढे थोडेच आहेत अशा प्रकारें शाब्दिक आणि सांपत्तिक प्रोत्साहन मिळाल्यामुळें समग्र ग्रंथ पुरा करून प्रसिद्ध करण्याचें नैतिक वचन जास्तच जाणवूं लागलें.

सामान्य लोकाश्रयासंबंधीं मात्र जो फार निराशाजनक अनुभव आला तो वस्तुस्थितिनिदर्शक म्हणून येथें नमूद करणे वावगे होणार नाहीं मराठी वाचकवर्गांत आज धार्मिक ग्रंथ वाचण्याची प्रवृत्ति थोडीच आहे आणि तीही ज्या वर्गांत आहे तो वर्ग प्राय. पुराणमताभिमानीच असल्यामुळे त्यांत ब्राह्म समाजाचा इतिहास वाचण्याची जिज्ञासा नाहीं श्रीमंत आणि सावकार, वकील आणि डॉक्टर, हा संपन्न वर्ग आपल्या खाजगी व सार्वजनिक स्वरूपाच्या भिन्न विषयांत इतका गुंतलेला आहे कीं, स्वतान्या वाचनाच्या जिज्ञासेने नसली, तरी मराठी साहित्यास मदत करणे हे आपले कर्तव्य आहे, या बुद्धीनेही ग्रंथकारास उत्तेजन देण्याचा विचार त्याच्या मनात येण्यास अवसरच मिळत नाहीं नोकरवर्गांपैकीं वरिष्ठ अमलदारास इंग्रजी दैनिकापलिकडे इकडे तिकडे पाहण्यास सवडच नसते, आणि नोकरांपैकीं कनिष्ठ वर्ग आपला नोकरीचा शीण घालविण्याकरिता नाटकें, कादंबऱ्या वगैरे केवळ करमणुकीचे वाङ्मयच वाचीत असतो आतां प्रोफेसर्स, संपादक वगैरे वाङ्मयप्रेमी विद्वानांचा वर्ग राहिला पण त्यांच्यापुढें इंग्रजी वाङ्मयाचा इतका ग्रंथसंभार रोज नवीन येत असतो कीं, त्यांची ज्ञानार्जनाची रोजकीर्द तारखेवर आणून ठेवणेंच त्यांस मुष्किलीचें होतें मग ब्राह्म-समाजाचा इतिहास मराठींतून वाचण्याचा द्राविडी प्राणायाम ते कोठून करणार ? या सर्व अडचणींपेक्षा अधिक जाचक आणि सर्वव्यापी अशी ही गोष्ट आहे कीं, हिंदुस्थानास उत्तरोत्तर असह्य होत चाललेल्या पारतंत्र्याचे दैन्यांत साहित्यप्रेम करण्याइतकें कोणासच स्वास्थ्य नाहीं ! अशा ह्या स्थितींत तारापूरवाले बुकसेलरकडून नेहमीं नवीन नवीन येणाऱ्या कॅटलॉगाच्याद्वारें इंग्रजी साहित्योद्यानास येत चाललेला वाढता बहार पाहून इंग्रजी व मराठी साहित्यांतील हें सुदीर्घ अंतर कधीं तरी तुटणे शक्य आहे काय असा निराशाजनक विचार मनांत आल्यावाचून रहात नाहीं ! आणि खरोखरच श्रीमंत, संस्थानिक, साहित्योत्तेजक-मंडळें आणि वाचनालयांचे चालक ह्यांनीं नवीन प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथास जरूर ते साहाय्य देण्याचें मनावर न घेतल्यास, नव युग-धर्मच काय, पण याहून अधिक महत्त्वाचेही नवीन ग्रंथ निर्माण होणे अशक्यप्रायच होईल

वरील निरुत्साहक परिस्थितीस प्रो० राजवाडेप्रभृति काहीं टीकाकारांच्या कडक टीकांची जोड मिळाली. त्यासंबंधीं माझें म्हणणें स्वतंत्ररीतीनेंच लोकांपुढें

माडणें योग्य व इष्ट असल्यामुळें पुढे यथावकाश तसे करण्याचें वाचकास आश्वासन देऊन येथें काहीच न लिहिणे बरे याशिवाय आणखी निरनिराळ्या टीकाकार मित्रानी सहानुभूतिपूर्वक अनेक सूचना केल्या आहेत कोणाचे म्हणणे यापुढील खड प्रसिद्ध करण्यापूर्वी ते तत्साप्रदायिकाना दाखवावे, तर कोणी म्हणतात की, महाराष्ट्रधर्म म्हणजे काय किंवा सनातनधर्म तरी कशास म्हणावे हे दाखविण्याची जबाबदारी मजवर असन निष्फळ त्या दृष्टीनेच हा इतिहास मी लिहावा चरित्र, इतिहास आणि टीकात्मक समीक्षण, यांची माडणी निरनिराळी करावी, असे कोणी सुचवितात, तर कोणास सध्या स्वीकारलेली संमिश्र विवेचनाची पद्धतीच अधिक योग्य वाटते कोणास मुख्य विरोधी स्वमताचा धागा सबध विवेचनात 'सूत्रे मणिगणाइव' याप्रमाणे अविरत टिकावयास पाहिजे आहे, तर कोणास स्वमताचे दिग्दर्शनसुद्धा न करता नुसतें इतिहासकथनच अधिक पटतें ! कोणास काहीं ठिकाणीं भाषा कठोर वाटते तर कोणास ती याहूनही अधिक निर्भीड व स्पष्ट हवी ग्रथातील भाषा कोणास वाङमयदृष्ट्या आवडत असली तरी तात्त्विक इतिहासलेखनास ती अयोग्य वाटते, तर कोणी चुरचुरीत चटणीफोडणीशिवाय साधे अन्न रुचकर होत नाही त्याप्रमाणें वाङ्मयाचा आनद देणारी भाषा असल्याशिवाय तुमचा हा एवढा मोठा रूक्ष इतिहासग्रथ वाचणार तरी कोण असा प्रश्न करतात ग्रथात टीकाविषयक झालेल्या सुधारणा वरील आमची टीका कोणास अगदी योग्य वाटते तर कोणी आमच्या सूचना पैकीं एखाददुसरी मानावयाची तरी ब्राह्मणाचे शाकर बनल्याशिवाय गति नाही असा विनोद करतात अशा अनेक मित्रभावाने केलेल्या सूचनाप्रमाणे मराठी पुस्तक चार रुपयाचे घेण्याची वाचकास सवय व सवड नाही, हीहि पण एक अनुल्लिखित पण अनुभवसिद्ध अशी सार्वत्रिक सूचना दिसते

तात्पर्य, माझ्या नव-युग धर्माच्या प्रथम खडासबधीं टीकाकारांनी ज्या अनेक सूचना केल्या आहेत, त्यापैकीं कोणतीही सूचना पूर्णांशीं मान्य केल्यास दुसरी अमान्य केल्यासारखें होऊन त्यापैकींच एखाद्या टीकाकार मित्रास कदाचित दुखावल्यासारखें होणारच शिवाय एखाद्या ग्रथास प्रवृत्त झालेल्या ग्रथकाराचें स्वतत्र व्यक्तित्व असतेच व त्यालाही पूर्ण वाव मिळणे युक्तच होय हा दुसरा खड लिहितांना या कांही अशी परस्पर विरोधी सूचनांपैकी माझ्या शक्यतेप्रमाणें होईल तितक्या मीं यथामति विचारांत घेतल्या आहेत. त्याने माझ्या मित्रांचें सर्वांशीं नाहीं तरी बरेंच समाधान होईल अशी आशा आहे

या ठिकाणीं एक आग्रहाची व प्रेमाची विनंति मात्र माझ्या वाचकांस करावीशी वाटते. ती ही की, कोणत्याही विषयाची चर्चा करू लागले–त्यांत धर्मासारख्या विशेष महत्त्वाच्या व मनुष्याच्या जीविताच्या मूळ आकांक्षाचा विचार करणाऱ्या विषयाचे विवेचन करू लागले–कीं मतभेद हा होणारच किंबहुना असा मतभेद होणे, हेच बुद्धीच्या व विचाराच्या जिवतपणाचे चिन्ह होय जगात निर्माण झालेले निरनिराळे धर्म, त्यातील विविध पथ व त्यातील नानाविध उपपथ हे याचेच निदर्शक आहेत अशा वेळेला या विषयाचा निरनिराळ्या बाजूनी विचार होऊन त्यातून पूर्ण सत्य नाही–कारण ते सर्मर्याद मानवी बुद्धीच्या बाहेरचेंच आहे–तरी शक्य तितके त्या पूर्ण सत्याला प्रतिबिंबित करणारे विचार बाहेर पडावेत अशी सर्वांचीच इच्छा असणार सर्व विवेचक इतिहास किंवा निरनिराळ्या धार्मिक चळवळींची परीक्षणे, याचा मुख्य उद्देश हाच होय या बाबतींत क्वचित् एखाद्या ग्रंथकाराने प्रतिपादलेल्या मताने दुसऱ्या व्यक्तींच्या किंवा समाजाच्या भावना दुखविणे शक्यच नव्हे तर फारच संभवनीय आहे कारण धार्मिक भावनाचा प्रश्न फारच नाजूक असतो पण या बाबतीत वाचकानी आपलें मन अतिशयच उदार ठेवणे जरूर असते आपल्या स्वतःच्या भावना व मतें ही जशी एखाद्या समाजाला किंवा व्यक्तीला प्रिय असणार तशीच दुसऱ्या समाजाची किंवा व्यक्तीची गोष्ट आहे आणि स्वतःची मते मांडण्याचा दोघानाही सारखाच अधिकार व जिव्हाळा असणार या वेळी ग्रंथकारानें प्रतिपादलेलें मत हे त्याचे प्रामाणिक मत आहे की नाही, एवढेच पाहणे जरूर आहे सर्व सुधारलेल्या पाश्चात्य देशातून त्याच उदार वृत्तीचा स्वीकार होत असून तिची जोपासना व संवर्धन करण्याकरिता तेथील विद्वान् लोक नेहमी दक्ष असतात किंबहुना अशा सद्भावनाप्रेरित विचारस्वातंत्र्याशिवाय तत्त्वज्ञानाची किंवा जगाची प्रगति होणे अशक्यच आहे कोणत्याही संस्थेचा किंवा धर्मपंथाचा इतिहास लिहावयाचा म्हणजे तो त्यामधील व्यक्तींचाच इतिहास असल्यामुळें लेखकाच्या प्रामाणिक समजुतीप्रमाणे त्याचें गुणदोषविवेचन करणेंही अपरिहार्य होतें यास्तव वाचकानी कृपा करून असे लक्षात घ्यावे की, माझ्या परिस्थितीतील लेखक इतक्या अनास्थेत एवढ्या अडचणी सहन करून जो हा ग्रंथसभार तयार करण्यास सिद्ध झाला, तो कोणा व्यक्तीची बदनामी करण्याकरितां खचित नव्हे. हे एवढे विस्ताराने येथे लिहिण्याचें कारण इतकेंच कीं, नवयुग-धर्म-मालेपैकीं पहिला खंड प्रसिद्ध झाल्यावर त्याविषयीं कांहीं कांहीं ठिकाणीं अशा तऱ्हेची

अनुदार वृत्ति दाखविली गेली असून कांहीं टीकाकारांची मजल तर लेखकाच्या हेतूविषयींही शंका घेण्यापर्यंत गेली आहे

अशा टीकाकारांपैकी मुख्य, सप्रदायाने किंवा मताने ब्राह्म दिसतात या ब्राह्म टीकाकारासंबधी आज मला येथे काहीच अधिक लिहितां येत नाहीं. कारण नुसती टीका करूनच न थाबतां, माझ्या ब्राह्मसमाजाच्या विवेचक इतिहासाने ब्राह्म स्त्री-पुरुषाची बदनामी झाली असे म्हणून ब्राह्मानी मजवर फौजदारी करण्यापर्यंत मजल नेली असून तें काम हल्ली कोर्टापुढें सुरू आहे यामुळे ह्या बाबतीत विशेष काही लिहिणे योग्य वाटत नाहीं शिवाय टीकेस प्रतिटीका करून वाद वाढवू नये, या बुद्धीने मी आजपर्यंत त्याच्यासंबंधी मौनच स्वीकारलें आणि यापुढेही शक्यतो तीच वृत्ति राखावी असे मी ठरविलें आहे ब्राह्म टीकाकारांनी केलेली टीका कितपत यथार्थ आहे, हे निर्विकार मनाने माझे पुस्तक वाचणारे सुज्ञ वाचक सहज ठरवू शकतील मला असा पूर्ण भरवसा आहे की, ठाकूर आणि भाडारकर, सेन आणि चदावरकर, रॉय आणि रानडे, यांची आत्मनिरीक्षणाची तीव्र दृष्टि ह्या पुढाऱ्यांचे अनुयायी अंगिकारतील तर त्यांस माझ्या पुस्तकात वैषम्य वाटण्यासारखे काहीच आढळणार नाही गेल्या शंभरदीडशे वर्षांत ब्राह्मण आणि त्यानी अनुसरलेला रूढ सनातन हिंदुधर्म, यांवर ज्यानें त्याने वाटेल तसे हल्ले चढवावे आणि कर्मठ, भाविक आणि श्रद्धाळू अशा हिंदूजनतेच्या धर्मभावना नाहक दुखवाव्या, असाच प्रकार एकसारखा सुरू आहे अशा स्थितीत हे टीकाकारपथाचे वाक्प्रहार काहीं अशीं तरी अनाठायी आणि अन्यायाचे आहेत, असे ज्याचे प्रामाणिक मत झालें आहे, त्याने तें निर्भीडपणे जगाच्या पुढे माडून, उलट टीकाकारपथाचे काही दोष जर त्यांच्या पदरात घालण्याचा प्रयत्न केला तर त्याचाही शांतपणे विचार करण्यास त्यानी तयार असले पाहिजे ज्याना पूर्वापार जनरूढीच्या प्रवाहाविरुद्ध सुधारणा घडवून आणावयाची महत्त्वाकाक्षा आहे, त्या धर्मवीरानीं प्रतिपक्षाच्या टीका सहन करण्याइतका धिम्मेपणा धरणें खचितच जरूर आहे

तात्पर्य, मी ज्या सप्रदायाचा विचार आतापर्यंत केला आहे व यापुढें करणार आहे, त्या त्या संप्रदायाच्या वाचकास माझी अशी विनंति आहे की, त्यानीं परमतसहिष्णुता व स्वकीय दोषनिरीक्षणदृष्टि अंगिकारून माझ्या या पुस्तकाकडे पहावें. कारण या एकंदर मालेंतील धार्मिक आणि सामाजिक विषय अत्यंत वादग्रस्त असल्यामुळें त्यांत मतभेद होणे स्वाभाविक आहे आणि सत्यनिर्णयाच्या

दृष्टीनें इष्टही आहे. अशा विवेचक इतिहासात यशापयशाची व सूक्तासूक्ततेची चिकित्सा करताना निर्भीडपणाने होणारें दोषदर्शन हे एकापरी अपरिहार्य असें महत्त्वाचें अंग आहे, हे वर दर्शविलेच आहे श्रीमद्दयानदानीं मतमतातराचा विचार करताना तरी अनेक मतवाद्याचा काय थोडा जोरानें निषेध केला आहे! तशीच टीका त्याच्या मतावर कोणी करू लागल्यास ती निर्विकारपणें ऐकून घेण्याइतका शातपणा आर्यानीही अवश्य ठेवला पाहिजे, अशी अपेक्षा केल्यास ती खाचितच वावगी ठरणार नाहीं

ह्या नववैदिकधर्माचे पहिले दोन भाग मुख्यत्वेंकरून आर्यलेखकाचे आधारेंच लिहिलेले आहेत त्यामुळे त्यात टीकेचा भाग येण्याचा सभव बहुतेक नाहीच पण तिसरा भाग हा केवळ टीकाविषयक मुद्द्याकरिताच अलग केल्यामुळें त्यांत मुख्य विषयच टीका हाच असणार यासाठीं मीं केलेल्या दोषदर्शनात हसक्षीरन्यायानें जें वाचकांस ग्राह्य वाटेल तें घ्यावे, त्याज्य वाटेल तें सोडून द्यावें. पण याच्यापुढें जाऊन लेखकाच्या प्रामाणिक बुद्धीवर निष्कारण बे-भरवसा करण्याइतके अनुदार होऊ नये एवढीच विनंति आहे. याशिवाय मीं केलेल्या विवेचनाचा विचार करून उलट माझ्याच विचार-सरणींतील माझी चूक मला कोणी दाखवून देण्याचा प्रयत्न केल्यास माझ्या लिहिण्याचे श्रम सार्थकी लागल्यासारखे होऊन मी त्या प्राजल टीकाकारांचा ऋणीच होईन. कारण सध्याच्या आपल्या धर्माच्या अवनत स्थितींत, व पाश्चात्य संस्कृतीच्या अभूतपूर्व जबरदस्त धक्क्याने सुरू झालेल्या धर्मविचाराच्या खळ-बळींत, आपल्या प्राचीन धर्माचें, व त्यात सुधारणा करून धर्मसेवा करू पाहणाऱ्या निरनिराळ्या धर्मपथाचें, चिकित्सापूर्वक नीट मनन होऊन काहीं सत्य निर्णीत झाल्यास, तेंच आपल्या धर्माचें, राष्ट्राचे व सस्कृतीचें निश्रेयस साधल्यासारखें होणार आहे. व आधुनिक धार्मिक चळवळीचें चिकित्सापूर्वक विवेचन करण्याचें महत्त्वाचें कार्य जे मीं अगिकारलें, त्यात या महत्तम कार्यात आपल्या अल्प शक्तीप्रमाणें आपणही थोडी पाइकी करावी व या धर्मसेवा-यज्ञात अशभागी होऊन पुनीत व्हावें, एवढाच माझा हेतु आहे.

वास्तविक पूर्व-सकल्पाप्रमाणें [१] प्रार्थनासमाज [२] आर्यसमाज आणि[३] थिऑसफी मिळून नव-युग-धर्ममालेचा दुसरा खड व्हावयाचा होता. परंतु ब्राह्म-प्रार्थना-समाजाच्या मंडळींचीं कलुषित झालेलीं मनें अद्याप निवळलीं नाहींत हें एक, आणि ब्राह्मसमाजाच्या शतसांवत्सरिक उत्सवानिमित्त बरेंच महत्त्वाचें

वाङ्मय प्रसिद्ध होण्याचा संभव आहे हें दुसरें, अशा कारणांमुळें प्रार्थना-समाजाचा इतिहास कांहीं दिवस मागें ठेवणे भाग पडलें. शिवाय माझा ब्राह्मांचा इतिहास आणि रा० वैद्यांचा प्रार्थनासमाजाचा इतिहास, ही दोन विस्तृत पुस्तके नुकतीच प्रसिद्ध झाली असता, त्यात आणखी माझ्या नवीन प्रार्थनासमाजाच्या इतिहासाची गर्दी न करणे हेही ठीक दिसले तेव्हां दुसऱ्या खंडाची वरीलप्रमाणे तीन वेगळीं पुस्तकें योजून त्यांपैकीं दुसरे पुस्तक अगोदर प्रसिद्ध करण्यास घेतले पण तेही द्रव्याभावीं एकदम छापणे अशक्य झाले! तेव्हा कित्येकांच्या सूचनाप्रमाणे ह्या पुस्तकाचे [१] श्रीमद्दयानद, [२] आर्यसमाज व [३] आर्यमत समीक्षा, असे आणखी तीन भाग करून ते स्वतंत्र पुस्तकरूपांनीं प्रसिद्ध करण्याचें ठरविले त्यांतील श्रीमद्दयानंद हा पहिला भाग आज प्रसिद्ध होत आहे द्रव्यादि साधनाची व परिस्थितीची अनुकूलता मिळाल्यास पुढील भाग आणि खड यथाकाल प्रसिद्ध होतीलच. नाहींपेक्षां ही वाङ्मयसेवा निरुपायानें येथेच मोठ्या कष्टानें थांबवावी लागेल! वस्तुतः पहिल्या खंडास झालेला खर्च आणि त्याची झालेली विक्री ही लक्षात घेतां हा भागही प्रसिद्ध करणे मला अशक्यच होते! पण अशा वेळीं माझे सन्मित्र श्री० आत्माराम महादेव आटवणे, एम् एल् सी. आणि श्री० अप्पासाहेब गोखले, 'विजय' प्रेसचे मालक यांनीं मला विशेष धीर दिला म्हणूनच हें साहस पुरें करणें शक्य झालें याबद्दल मी ह्या उभयतांचा फार आभारी आहें. पुढें मागें शक्य झाल्यास त्यांच्याच साह्यानें कदाचित् दुसऱ्या खंडाच्या दुसऱ्या पुस्तकाचे पुढील दोन भागही वाचकाच्या हातीं पडतील. याहून अधिक तें आज कोणाच्या बलावर बोलावें?

एकंदर ग्रंथाच्या **'नव-युग-धर्म'** या नावाबद्दल विरोधी मतें दिसून आलीं. आटोपशीरपणा या एका गुणास्तव मीं तें नांव पसत केले होतें व तें आता नव-युग-धर्ममाला या रूपातरांत कायमचेंच झाले, हे उघड आहे. या पुढील खडांचीं नांवें अधिक सार्थ करण्यासाठीं आर्यसमाजाच्या इतिहासाला नव युग-धर्ममालेपैकीं **नव-वैदिक-धर्म** असें नांव दिलें आहे. या नव-वैदिकधर्म पुस्तकांतील पहिल्या भागांत श्रीमद्दयानंद यांचें संक्षिप्त चरित्र, त्यांचीं मतें आणि कामगिरी इतकाच विषय आहे, दुसऱ्या भागांत दयानंदांच्या अनुयायांचे विचार आणि त्यांच्या चळवळी हा विषय येईल आणि तिसऱ्या भागांत सनातन हिंदुधर्माच्या दृष्टीनें आर्यमताची समीक्षा होईल. अशा रीतीनें 'नव-वैदिक-धर्म' या सबंध ग्रंथांत आर्यसमाजाच्या एकंदर

चळवळीचें विवेचन येणार आहे. याप्रमाणें पुस्तकाचे स्वतंत्र विभाग करून तुकडे पाडल्यानें ह्या ग्रंथाचें महत्त्व आणि उपयुक्तता एकेपरी कमी होत आहे हें खरें, पण दुसऱ्या अनेक दृष्टींनी तसेंच करणे मला निरुपायाने भाग पडलें आहे. ह्या पुस्तकाचे तिन्ही भाग निरनिराळे विकत घेणे वाचकासही एकदम जड वाटणार नाही, अशी अपेक्षा आहे

ह्या ग्रंथ लिहिताना मला ज्या ग्रंथाचा विशेष उपयोग झाला त्या मुख्य ग्रंथांची स्मरणाने यादी करून ती प्रत्येक भागास जोडली आहे त्या ग्रंथाचा लाभ मला घेता आल्यामुळे मी त्या ग्रंथकाराचा फार आभारी आहे जी माहिती मला ग्रंथातून मिळाली नाही, ती मिळविण्यासाठी मी विस्तृत प्रश्नावली तयार करून त्या आर्यसमाजाच्या दहापंधरा पुढाऱ्याकडे आणि विद्वानाकडे पाठविल्या पण त्यांच्या कार्यबाहुल्यामुळे म्हणा, किंवा माझ्या अनोळखीपणामुळे म्हणा, त्यांच्यापैकी कित्येकाकडून त्यांची पोचही आली नाही! कित्येकानी पोच दिली, पण प्रश्नाप्रमाणे माहिती देण्यास वेळ नाही असे कळविले पण कोल्हापुरच्या राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपल डॉ० बाळकृष्ण, आग्र्याच्या 'आर्यमित्राचे' संपादक, तसेच काशी येथील दयानंद हायस्कुलचे मुख्याध्यापक श्री० विष्णु भास्कर केळकर, एम् ए यांनी मात्र या पुढील भागास उपयोगी अशी काहीं माहिती प्रश्नोत्तरद्वारे कळविली याशिवाय इतर काही आर्य बंधु भगिनींनी आर्य-विद्यालयाचे व दलितोद्धार सभेचे रिपोर्ट पाठविले तसेंच एका सद्गृहस्थानें जातपाततोडक मंडळासंबंधी माहिती दिली याबद्दल मी या सर्वांचा फार आभारी आहे पण ह्या सर्वांपेक्षा ज्याचा मी अत्यंत कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला पाहिजे ते ज्वालापुर महाविद्यालयाचे एक चालक व आर्यसमाजाचे इतिहासकार श्री० नरदेवशास्त्री वेदतीर्थ हे होत त्यांनी प्रथमपासून आस्थापूर्वक पत्रद्वारे जी माहिती देता येणे शक्य होतें ती दिली, इतकेंच नव्हे तर माझी ह्या प्रथम भागाची हस्तलिखित प्रत बहुतेक सर्व नजरेखाली घातली, काही सूचनाही केल्या, आणि अखेर ह्या ग्रंथाच्या पुरस्कारादाखल आपला लेख पाठवून मला उपकृत केलें, याबद्दल त्यांचे मी आभार मानावे तितके थोडेंच होणार आहेत

हे सर्व इतके सविस्तर लिहिण्याचें कारण इतकेंच कीं, आर्यसमाजासंबधीं मिळविता येईल ती खरी माहिती मिळविण्याचा मी माझ्या सामर्थ्यानुसार शक्य तो सर्व प्रयत्न केला, त्यांत कसूर केली नाहीं, एवढेंच नम्रपणे वाचकांस कळविण्याचे आहे. असें असतांही मी स्वतः आर्यसमाजी नाहीं, किंवा कोणीही

आर्यसमाजी गृहस्थ माझे परिचित नाहींत, तसेंच आर्यसमाजाच्या कार्यक्षेत्रापासून मी अति दूर असून त्याचे वाङ्मय मराठींत फारच थोडे प्रसिद्ध आहे, अशा अनेक कारणास्तव माझ्या लिहिण्यांत न जाणता काही गैरसमजाचे प्रकार होण्याचा कदाचित् संभव आहे. तरी असे दोष कोठें आढळल्यास वाचकानी कृपा करून मला ते दाखवावे व थोर मनाने मला त्याबद्दल क्षमा करावी अशी विनति आहे.

अनेक कारणानी उत्पन्न झालेल्या मनाच्या व्यग्र स्थितींत ह्या ग्रंथाचे लिखाण फारच गर्दीने झाले अशा स्थितीत माझे सन्माननीय मित्र वे० शा० स० विनायक शास्त्री जोशी आणि त्याचप्रमाणे माझे जामात चि० रा० प्रभाकर वासुदेव बापट, एम् ए यानी बहुतेक सर्व हस्तलिखित प्रत आपल्या नजरेखालून घालून जरूर त्या ठिकाणी दुरुस्त्या सुचविल्या, म्हणूनच हे पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याचे साहस मला करता आले याबद्दल कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणे जरूर आहे तसेंच माझ्या प्रथम खंडास श्रीशंकराचार्यांच्या व ह्या खंडास श्रीव्यास महर्षींच्या चित्रांचे ब्लॉक्स वे० शा० स० विष्णुशास्त्री बापट यानी दिले, याबद्दल मी त्याचा फार आभारी आहे.

श्रीमज्जगद्गुरु आद्य शंकराचार्य हे सनातनी ब्राह्मसस्थापक आणि राममोहनराय ह्या उभयतासही मान्य असल्यामुळे पहिला खंड त्यास अर्पण केला आता श्रीमद्दयानंदास शांकरमत मान्य नाहीं तरी वेदांतसूत्रकार व महाभारतकार भगवान् श्री० व्यासमुनी हे उभयपक्षी मान्यवर असे आप्तपुरुष असल्यामुळें भगवान् श्रीमद्व्यासांच्या चरणी **नव-वैदिकधर्माची** ही अल्पकृति अर्पण केली आहे. ती त्यास संतोषदायक होवो.

अखेर ज्या जगन्नियंत्याने हा ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा केली त्यास माझी सेवा रुचली असल्यास तोच वाचकास उदारबुद्धि देऊन मला ह्या वाङ्मयसेवेसंबंधी कृतसंकल्प पुरा करण्याचे सामर्थ्य देवो, अशी त्याची अनन्यभावाने प्रार्थना करून हा लांबलेला प्रस्तावनालेख पुरा करतो

पनवेल,
बलिप्रतिपदा, शके १८५०

**सदाशिव कृष्ण फडके**

---

# अनुक्रमणिका

**प्रकरण पहिलें** पृष्ठें १ ते २७

**भूमिका:**—प्रास्ताविक—कार्यकारण भाव—परिस्थितीतील बदल—विपन्न परिस्थिति—ब्राह्मणविद्वेष—ब्राह्मणाचे वर्चस्व—जातिब्राह्मणाचा पोकळ अधिकार—आर्यधर्मोत्पत्तीची मीमासा—दयानद अवतारी पुरुष होते—धर्मग्लानि आणि अवतारवाद—समाजसुधारणेची मीमांसा—विरोधाभास—मिशनऱ्यांची कारवाई व हिंदूंची भूल—राज्यक्रांतीचे परिणाम—दयानंदांवरील प्रांतिक-संस्कार व त्यांच्या धर्ममतातील विरोधाभास—भूतकाळाचे सिंहावलोकन—तत्कालीन धर्मसुधारकापुढील प्रश्न—तत्त्वज्ञानाचे नित्यत्व व तत्त्वज्ञांची दृष्टि—दयानदाचे परिस्थित्यवलोकन, हिंदुसमाजाची निकृष्टावस्था—दयानदांचा स्वग्रहवेध, उत्तरभारतास लागलेले दुदैवाचें ग्रहण—श्रेय आणि प्रेय; दयानदाची मनःप्रवृत्ति—हिंदुस्तानातील सामान्य जनतेची मनःस्थिति—दयानंदांच्या वृत्तिसंकोचाची मीमासा—दयानदांची भूमिका—दयानंदांची भूमिका; जुन्यानव्याचा गैरमेळ—नव्या जुन्याचा मिलाफ—ऐहिक षडैश्वर्याकरितां दयानदांचे प्रयत्न—विषयोपन्यास.

**प्रकरण दुसरें** पृष्ठें २८–३४

**मूळशंकराचे दयानंद:**—दयानंदाचे मातापितर—बालपणींचा अभ्यास—बुद्धिभेद—आर्यसमाजोत्पत्तीचे बीजभूत कारण—बुद्धिभेदाचा परिणाम—वैराग्याचा उद्भव—गृहत्याग—शुद्धचैतन्याचें [दयानंदांचें ब्रह्मचर्याश्रमातील नांव] परिभ्रमण—चतुर्थाश्रमप्रवेश—दयानंदांची दीर्घतपस्या व त्यांची सत्यप्रीति—सद्गुरूचा शोध.

**प्रकरण तिसरें** पृष्ठें ३५–४२

**स्वामी विरजानंदसरस्वति:**—दयानंदांचें तीर्थाटण—स्वामी विरजानदांची भेट—विरजानदांची तपश्चर्या, वादाची हौस व तामसी वृत्ति—

गुरुशिष्याची भेट व प्रथमोपदेश—दयानंदाची निष्ठा व त्यांचें कडक ब्रह्म चर्य—गुरुजींची कडक शिस्त व दयानंदाची निस्सीम गुरुभक्ति—दयानंदाची गुरुदक्षिणा व शेवटचा गुरुपदेश, विरजानंदाचें निर्याण

**प्रकरण चवथें** **पृष्ठें ४३–५५**

**दिग्विजयारंभः**—दिग्विजयाची रूपरेषा—परकीयाचे धार्मिक हल्ले-हिंदुधर्माचा जजिरा, दयानंदाची सामुग्री—शास्त्रार्थांना सुरवात—भागवतावरील टीका—वैष्णव-शैव मतविरोध—राजाश्रयाबद्दल खटपट, गुरुजींची भेट—हरिद्वारचा मेळा, भोळा भाविक व चिकित्सक दयानंद याच्या विरोधी दृष्टि—लोकशिक्षणाच्या उद्योगास आरंभ—पाखंडखंडन, वेदमंत्राचा चिकित्सक दृष्टीनें अर्थ—तपःसामर्थ्याची आवश्यकता, स्वामींचा सर्वस्वत्याग—पुढील मार्गाचें चिंतन, शूद्रान्नभक्षण-तीव्र मताभिमान—सारेंच धर्मखुळें-स्वामींची शिकवण, संस्कारप्रीति—प्रतिपक्षावर छाप टाकण्याचें कौशल्य—मूर्तिपूजेवरील कठोर टीकेचा लोकांवर परिणाम—ब्राह्मणांचा विरोध, प्राणघाताचा प्रयत्न, स्वामींची पुण्याई—पाठशाळांचा उदयास्त

**प्रकरण पांचवें** **पृष्ठें ५६–७७**

**शास्त्रार्थाच्या चकमकीः**—पहिल्याच शास्त्रार्थाचा फार्स—गप्पाष्टक-सत्याष्टकाचा जाहीरनामा—शास्त्रार्थाचें पोरखेळ, आर्यप्रथातील एकतर्फीपणा—कानपूरचा शास्त्रार्थ—काशीचा शास्त्रार्थ, दयानंदाचा आत्मविश्वास—म० रामस्वामी मिश्र याजबरोबरचा शास्त्रार्थ, सनातनी पंडितांचें आश्चर्यकारक अज्ञान—याबद्दल प० नरदेवशास्त्री व स्वतः दयानंद याचा खुलासा—काशीचा शास्त्रार्थ, काशीचे पंडित पळता पाय घेतात—काशीशास्त्रार्थाचें चोपडें; मूर्तिपूजेचें वेदप्रामाण्य, धर्माधर्मलक्षण, पूर्ति, पुराण, इ० वेदांतील शब्दाचे अर्थ—काशीच्या शास्त्रार्थाचें महत्त्व—स्वामींच्या अब्रूवरील व प्राणावरील प्रसंग—ब्राह्मसमाजास भेट—इतर प्रांतांतील प्रवास-मुंबईचा शास्त्रार्थ, कमलनयनाचार्यांचा मुग्धपणा, दयानंदाचा विजय—महाराष्ट्र व गुजराथेंतील दौरा, पुण्याच्या मिरवणुकी.

**प्रकरण सहावें** **पृष्ठें ७८–९१**

**धर्मसंवादः**—लखनौच्या संवादांतील महत्त्वाचे मुद्दे—राजेरजवाडे व धर्मपंथाभिमानी याजबरोबर सहकारितेचा प्रयत्न—चांदपूरचा हिंदु-इस्लाम

ख्रिश्चनांचा तिरंगी सामना, ईश्वरानें सृष्टि का, कशातून व केव्हा निर्माण केली, मुक्ति म्हणजे काय व ती कशी प्राप्त होते—पौराणिक पंडितांचे प्रश्न व त्यांचीं उत्तरें—काशीला आर्यसमाजाची स्थापना—पाश्चात्यांची विद्याभिरुचि—दयानंदाची निर्भीड व निर्भय वृत्ति—दयानंदाची लोकसंग्राहक बुद्धि—वैदिक धर्मप्रसारार्थ अविश्रांत श्रम, आर्यसमाजोद्यान

**प्रकरण सातवें** **पृष्ठें ९२–१०६**

**आर्यसमाजः**—हिंदूंचा फटफटीत भालप्रदेश—मुंबई येथे पहिल्या आर्यसमाजाची स्थापना—पहिली समाजनियमावली—लोकसंग्राहक प्रयत्न, मुंबई आर्यसमाजाच्या नियमांची सुधारणा—दयानंदाची व्यापकदृष्टि, मूळराज प्रभृति लोकांची व्यापकदृष्टि, व्यापक दृष्टींतील दोष—लाहोरचा आर्यसमाज, स्वामींचा स्वमहतीबद्दल तिटकारा—विद्वान् मंडळींवर दयानंदाची छाप—संन्यासाची दयानंदाची महत्त्वाकांक्षा—उदेपुरात आर्यसमाज, परोपकारिणी सभा—जोधपुरात इतिहासाची पुनरावृत्ति, स्वामींवर विषप्रयोग—दयानंदाचें निर्याण—और्ध्वदेहिक विधि

**प्रकरण आठवें** **पृष्ठें १०७–१२१**

**आर्यावर्तांतील मतमतांतरें:**—उपन्यास, वैदिक धर्म हाच विश्वधर्म होण्यास योग्य आहे—प्राचीन आर्यावर्तांचें सार्वभौमत्व, ब्राह्मणाच्या पोपलीलामुळें देशाचा अधःपात—"ब्राह्मण" ही शिवी झाली आहे—धर्माचा अपकर्ष, शाक्तमताचा प्रसार, जैनमतखंडन, लिंगपूजा—वैष्णवादि पंथ, खाकी साधु—कबीरपंथ—गुरुनानक आणि शीख पंथ—दादूपंथी, रामसनेही, कुंडापंथी वगैरे कुकर्मी पंथ—वाममार्गी गोकुलियांच्या लीला—मध्व, लिंगांकित पंथ—ब्राह्म व प्रार्थनासमाज यांतील दोष, भलत्याच गोष्टींत इंग्लिशांची अनुकृति, असंबद्ध ब्राह्ममतें—थिऑसफीबद्दल दयानंदाचें मौन—थिऑसफिकल सोसायटी व दयानंद यांचा संबंध व बेबनाव—जिज्ञासूनें काय करावें ?

**प्रकरण नववें** **पृष्ठें १२२–१३४**

**धार्मिक थोतांडें:**—थोतांडपंचक—अशास्त्रीय मंत्रमाहात्म्य व फलज्योतिष—अज्ञानमूलक नामजप—"तज्जपस्तदर्थ भावनम्"—तांत्रिकांचें स्वैराचरण मनुस्मृतींतील प्रक्षिप्त वचनें—वेदानुकूल तीर्थक्षेत्रें,

गयाश्राद्धादि विधि-भस्मरुद्राक्षादिधारणाचा फोलपणा, उपवासादि पौराणिक गबाळ-देवपूजा, देव-देवता, ईशावताराची अनवश्यकता, विभूतिपूजा-मूर्तिपूजा-व्यापक परमात्म्याचें अनात्म पदार्थाच्या ठिकाणीं आवाहन कसलें ?-मूर्तिपूजेचा वैदिक निषेध-मूर्तिपूजा हे ज्ञानप्राप्तीचें साधन नव्हे; ध्यानाचें खरें स्वरूप-मूर्तिपूजेचे दुष्परिणाम, देवस्थानाची दुर्दशा-मूर्तिपूजकानीं चालविलेली विटंबना

**प्रकरण दहावें** पृष्ठे १३५-१४६

**दयानंदांचा तत्त्वविवेकः**—दयानंदाचे ग्रंथ-"सत्यार्थप्रकाशाची" रूपरेषा, त्याचें आर्यसमाजात महत्त्व-जीव आणि परमेश्वर-महावाक्यें अद्वैतपर नाहीत-जीव आणि ब्रह्म हे भिन्न आहेत-परमेश्वर सगुण आहे आणि निर्गुणही आहे-सृष्ट्युत्पत्ति, जगदुत्पत्तीचीं कारणें तीन आहेत-कार्यकारणमीमांसा, ब्रह्म, जीव आणि प्रकृति हीं नित्य आहेत-षड्दर्शन-समन्वय-सृष्ट्युत्पत्तिकथन-आर्येतर प्रजा, मानवी सृष्टि-कर्मोपासना आणि ज्ञान-बंधमोक्ष हे नैमित्तिक व अनित्य आहेत-मुक्तिमीमांसा-कर्म आणि फल-विवर्तवाद खोटा आहे-अन्तःकरणोपाधीनें ब्रह्मच जीव होतो हें चूक आहे-मिथ्यावाद-वेदान्त्यास खरा अर्थ कळला नाहीं.

**प्रकरण अकरावें** पृष्ठे १४७-१६०

**दयानंदांचें मंतव्यः**—दयानंदाची प्रस्तावना-मंतव्यांचीं सूत्रें-मंतव्याची सुधारून वाढविलेली आवृत्ति, आर्योद्देश रत्नमाला-आर्यधर्माचें प्रयोजन

**प्रकरण बारावें** पृष्ठे-१६१-१७१

**वेदविचारः**—भाष्यभूमिकेचे मंगलाचरण-वेदाची उत्पत्ति-वेदांचें नित्यत्व व प्रामाण्य-वेदविभाग-विज्ञान आणि कर्म-वैदिकमंत्र आणि देवता-मूर्त आणि अमूर्त देव, 'ब्राह्मण' विभाग-संहिता व ब्राह्मण यांतील प्रामाण्यभेद-वेदांत सर्व शास्त्रें बीजरूपानें आहेत, वेदांत भौतिक विज्ञान-दयानंदांना प्रमाण असलेले ग्रंथ-पौराणिक कथांचा यौगिक पद्धतीनें अर्थ-वेदार्थयत्न-वेदार्थांतील चुका व त्या कशा टाळाव्या.

**प्रकरण तेरावें** पृष्ठे १७२-१९१

**प्रारंभिक संस्कारः**—आर्यांच्या नित्यनैमित्तिक कर्मांचें महत्त्व-कर्मांतील दृष्टिभेदाचे ठळक मुद्दे-विषयाची मांडणी-आर्याभिविनय, स्वस्ति-

वाचन आणि शांतिपाठ–सर्व संस्कारांतील सामान्य विधि–गर्भाधान–पुंसवन–सीमन्तोन्नयन–जातकर्म–नामकरण–निष्क्रमण–अन्नप्राशन–चूडाकर्म–कर्णवेध

**प्रकरण चौदावें** पृष्ठ १९२–२१४

**आश्रमसंस्कारः**—सामान्य विचार–उपनयन–वेदारंभ–शिक्षण–पंचविध परीक्षा–अध्ययन–अध्यापन–ग्रंथ प्रामाण्य–वेदाध्ययनाचा अधिकार–समावर्तन–विवाहसंस्कार–वानप्रस्थ संस्कार–संन्यास–अंत्येष्टि

**प्रकरण पंधरावें** पृष्ठ २१५–२३३

**गृहाश्रमः**—स्त्रियांचे कांहीं धर्म–पुनर्विवाह व नियोग–पुरुषाचे कांहीं धर्म–रोटी-बेटी-व्यवहार–वर्णव्यवस्था–वर्णांचे गुणकर्मस्वभाव–प्राचीन गृहाश्रम–शालाकर्मविधि–प्राचीन दिनचर्या–नित्य कर्मे–पंचमहायज्ञ–संध्योपासना–संध्या रहस्य–अभ्युदयवाद–मन निश्चल की चंचल–समाहित आणि स्तब्ध–अग्निहोत्र–बलि वैश्वदेव–अतिथियज्ञ–पितृयज्ञ–नैमित्तिक कर्मे

**प्रकरण सोळावें** पृष्ठ–२३४–२५४

**व्यक्तिमाहात्म्य आणि कार्यः**—आरंभिक विचार-व्यक्तिविषयक टीका-रामदास आणि दयानंद–तप, बल आणि तलफ–साम्य वैषम्य–साधनमार्गांत भिन्नता–निराशेची मीमांसा–दोघांचे प्रेरक भिन्न–त्यांचे मार्गही भिन्न–शुद्धिसंघटन–यशाची गुरुकिल्ली–दयानंदाची बौद्धिक कसरत–राष्ट्रीय सभेची चतुःसूत्रि–महात्मा गांधींचे दंडक–पुढची धोरणें–राष्ट्रीय बाण्याचे विचार–दयानंदाच्या मतव्यातील मुग्धपणा–वैदिक मतानुयायी मुसलमान–मानवी प्रेम आणि राष्ट्रीय प्रेम–विश्वव्यापी धर्म–त्रिविध टीकाकार–लोकोत्तर पुरुष–मतभेदाचें बीज–वादाचे मुद्दे–दयानंदांनीं काय केले–आर्य पुढाऱ्याचे कबूल जाब–मतभेदाचे मुद्दे–विकारी टीका–प्रत्युत्तराचा हक्क–दयानंदाचे अनुयायी–संप्रदायाची व्यवस्था–प्रेरक आणि अनुयायी–दयानंदांची महत्त्वाकांक्षा–दोन मृत्युपत्रांतील फरक–आर्य पुढारी–पं. गुरुदत्त–आर्यधर्माचें रहस्य

**कालानुक्रमणिका** २५५

**आधारग्रंथांची यादी** पृष्ठ २५६

---



श्रीमद्दयानंद सरस्वति

जन्म—इ. सन १८२४ ]　　[ निर्याण—इ. सन १८८३

॥ श्रीसमर्थ ॥

# प्रकरण पहिलें

# भूमिका

**प्रियं मा कृणु देवेषु प्रियं राजसु मा कृणु।**
**प्रियं सर्वस्य पश्यत उत शूद्र उतार्ये ॥ १ ॥**
**उत्तिष्ठ ब्राह्मणस्पते देवान् यज्ञेन बोधय।**
**आयुः प्राणं प्रजां पशून् कीर्तिं यजमानं च वर्धय ॥ २ ॥**

—अथर्व०, का १९, सूत्र ६२।६३ *

हिंदुस्थानातील आधुनिक धार्मिक चळवळींत आर्यसमाज ही संस्था बऱ्याच महत्त्वाची आहे आणि अलीकडे शुद्धिचळवळ जोरात आल्यापासून तर ती लोकांच्या नजरेसमोर अधिकाधिकच येत आहे यास्तव यापुढे त्या संस्थेचा सविस्तर विचार करण्याचे योजले आहे ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज ह्या संस्था ज्या भूमीत निर्माण झाल्या त्या भूमिकेशी त्या संस्थांचा ज्या तऱ्हेचा कार्यकारणभाव दिसतो, तो तसाच आर्यसमाज ह्या संस्थेस लावता येत नाही इंद्राच्या नंदनवनातील पारिजातक भगवान् श्रीकृष्णांनी रुक्मिणीच्या दारी लावून त्याची फुले सत्यभामेचे आंगणात पाडावी, अशी काही विचित्र घटना आर्यसमाज ह्या संस्थेच्या जन्मकर्मांची दिसते. आर्यसमाजाचे आद्य-संस्थापक **स्वामी दयानंद** यांचा जन्म काठेवाडात मोरवी संस्थानात टंकारा येथे, त्यांचा दयानंद सरस्वती ह्या आश्रमांतरात अवतार नर्मदेच्या काठीं चलोदर येथे, त्यांची अखेरची गुरुदीक्षा मथुरेत, त्यांच्या पहिल्या समाजाची स्थापना मुंबईस, त्यांची अखेरची आशा उदेपुरात, तर निर्याण अज-

---

हे प्रभो, मी ब्राह्मणांना प्रिय होईन, क्षत्रिय समाजात आणि वैश्य वर्गात मी लोकप्रीति संपादान, इतकेंच नव्हे तर सर्व प्राणिमात्रांना मी हवासा वाटेन असे कर हे ज्ञानाचे स्वामिन, आमची उन्नति कर सत्कर्मांच्या द्वारे विद्वानांत जागृति होऊं दे त्याचप्रमाणे आयु, जीवन, संतति, पशुपालन, कीर्ति आणि सत्कर्मनिष्ठाचें बल यांची वृद्धि होवो

मिरात व त्याचा जास्त सचार पजाबापेक्षाही सयुक्त प्रातात तर त्याच्या साप्रदायिकाचा मुख्य जोर पजाबात असा विलक्षण योगायोग दिसतो

श्रीकृष्ण चरित्रातील महत्त्वाचा भाग ज्या प्रातात घडून आला, सुदामदेव, नरसी मेहता अशा सगुण भक्तानी जी भूमि पावन केली, त्या भूमीतील कोणते सस्कार ह्या भागवतपुराणविरोधि आर्यसमाजाच्या रूपाने फलद्रूप झाले ? तसेच ज्या बकाल वस्तीच्या मुबई शहराबद्दल तत्कालीन अर्वाचीन कोशकार असे लिहितात की, वैदिक धर्मास प्रतिकूल असे कोणतेही कृत्य कोणास करणे झाल्यास ते त्यानें येथे केले असता निर्विघ्नपणे सिद्धीस जाते अशी त्याची फार प्रसिद्धि झाली आहे, त्या मुबईच्या खारटणात वेदविद्या हरळीसारखी पसरेल असे दयानदास वाटले तरी कसे ? आणि सस्कार सकराची केवळ सीमाच अशा उत्तर भारतात आर्याची मुबलक उपलब्धि होईल हे तरी त्यानी कशावरून ठरविले ? हे प्रश्न चितनीय आहेत ह्यात कोणाचा उपहास करण्याचा आमचा हेतु नसून ह्या एका प्रमुख आणि उदयोन्मुख धर्मसस्थेच्या उत्पत्तीचा कार्यकारणभाव शोधून पहावा हाच आमचा उद्देश आहे आता देशाची अनुकूलता सोडून व्यक्तीची अनुकूलता पहावी तर तीही तितकीच विस्मयकारक आहे स्वामी दयानद याचे आईबाप व अनेक गुरु ह्या व्यक्ति इतक्या विविध वर्त्तीच्या दिसतात की, त्या सर्वाचे सस्कार ह्या आर्यसमाजसप्रदायात हुडकून काढणे अशक्यच आहे सांप्रदायिक ग्रथनिष्ठेचाही प्रकार तोच आहे दयानद मूळ सामवेदी पण त्याचा बालाभ्यास यजुर्वेदाचा, प्रौढपणी परिशीलन ऋग्वेदावर, आस्था अथर्ववेदाची आणि त्याची गुरुपरपरा वैय्याकरणी ! बरे, वैय्याकरणी पाडित्यास तो काल अनुकूल असावा असेही वाटत नाही उलट तत्कालीन नवशिक्षित लोक व्याकरण हा विषय रूक्ष व निरुपयोगी असाच मानीत असावेत असे दिसते बरे हिंदुसमाजास थेट वैदिककालापर्यंत मागे खेचणाऱ्या ह्या सप्रदायाची धाव कोठे कोठे आधुनिक सुधारकाच्याही पुढे आहे हे पाहिलें म्हणजे ह्या सस्थेला मूळ गति कोठून कशी मिळाली हे ठरविणे अधिकच कठीण होते तेव्हा ही सस्था अस्तित्वात आणणाऱ्या ईश्वराच्या नियतीतील कार्यकारणभाव कोणता ते जाणणे अगदीच सोपे नाही ह्याचे नीट विवेचन होण्यास तत्कालीन परिस्थितीचा सूक्ष्म दृष्टीने विचार केला पाहिजे

आर्यसमाजाचे अध्वर्यु लाला हसराज आर्यसमाजाच्या उत्पत्तीची मीमासा करताना तत्कालीन परिस्थितीचें वर्णन करतात त्याचा भावार्थ असा—

' मुसलमानी सत्तेची समशेर हिंदुस्थानात पूर्ण विजयश्रीने चमकत असताही हिंदूनीं आपल्या बौद्धिक आणि नैतिक प्रगतीत आपल्या इस्लामी राज्यकर्त्यांपुढे हार खाल्ली नाहीं बाबराने संगाचा पराभव केला तरी नानकापुढे त्यास नमावेच लागत होते अकबर, फैझी, जहांगीर आणि दारा हे राज्यकर्तेही हिंदूंच्या विद्वत्तेची व साधुत्वाची ग्वाही देतच होते परंतु इंग्रज येथे येताच सर्व मनु पालटला तेव्हा-पासून असा एकही दिवस जात नाही, कीं ज्या दिवशी आमच्या हीनत्वाची आम्हास आठवण करून दिली जात नाहीं रेल्वे, टेलिग्राफ आणि इतर साहेबाचे कारखाने हे पाहूनच अगोदर सुशिक्षित आणि अशिक्षित चीत होऊन गेले साहेबाचें भौतिक विज्ञान, त्याचें विलक्षण गुंतागुंतीचे राज्ययंत्र, शेक्सपीअरची नाटकें, मिल्टनचीं काव्यें, बेकनचें तत्त्वज्ञान, साहेबाची चिकाटी, सत्यप्रीति, धैर्य, देशाभिमान, स्वार्थत्याग इत्यादि गोष्टींनीं हिंदूंची माथी भ्रमली, नमला आणि दीन झाली।

" अशा अनुकूल परिस्थितीत,हे सर्व वर्चस्व जे जीजसला मानतात त्यांचेच नशिबी असते, अशी कानगोष्ट सांगण्यास परोपकारी मिशनरी पुढे सरसावले त्यांचेच साथीदार प्राच्य विद्यासंशोधक यांनी आमचाच धर्म आम्हास शिकविण्याची अधिकारपत्रे बळकावली व त्यांची मुक्ताफळे आम्ही शिरसावंद्य केली ज्यांच्या पूर्वजांनी मुसलमानांच्या कडव्या धर्मछलास दाद दिली नाही, ते हिंदु इंग्रजांचे भौतिक विज्ञान आणि त्यांच्या पाद्र्यांची व संशोधकांची टीका यांनी गांगरून गेले जुन्यास चिकटून राहिलेला अफाट व विचारशून्य असा बहुजनसमाज मूर्ति-पूजा आणि भोळेपणा यांच्या गर्तेत इतका खोल गेला होता की, स्वताच्याही दैन्याची त्यास जाणीवही नव्हती काही थोड्या अर्थशून्य विधींपलीकडे सर्व हिंदूंस एकत्र जोडणारे असे कोणतेच तत्त्व किंवा दुवा अस्तित्वात नव्हता सुशिक्षितांचा अज्ञानजन्य दंभ गेला होता खरा, पण त्यांना मिळालेला प्रकाश त्यांची परिस्थिति जास्तच भेसुर व हिडिस रूपात दाखविण्यापलीकडे काहीच उपयोगाचा नव्हता. शिक्षणाने ईश्वरावरील श्रद्धेचा झरा कोरडा पडून हिंदु साहित्याच्या ज्ञानगंगेतील दुर्ज्ञेय खडक व अनुल्लंघनीय भोवरे नेपढे पाश्चात्य संशोधकांनी उघडे केले होते वेद म्हणजे खेडकाप्रमाणे रानटी लोकांचे प्राथमिक रूक्ष बोल असे सुशिक्षितांनी आपल्या मनाशी ठरविले होते आणि जुनेपुराणे शास्त्री पौराणिक वाङ्मयात गुरफटून स्वताच वेदविद्येला पारखे झाले होते तात्पर्य, एका काळी साऱ्या सुधारलेल्या जगास कायदा व विज्ञान शिकवणाऱ्या आमच्या प्राचीन ऋषींच्या

धर्मांचा आता पुरस्कार करताना शरमेनें खालीं मान घातल्यावाचून हिंदूस गत्यतर नव्हतें ''

अशा या हीन काळात स्वामी दयानदानीं आपलें कार्य केले त्याच्या मोठ-पणास अनुकूल परिस्थिति कारण झाली नसून उलट अनिष्ट आणि प्रतिकूल परि-स्थिति बदलण्यास त्याचे व्यक्तिमाहात्म्य कारण झाले असे आर्याचे मत आहे तो काळ धर्मग्लानीचा होता असे ते मानतात त्या काळच्या धर्मग्लानीचे कारणीभूत मुख्याग म्हणजे अत्यन्त निद्य अशा ब्राह्मणवर्गाचे वर्चस्व असेच इग्रजी शिकलेल्या ब्राह्माप्रमाणे पदर्वाधर आर्यानीही ठरविले आहे ते ठरविताना निदान आर्य लेखकाचा जो सताप झालेला दिसतो तो पाहून हे ब्राह्मण म्हणजे एक निद्यजात ईश्वराने ह्या हिदुस्थानात निर्माण केली ! आणि त्याच्या पायी या देशाचा सर्व-तोपरी अध.पात केला, असे वाचकास वाटल्यावाचून रहात नाही लाला लजपतरायासारखे अनुभवी, विद्वान व गभीर लेखकसुद्धा जेव्हा ह्या ब्राह्मणवर्गाचे वाभाडे काढण्यास मागेपुढे पहात नाहीत, तेव्हा अशी याची ही पापे तरी कोणती, ते समजावून घेणे फार अगत्याचे होतें

लालाजी म्हणतात की, 'दयानद जाणते झाले तेव्हा हिदुधर्माचे सर्वस्व म्हणजे ब्राह्मण होते व इतर जन म्हणजे असूननसून सारखेच होते प्रत्येक ब्राह्मण म्हणजे साक्षात् ईश्वराचाच प्रतिनिधि असून ईश्वराच्या आज्ञा व अनुशासनें सागणारा तोच काय तो अधिकारी असे त्याचा शब्द तोच कायदा आणि त्याचे उल्लघन करणारास अक्षय्य नरकवास हेच शासन असा हा ब्राह्मण म्हणजे कोणी निवडलेला, नेमलेला किवा अधिकृत केलेला असे, असे मुळीच नाही त्याला हे ब्राह्मणत्व केवळ जन्मानेच प्राप्त होत असे आणि धर्मगुरु म्हणून त्याच्या अधि-काराचा त्याच्या शिक्षणाशी किवा दुसऱ्या कोणत्याही गुणाशी सबध नसे धर्म काय आणि अधर्म काय हे केवळ त्यानेच सागावे प्रत्येकाने कशावर विश्वास ठेवावा आणि काय करावे, हेसुद्धा ठरविण्याचा अधिकार अशा ह्या ब्राह्मणाचाच. मतस्वातत्र्य अस्तित्वातच नव्हते हजारात एकाही ब्राह्मणाला वेद माहीत नसले, तरी धर्मशास्त्राचा ज्ञाना ब्राह्मणच समजला जाई एखाद्या पुराणातलें किवा एखाद्या सस्कृत नाटकातले किवा साध्या काव्यातले का वचन असेना ते ब्राह्मणा-च्या तोडून निघाले, की ते वेदवाक्य म्हणून गणले जाई मग त्या ब्राह्मणाला सस्कृताचा गध का नसेना ! तो ब्राह्मणाच्या पोटीं आला एवढ्यानेच तो एक देव-



लाला लजपतराय

जन्म—इ सन १८६५

माणूस गणला जाई अशा स्थितीत ब्राह्मणाची पूजा हेंच हिंदुधर्माचें आद्य लक्षण समजले जाई या ब्राह्मणानी धार्मिक आचाराचे असे कांहीं जाळे गुफले होते कीं, त्यातून हिदूच्या दिनचर्येतील एक क्षणही सुटला नव्हता ब्राह्मणपुरोहिताच्या आशीर्वादाने किवा त्याने करविलेल्या प्रायश्चित्ताने ज्याची निष्कृति होणार नाहीं, असे कोणतेही अत्यत घोर, राक्षसी किवा किळसवाणे पातक असणेच शक्य नाही, अशी त्या वेळी सामान्य समजूत होती मरणोत्तर साधावयाच्या स्वर्गाचे कपाटाची किल्ली ब्राह्मणाजवळ आहे असे लोक मानीत साध्या वैदिकधर्माचा लोप होऊन जिकडे तिकडे देवळाचा बुजबुजाट, यज्ञाचा अनर्थ आणि असख्य देवताच्या पालख्या आणि उत्सव याचा धुडगूस माजून राहिला होता घटानाद आणि धुपार्त्या, देवाला पोषाख चढविणे आणि त्याच्यापुढे काहीं अर्थ न समजताच स्तोत्राची टकळी सुरू ठेवणें, असा हा ब्राह्मणांनी सारा मूर्खाचा बाजार सुरू केला होता! ह्याप्रमाणे ब्राह्मणांचें वर्चस्व हेच मृत्यूच्या दारी बसलेल्या हिंदुधर्मातील रोगबीज होतें"

"हे जातिब्राह्मण इतर लोकांप्रमाणेच सामान्य माणसे होत आनुवशिक सस्कारामुळें त्यास खरे ब्राह्मण्य प्राप्त होण्याचा सभव कदाचित् जास्त असेल. तथापि खरे ब्राह्मण झाले तरी ते काही पूजनीय नव्हत ते काहीं देवाचे मध्यस्थ नव्हत वेद हेच काय ते धर्मास प्रमाण होत, पण त्या वेदाचे अध्ययन करण्यास ब्राह्मणानी इतराना बदी केली होती शूद्रानींच काय, त्रैवर्णिकानाही ब्राह्मण वेद शिकवीत नसत बरे, या ब्राह्मणाना तरी वेद यावे, पण त्याचीही मारामार. उत्तर भारतात दहा हजारात एकाही ब्राह्मणाने वेदाचे अध्ययन अशतःही केलेले नसतें. दक्षिणेत सुद्धा असा ब्राह्मण हजारात एखादा सापडणेही कठीण त्याचे वेदाध्ययन भिक्षुकीपुरतेच. त्यातही वैदिक ऋचाचा उपयोग करणारे थोडेच. दयानदाच्या पूर्वी दीड हजार वर्षात वेदाचा अर्थ करू पाहणारा काय तो एकच निघाला पण त्याने तरी परपरेला अनुसरून एक भली मोठी टीका तयार केली, दुसरे काय केले! अशा रीतीने धर्म म्हणजे निःसत्त्व मते आणि शुष्क विधि याचा एक मृतप्राय सागाडा झाला होता हिदी राष्ट्राच्या आत्म्यास बाहेर नजर टाकण्यासही वाव नव्हता अशा रीतीने ज्यानीं आपल्या जुलमी अधिकारमदाने रोम येथील पोपच्या सत्तेवरही कडी केली होती, त्या हिंदुस्थानातील ब्राह्मणाचा दयानदानी शक्य तितक्या कडक रीतीनें धिक्कार करून त्यांस पदभ्रष्ट करणें क्रमप्राप्तच होतें."

आर्यसमाजाचे इतिहासकार श्रीनरदेवशास्त्री वेदतीर्थ यांचेही तत्कालीन परिस्थितीबद्दल जवळ जवळ असेच मत आहे मात्र त्यांचा ब्राह्मण वर्गावर विशेष रोष नाही अशा या अत्यंत हीन स्थितीतून व विशेषत: ब्राह्मणी संस्कृतीच्या जुलुमातून हिंदी राष्ट्राचा उद्धार करण्याकरिता श्रीमद्दयानंदांनी आर्यधर्माची प्रतिष्ठापना केली असे आर्य इतिहासकारांनी सामान्यत्वाने प्रतिपादन केले आहे इतर टीकाकारांनीही आपआपल्या परीने आर्यधर्माच्या उत्पत्तीची मीमांसा करण्याचा प्रयत्न केला आहे कित्येकांनी परधर्मीयांनी केलेल्या आक्रमणावर जोर देऊन हिंदुस्थानात कडव्या असहिष्णु परधर्मीयांशी सारखा प्रसंग असल्यामुळे त्यापासून हिंदुधर्माचे संरक्षण करण्याकरिताच या विजिगीषु आर्यधर्माची उत्पत्ति झाली असे प्रतिपादन केले आहे तर दुसरे कित्येक सुधारणावादी असे म्हणतात की, तो काळ सुधारणाचाच होता पण पुराणमताभिमानी बहुजनसमाज सुधारणेस अनुकूल करून घेण्यास त्यास वैदिक धर्माच्या अभिमानाचे पाघरूण दिल्याने ते काम सुकर होईल, हे लक्षात घेऊन दयानंदांनी सामाजिक सुधारणेकरताच आर्यधर्माची स्थापना केली काहींनी तर याचा राजकारणाशी संबंध जोडून आर्यसमाज हे दडपशाहीखाली चिरडलेल्या त्या काळच्या खडतर राजकारणाचेच एक व्यक्त स्वरूप होय असे प्रतिपादिले आहे याप्रमाणे आर्यधर्मोत्पत्तीच्या भिन्न भिन्न मीमांसा आढळून येतात त्यापैकी कित्येकांत सत्यांशही थोडाफार आढळेल, नाही असे नाही परंतु आमच्या मते दयानंदाचे वैशिष्ट्य हे विशेषकरून तत्कालीन देशपरिस्थितीचा परिणाम नसून, ते एकदोघा व्यक्तींच्याच विचाराचे फल आहे दयानंद सरस्वती व त्यांचे गुरु विरजानंद सरस्वती ह्या दोन व्यक्तींच्या आयुष्यातील विचित्र घटनेत त्यांच्या विचारांना जी दिशा मिळाली, तीच पुढे थोड्याफार फरकाने आर्यसमाज ह्या संप्रदायाच्या रूपास पावली आर्यसमाजी मताकडे दयानंदाचे व लोकांचे मन वळण्यास जरी तत्कालीन परिस्थिति काही अंशी कारण असली—तरी हे आर्यमत प्रचारात येण्यास मुख्य • कारण दयानंद ही स्वभावतःच एक जोरकस संस्काराची व्यक्ति होय

स्वामी दयानंदासारखा एखादा धर्मवीर जन्मास येऊन जेव्हा एखादी ठळक गोष्ट करून जातो तेव्हा गीता व अवतारवाद न मानणारेही कित्येक लोक

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥**

ह्या सुप्रसिद्ध गीतावचनाचा आधार घेऊन तत्पूर्वी कार्यानुमेय अशी धर्मग्लानि असलीच पाहिजे असें मानीत असल्याचे दिसते सुप्रसिद्ध ब्राह्म सर व्यंकटरत्न यांनी आपल्या एका व्याख्यानात प्रतिपादन केले आहे की, स्वामी दयानद हे दिव्य लोकातून दीक्षा घेऊन आलेले असे एक ईशप्रेषित त्रिकालज्ञ साधु पुरुष होते परलोकात ज्ञान सपादन करून आणि तेथूनच दिव्यस्फूर्ति घेऊन जे पुण्यात्मे आर्यावर्तात दैवी संदेश देण्यास आले त्यापैकीच ते एक आर्यपुगव होते. दुसरे एक विद्वान् आर्यसमाजी यांनीही असें म्हटले आहे की—अशा विकट परिस्थितीतील आर्यधर्माची दीन वाणी ऐकून ऋषि दयानदजी दिव्य लोकातून अवतीर्ण झाले परधर्मीयांच्या अतिक्रमणास अटकाव करावा, वैदिक धर्माचा व आर्यवाङमयाचा उद्धार करावा, आणि आर्यांस नवजीवन द्यावे ह्यासाठीं ते आले आणि ते आकस्मिक अथवा अनपेक्षित रीतीनें आले नसून जगदुद्धारार्थ ते येणार हे जाणून त्याचे कार्य सुकर करण्यासाठीं त्यांच्या अगोदर नानक, चैतन्य तुकाराम, कबीर, दादू, राममोहन, देवेंद्रनाथ असे अनेक थोर पुरुष जन्मास येऊन जे महत्कार्य स्वामी दयानद ह्यांच्याकडून पुरे व्हावयाचें त्याची पूर्वतयारी त्यांनी करून ठेवली ”

अशा रीतीनें दयानद हे अवतारी मानून केलेली आर्यधर्माची मीमांसा ही श्रद्धेच्या व कदाचित अतिम पारमार्थिक दृष्टीने खरी असली तरी तिने विवेचक बुद्धीचे समाधान होणार नाहीं इतकेंच नव्हे तर ती एकदा मान्य केल्यावर सर्वच चिकित्सक बुद्धीची जिज्ञासा निराधार पडून इतिहासाची जरूरीच उरणार नाहीं पण मानवी बुद्धीच्या अतिम विकासाच्या दृष्टीनेही या सर्व गोष्टींची जरूरीच असल्यामुळे केवळ धर्मग्लानि व अवतारवाद यावरच भिस्त टाकता येणार नाहीं बरें, धर्मग्लानि हे कारण सामान्यपणे सर्वच ठिकाणीं सांगण्यात येतें तेव्हा याचें निश्चित स्वरूप तरी काय ? प्रत्येक धर्मवीराच्या चरित्राची पृष्ठभूमिका म्हणून धर्मग्लानीचे अशाच प्रकारचे वर्णन चरित्रकारानें केलेले आढळते त्यामुळे मन क्षणभर साशक होऊन मनास सहजीच अशी शका येते की, धर्मग्लानि नव्हती असा काल तरी भारतवर्षाच्या इतिहासातील कोणता ? बौद्धांच्या दृष्टीनें वैदिककाल धर्मग्लानीचाच होता श्री-शकराचार्यांनी बुद्धकालास धर्मग्लानीचा असेच गणले रामानुज व वल्लभाचार्यांनी शकराचार्यांस प्रच्छन्न बौद्ध म्हणून त्यासही धर्मग्लानीतच लोटले. वल्लभाचा पुष्टिमार्ग तर अधोगतिकारकच मानला गेला व मानभावी आणि तांत्रिक यांसही

कोणीं चागलें म्हटलें नाहीं महाराष्ट्रात स्वराज्यसंस्थापनेपूर्वी धर्मग्लानी होती व अखेरही पुन्हा तीच ! अशा रीतीनें विचार करता आपल्या देशाच्या दृष्टीनें धर्मग्लानि नव्हे असा कोणताच कालाचा विभाग कल्पिता येत नाही ज्याप्रमाणें पूर्वाभिमुख चालणाऱ्या मनुष्यास प्रत्येक पावलागणिक पूर्वेकडील भूमि पश्चिमेकडे गेल्यासारखी होते, तसाच हा प्रकार असावा किंवा लाटांच्या आंदोलनाने थोडा-फार उच्चसखल होणारा समुद्राचा पृष्ठभाग जसा बदलतोसा दिसतो, तसलीच ही ग्लानि व संजीवनीची आवर्तनें असावीत असे वाटते अगदीं ईश्वरी अव-तारांचे प्रसंग घेतले तरी श्रीरामाच्या जन्माला धर्मग्लानीचा हेतु कितपत लागू पडेल ? आणि त्याच्या अवतारसमाप्तीनंतर रामराज्य कितीसे बढले ! निदान श्रीकृष्णाच्या जन्मकालीं गोकुळात धर्मग्लानि होती असे का म्हणावे ? व ते निजधामास गेले त्या काळीं झालेला यादवांचा संहार आणि त्याच्या बायकांची दुःस्थिति इत्यादि गोष्टी पाहिल्या म्हणजे धर्मोद्धाराचे कार्य ते निजधामास जाण्यापूर्वी पुरें झालें होते, असे तरी काय म्हणावे ! तसेंच धर्मग्लानि या शब्दा-च्या अर्थाबद्दल एकवाक्यता तरी कशी होणार ? उदाहरणार्थ, प्रागतिक आज ज्यास धर्मसुधारणा मानतील त्यास सनातनी धर्मग्लानि म्हणतील बाहेरची उदाहरणे घ्यावयाचीं तर खिलाफत बुडविणारे तुर्कस्थान, स्वर्गमंदिरावर नांगर फिरविणारें व भूमंदिराची घोडशाळा करू पाहणारे चीन, सारीच उलथापालथ करून सोडणारा रशिया, ह्या उदयोन्मुख राष्ट्रांत किंवा बायबल-निष्ठेबद्दल रणें माजलेल्या उत्कर्षाच्या शिखरावरील अमेरिकेत आज जी विचारांची क्रांति होत आहे, ती धार्मिकदृष्ट्या ग्लानि आहे की सुधारणा आहे, याबद्दलही एकमत होणार नाही आपल्याकडेही पाहता वेदोक्त कर्म हेंच धर्माचे उज्ज्वल स्वरूप नाही काय ? अहिंसेपरते उच्च तत्त्व कोणते ? नैराश्य हेच परम सुख नव्हे का ? निवृत्ति हीच ज्ञानाची परम सीमा खरी ना ? परंतु याही गोष्टींचा अतिरेक झालेला ईश्वरास खपत नाही असें दिसते तीही एके परि धर्मग्लानीच ठरते आणि म्हणून ईश्वराच्याच प्रेरणेने चार्वाक आणि बौद्ध यांच्या सारख्यांची दर्शने निर्माण होतात. दशावताराकडे आपण बारकाईने पाहिले तर असेही दिसून येते की, ईश्वरी अव-तारांनी धर्मप्रचाराच्या कार्यापेक्षा दुष्ट निबर्हणाचेंच कार्य बहुतेक अवतारांत केलें आणि तेंही प्रसंगविशेषीं दया, सत्य, अहिंसादि लौकिकी उच्च तत्त्वांची फारशी प्रतिष्ठा न ठेवताही केले आता ही गोष्ट खरी की, अखेर अखेरच्या अवतारांत दुष्कृतांचा

विनाश करण्यापेक्षां धर्मप्रचाराकडेच अधिक लक्ष दिलें गेलें. माणसांचाच काय पण पशूचाही वध बुद्धानी केला नाही पण जुनीपुराणी यज्ञसंस्था आणि ईश्वरासबंधी आस्तिक्यभाव याचा त्यांनी केलेला नाश दुर्लक्ष करण्यासारखा खचित नाही.

आपण हा ईश्वरी अवतारभाव सोडून निसर्गाकडे पाहू लागलो तर तेथेही अशीच परस्पर विरोधी योजना दिसते प्रजावृद्धि हा सृष्टीचा मुख्य हेतु असताही महर्गता आणि महामारी, भूकंप आणि जलप्रलय हे सारे जगाच्या कल्याणासाठीच ईश्वर उत्पन्न करतो असे समजतात वावटळीने मुळे हादरून सोडणे, माजलेले पीक छाटणें, झाडे साफ डुखून टाकणे असे सकृद्दर्शनी दिसणारे अनिष्ट प्रकार वनस्पतिकोटीच्या अभ्युदयाचेच हेतु मानले जातात इतकेच काय, पण सागासारख्या झाडास पुन्हा सरळ जोरदार कोंभ फुटावे म्हणून ती अगदी जमिनीबरोबर छाटून त्यांचे पुरेच मुंडण करावे लागते शिवाय फलपुष्पांनी झाडे संपन्न असतानाही वाळलेली फांदी तोडणे, कीड लागलेल्या भागावर राख फेंकणे, किंवा बांडगूळ काढून टाकणें अशा रीतीने तनदुरुस्ती राखण्याकरिता बागवानास झाडावर एकसारखा हात फिरवावाच लागतो मनुष्याच्या आयुष्यात अत्यंत ग्लानीचे असे प्रसंग जरी वरचेवर येत नसतात तरी पित्तप्रकोपाला शमन, वातविकाराला मर्दन आणि कफाला शेक इत्यादि योजना शरीराचे सामान्य आरोग्य असताही जरुरीप्रमाणे तात्पुरत्या कराव्याच लागतात. त्याप्रमाणे समाजयंत्र सुरू असताही त्याचा एखाद दुसरा भाग मधून मधून समाजाच्या नेत्यास साफ करावाच लागतो. अशा रीतीनें समाजसुधारणाच्या अखंड चाललेल्या व्यापाची मीमांसा कोणी करतील ती जरी तर्कशुद्ध असली तरी व्यवहार तितकाच शास्त्रशुद्ध घडत नाही चिकित्सक बुद्धीचे नवे पाजळलेलें हत्यार उगाच जेथे तेथे चालवीत सुटावे अशी उच्छृंखल शिकदरी बुद्धि कित्येकास आठवते आणि कित्येकाच्या निदानात चूक होऊन मर्मस्थानावरच हत्यार चालले जाऊन स्वत्वाचाच घात होतो कोणाचा प्राण कोठे असतो याचा विवेक करावा लागतो उदाहरणार्थ,आचार हे काही धर्माचे शाश्वत स्वरूप नव्हे, म्हणून कित्येक त्यास तुच्छ लेखतात पण पाने ती काय असे म्हणून केळीची सारीच पाने छाटली तर केळ मरून जाईल हे ते जाणत नाहीत शिवाय कित्येक नर एखादे झाड मशागत करून जगणारें असताही खुंटीच्या कलमाच्या हौशीने मूळ झाडाचा सारा विस्तारही तोडण्यास तयार होतात. आम्ही आमचा मूळ बुंधा तर राखलाना, असें ते म्हणतात पण त्यानंही त्या झाडाचें स्वत्व रहातेंच असे नाही. शिवाय कोणत्या झाडावर कोणतें कलम रुजेल हे ठरवितानाही चूक होण्याचा फार संभव असतो.

आमच्या म्हणण्यातील भावार्थ इतकाच कीं, धर्मसुधारक हा ईश्वरी अवतार असो किंवा साधा मानव असो, त्याचे आचार व विचार चांगले असले तरी ते सर्वतोपरी निर्दोष आणि अनुकरणीय असतातच असे नाहीं तसेच पूर्वीची धर्मग्लानीची म्हणून वर्णने केलेली परिस्थिति सदोष असली तरी सर्वतोपरी निंद्य असते असेही नाहीं. प्राण्याच्या फुफुसातच काय, पण अतराळातील प्रचड खगोलातहीं सकोच आणि विकास ( Contraction and dilation ) केंद्राकर्षण आणि केंद्रोत्सारण अशा दोन विरोधी गति असतात त्याचे योग्य प्रमाण राहण्यातच त्या गोलाचे अस्तित्व अवलबून असते ब्राह्मण धर्माचे गुरुत्वाकर्षण विकास आणि प्रचार याला जरी विरोधी असले तरी त्यात निष्ठेची तीव्रता राहण्याचा सभव असतो तो उदारमताच्या फैलावात रहात नाहीं हे विसरता येत नाहीं तसेच धर्मसस्थापनेच्या कार्यात नारसिंह आणि नरसिंह (सरस्वति) त्यानी स्वोदाहरणानी दर्शविलेल्या दुष्ट निवर्हण आणि नसोपदेश अशा दोन बाजवा असतात दोन्ही इलाज खरे, पण विरेचन केव्हा किती द्यावे व दीपन केव्हा कसे द्यावे हे तज्ज्ञच जाणतो असो

दयानदाच्या जन्माच्या वेळीं (सन १८२४) ब्रिटिशाची सत्ता अद्याप हिंदुस्थानावर पुरी बसली नव्हती पजाब, सिंध, मध्यप्रात असा हिंदुस्थानातील बराच भाग अद्याप ब्रिटिश सत्तेखाली पुरा यावयाचा होता अलेक्झडर, डफप्रभृति खिस्ती मिशनरी व मेकॉलेप्रभृति खिस्ती मुत्सद्दी हिंदुस्थानावरील पूर्वीच्या राजकीय सत्तेबरोबर हिंदुलोकाचे स्वत्व व सत्त्व हरण करणे ते कोणत्या उपायानीं करावे या विचारात गढले होते डफ आणि मेकॉले हे हिंदूच्या भवितव्याचे तत्कालीन विश्वकर्मे होते स्वामी दयानद हिंदुस्थानच्या परिस्थितीसबधी पुरे जाणते होईतो साऱ्या हिंदुस्थानात ल करापेक्षाही मिशनरी सस्थाची नाकेबदी चोहोंकडे झालेली होती वदनीय तीर्थक्षेत्रे व अस्पृश्य गणलेले महार-चाभारवाडे ही मिशनऱ्याचा माऱ्याची ठिकाणे झाली होती हरणटोळ सन्नकास दश करते व फुरशी पायाचा डासा घेतात, त्याप्रमाणे या लिबलिबीत मिशनरी सस्थानी हिंदुसमाजाचे श्रेष्ठकनिष्ठ भाग हेरले होते सर विल्यम जोन्ससारख्या पश्चिमेकडील प्राच्यविद्या सशोधकानी आपल्या हातातील सशोधनाची दिवटी या जिवाणूपुढे धरून मर्मस्थानाचे अचूक ज्ञान त्यास करून दिले होते. आणि प्रगतीच्या मार्गावरील पाथस्थास इग्रजी विद्यावारुणीचे प्याले देण्याचे काम मेकॉले करीत होते अशा कारवाईने भारतवर्षातील पूर्वीची विजयशाली प्रजा निस्तेज आणि भेकड बनून

नैतिक अधःपाताने काळीठिक्कर पडली असल्यास त्यात नवल ते काय ! नवल दुसरेच आहे, तें हें कीं, भाग प्यालेला मनुष्य आपणास सावध समजून ज्याप्रमाणे दुसऱ्याच्या पागलपणाबद्दल रडू लागतो, त्याप्रमाणे आमच्याकडील कित्येक शिकलेल्याची अत्यत विपरीत मन.स्थिति बनून गेली !

एखादे वेळी खरे दुखणे पत्करते, पण नाहक ओढवून घेतलेल्या दुखण्यास इलाज काय ? एकोणिसाव्या शतकात हिंदुस्थानात झालेली राज्यक्रांति पूर्वीच्या राज्यक्रांत्यापेक्षा ज्यास्त परिणामकारक झाली खरी समाजातील श्रेष्ठ वर्गाच्या निष्ठेला चिकित्सक बुद्धि ही नवीन युक्तिबाज सवत मिळाली, कनिष्ठ वर्गातील दारिद्र्य ख्रिस्ती कुरणात शिरून कुपर्णावरील सरड्याप्रमाणे एकरगी होऊन सुरक्षित झाले, देशातील शस्त्रसन्यासाने "कृषि कर्माणिकारयेत" (पाराशर २–२) हे व्रत उचलले कलाकौशल्याचे आगर तुटल्यामुळे त्याच्या कपाळी हेलपाटी आली पाठशाळाची शाकभाजीची असल्यात परमे नामशेष होऊन मोठमोठ्या शहरातून मरूच्या बागा झाल्या अशी अनेक कायमची स्थित्यतरे झाली असली, तरी त्याबरोबर हिंदुधर्माचे शुद्ध स्वरूप अगदीच नष्ट झाले होते असे नव्हे तत्कालीन ब्राह्मणाची आजच्या ब्राह्मण–ब्राह्मणेतरानी कितीही निंदा केला तरी

**स्नानंसंध्या जपो होमोस्स्वाध्यायो देवतार्चनम् ॥**
**आतिथ्यं वैश्वदेवंच षट् कर्माणि दिने दिने ॥** —पराशर

हा कलियुगातील धर्माचार आजपेक्षा शभर वर्षापूर्वी शभर पटीने अधिक पाळला जात असेल याबद्दल आम्हाला तरी शका नाही काशीचे विद्यापीठ त्या काळी जागृत होते, आणि याशिवाय आसेतहिमाचल अनेक वैदिक आणि शास्त्री गावोगाव विखुरलेले होतेच

पण ही स्थिति हिंदुस्थानच्या सर्व भागातन सारखीच नसेल हिंदुस्थानात त्या वेळीही हिंदु, शीख, जैन, बौद्ध, मुसलमान, ख्रिस्ती, पारशी, ज्यू आणि वन्य व इतर धर्मी असे लोक होते त्यात सन १८८१ च्या सुमारास स्थूल मानानें दर दहा हजारी हिंदु ७४३२, शीख ७३, जैन ४८, बौद्ध १३५, मुसलमान १९७४, ख्रिस्ती ७३, ज्यू ५, वन्यधर्मी २५९ याप्रमाणे जरी निरनिराळ्या धर्मीयाचें प्रमाण होते, तरी वायव्यसरहद्द, बलुचिस्थान, काश्मीर या प्रांतात बहुतेक वस्ती मुसलमानाचीच असून पजाब, पूर्व बगाल, व सिंध यात ते बहुसख्याक होते याशिवाय सयुक्त प्रातात अस्पृश्य, पजाबात शीख व

राजपुतान्यात जैन याचा भरणा फार मोठा होता. तात्पर्य, पंजाब आणि संयुक्त प्रांत ह्यांत जरी भारतवर्षाचा बहुतेक सारा राजकीय व सांस्कृतिक इतिहास साठविलेला असला, तरी मुसलमानी कारकीर्दीच्या अखेरच्या एक हजार वर्षांत पूर्वीचे स्मृतिशेष घालविण्याचा परमावधीचा प्रयत्न झाला शेकडो मंदिरे जमीनदोस्त होऊन त्या ठिकाणी मशिदी उभारल्या आणि वेदविद्येचा कमजास्त लोप होऊन फारसी व उर्दू साहित्याला अत्यंत बहार आला आजही पंजाबात ४८ उर्दू वर्तमानपत्रांपैकी २० हिंदूंनी चालविली आहेत आर्यसमाजाची जंत्री आजपर्यंत उर्दूंत निघत आहे इतके परकीय संस्कार दृढमूल झाले आहेत

ज्या पंजाबात आर्यसमाज फैलावला त्या पंजाबात पांच नद्यांप्रमाणे पांच निरनिराळे धर्मपंथ त्या काळी प्रचलित होते रणजितसिंगाच्या कारकीर्दीत शीख धर्म त्या वेळी तेजीस चढला होता, मूर्तिभंजक इस्लामी धर्माचे संस्कार पूर्वी दृढमूल झालेलेच होते, बुद्धधर्माचे अवशेष व जैन धर्माचे जिवंत संस्कारही तेथे जागृत होते, हिंदूंचे तर सप्तसिंधु हें मूळचे वसतिस्थानच होते, आणि त्यांत ख्रिस्ती इंग्रजांनीं पंजाबसुद्धा सर्व देश जिंकल्यामुळे ख्रिस्ती मिशनरीही तेथे पाय पसरू लागले होते ह्या भिन्न पंथांपैकी कांही जैन हे जरी मूर्तिपूजक असले तरी श्वेतांबर जैन शाखेपैकी स्थानकवासी ऊर्फ ढुंढिया पंथाचे जैन हे मूर्तिपूजाविरोधी असून, त्यांच्यात धर्माधिकारासंबंधी स्त्री-पुरुष इत्यादि भेद मानीत नसत. आणि स्वामी दयानंद ज्या संस्थानचे रहिवासी होते त्या संस्थानात ह्या स्थानकवासी जैनांचें विशेष प्राबल्य असून खुद्द संस्थानचे राजे व दिवाण हेही त्यांच पंथाचे मतानुयायी होते तसेंच शीखांचे गुरु नानक ह्यांची जी पुण्यभूमि (कर्तारपूर) तीच स्वामींचे मुख्य गुरु विरजानंदसरस्वती ह्यांची जन्मभूमि होती आणि त्यांच्या जन्माच्या वेळी शीखांचे राज्य परमोत्कर्षाला पोंचले होते ह्या सर्व संस्कृति भिन्न असल्या तरी त्यांत कांही समानधर्म होते. त्यांच्यात वर्णभेद व अधिकारभेद नव्हता, मूर्तिपूजा नव्हती, पण धर्मग्रंथाचे मात्र विशेष देव्हारे होते बायबल, कुराण व ग्रंथसाहेब या ग्रंथांचे माहात्म्य देवमूर्तीप्रमाणेच होते ते इतकें की, शीख लोक तर ग्रंथसाहेबाची पूजा, शेजारती, इत्यादि सर्व उपचार करीत असत, कुराण, बायबल किंवा ग्रंथसाहेब, हेंच काय ते ह्या तीन धर्मांचें धर्मसर्वस्व असे तसेंच परमतांबद्दल असहिष्णुता हाही एक त्यांचा सामान्य धर्मच होता शिवाय धर्मप्रचाराच्या व धर्मांतर करण्याच्या चळवळी

आणि प्रौढ विवाहादि कित्येक सुधारकी आचार, ख्रिस्ती, मुसलमान व शीख यात सारखेच होते. ह्या सर्व संस्काराचा दयानदांच्या मनावर परिणाम झाला असावा. ख्रिस्ती संस्कृतींत आधिभौतिक शास्त्रीय शोधाची भर होत होती, तीही प्रचलित हिंदु-धर्मातील उणीव भरून काढणें दयानदास जरूर भासले असेल याशिवाय दयानदाचा खरा व्यासंग वेदसंहिता, योग, व व्याकरण यापलीकडे फारसा झालेला नव्हता, असें वेदतीर्थ नरदेवशास्त्री याच्या आर्यसमाजाचे इतिहासावरूनच दिसून येते शिवाय दयानदाचे गुरु आर्ष ग्रथाचे दृढाभिमानी आणि पौराणिक ग्रथाचे द्वेष्टे असून तेच मत दयानदानी चालवावे हीच गुरुदक्षिणा त्यानीं दयानदापाशी मागितली होती त्यावरून दयानदाच्या धर्ममतात प्रथम प्रथम खगोलातील केद्राकर्षण आणि केद्रोत्सारण या विरोधी गतीप्रमाणे सकोच आणि विस्तार, तीव्रता आणि व्यापकता, स्वमताभिनिवेश आणि लोक-सग्राहक बुद्धि असा विरोधाभास उत्पन्न झाला गुरुर्जाच्या ऋणाच्या दडपणा-खाली त्याची आर्षग्रथाची प्रामाण्यबुद्धि अधिकच सकोच पावून ती केवळ वेद-संहितेतच तादात्म्य पावली उलट गुरुर्जाचा वर्णवविरोध शि याच्या ठिकाणी विस्तार पावून त्याची शास्त्रप्रामाण्यासवर्धी बहि कारबुद्धि अतिव्यात झाली वेदसहितारूप सुईच्या नेढ्यातून एकोणिसाव्या शतकातील बुद्धिवादाचा मातलेला हत्ती पार घालविण्यासारखे दुर्घट कार्य करण्याची महत्त्वाकाक्षा त्यानी धरली स्वत्वाच्या पुर्विणीच्या काचेतून त्यानी एकदा वर्तमान जगाकडे निरखून पाहिले त्यानी भूतकालाकडे आणि भविष्यकालाकडेही पाहिले तेव्हा ते कित्येकास प्लेटोच्या ध्येयमूर्तीसारखे दिसले [ The spectator of all time and of all existence ]

दयानदानी भूतकालाकडे पाहिले तेव्हा त्याम वेद हें अपौरुषेय आणि अनादि दिसले आजच्या सृष्टीचा आरभकाल सुमारे एक अब्ज सत्याणव कोटि वर्षे मागे दिसून आला ज्याप्रमाणे कोळ्याने आपणामधूनच जाळ्याचे ततु बाहेर काढावे व ते आतही घ्यावे [ यथोर्णनाभि सृजते गृण्हते च ।–मुड०,१।१।७ ] त्याप्रमाणे सृष्टि पूर्वकल्पानुसार [ यथापूर्वमकल्पयत–ऋ०, १०।१९०।३ ] निर्माण झाली ती डार्विनच्या विकासवादाप्रमाणे यथानुक्रम विकास पावत आलेली नसून ' मनुष्या ऋषयश्च ये । ततो मनुष्या अजायन्त '' या यजुर्वेदीय मत्राप्रमाणे पूर्वीचीं माणसें आणि ऋषि यापासून पुढे माणसाची उत्पत्ति झाली अशीच त्याची समजूत झाली

त्यांतही अनेकजनव्यापि संस्कृति निर्माण करून त्या संस्कृतींचें आवरण अनेक लोकांवर पसरवून त्याना आत्मसदृश करण्याचें यश यापूर्वी फक्त हिंदूनींच मिळविलें. हिंदुस्थानातील वीस कोट प्रजेस एका संस्कृतिछत्राखालीं आणणे आणि हिंदु धर्मवृक्षाच्याच बौद्ध शाखेनें आणखी तीसचाळीस कोट लोक आपल्या छायेत घेणे हें प्रचंड यश ज्यानें संपादन केलें ते हिंदूचे समाजशास्त्र अथवा संस्कृति अत्यंत बलवान् होय असे त्यास आढळून आलें परंतु ख्रिस्ती आणि इस्लामी संस्कृतींच्या छापेंत वाढलेल्या विद्वानाना ही गोष्ट पटणार नाही, हेही ते जाणून असावेत ख्रिस्ती विद्वानाना ख्रिस्तकालाला (B C.ला) सोडून फार दूर जाणे नेहमीच जिवावर येतें. ग्रेटब्रिटन आणि अमेरिका यातील प्राचीन संस्कृतीचे अलीकडे सापडलेले अवशेष त्या काळी उपलब्ध नव्हते यामुळे जगातील तत्त्वज्ञानाचे आद्य गुरु प्राचीन ग्रीक, इतका तरी युरोपिअन संस्कृतीबद्दल स्वाभिमान त्यास दुर्निवार होई अशाच दुरभिमानी लोकांच्या किंवा त्यांच्या अनुयायांच्या तंत्रानें पुढे हिंदुस्थान सुशिक्षित होणार हे त्यास दिसत होते यास्तव सत्य आणि स्वत्व ह्या द्विदल बीजांची पेरणी तरुण भारताच्या मनोभूमिकेत करणें त्यास जरूर दिसत असावे.

त्याचप्रमाणे त्या वेळी घरचे पाहुणे, मूळ धर्माचा आरंभ अज्ञानात म्हणजे जारणमारणादि जादूटोण्यातच (Magic) झाला, अशी उपपत्ति ख्रिस्ती विद्वान् सांगत होते आणि सद्धर्माची पूर्ण परिणति परमेश्वराचा अखेरचा प्रेषित महमद पैगंबर यानेच केली, असा मौलव्यांचा सिद्धान्त होता तेव्हा आईपेक्षाही दीर्घकाल पाजणाऱ्या ह्या दुसऱ्या दाईप्रमाणें भिन्न संस्कृतीच्या संस्कारपेयापासून बालभारतांना लवकर कसे तोडावे, हाही एक फार जिव्हाळ्याचा प्रश्न होता.

ह्या प्रश्नाबरोबरच ओघाओघाने आनुवंशिकता, परिवृत्ति, प्रत्यावर्तन, मेंडेलिझम् ऊर्फ संकरसंतति, विकृतींची संक्रमणशीलता इत्यादि जीवकोटींतील कोणते धर्म हिंदी जातींनी आजपर्यंत अनुसरले आहेत आणि पुढें अनुसरले पाहिजेत हाही एक विकट विचार होता केवळ वंशविचाराच्या दृष्टीनें बहुतेक अफगाण आणि सोमाली लोक हेही काहींच्या दृष्टीनें ब्राह्मणांससुद्धा कदाचित् जवळचे ठरले असते, आणि गुर्जर आणि अभीर हे जवळचे असूनही परके मानावे लागते जगातील सर्व धर्म व सर्व प्रकारच्या जाति यांचे संमीलन पूर्वीपासूनच हिंदुस्थानात झालेले पहाण्यास मिळत होते. भारतीय भूस्तरशास्त्राचे नियम ज्याप्रमाणे इतर देशातील भूस्तरविद्येहून भिन्न आहेत, त्याचप्रमाणें येथें झालेले भिन्न संस्कृतींचे

प्रस्तर आजही पृथकत्वानें निवडता येतील, किंवा वनस्पति कोटींतील संकर-संततीप्रमाणे आणि विकासवादाप्रमाणें आता मूळ संस्कृति शुद्ध रूपात उत्पन्न होणे अशक्यच आहे डार्विनच्या मताने आईबाप हे मुलाचे उत्पादक नसून ते मानवी बीजाचे (Germ cells) केवळ संरक्षक (trustees) आहेत. या न्यायानें पाहता आर्यांच्या वैदिक संस्कृतीचें बीज असंख्यात पिढ्यानंतर ह्या केवळ टपाली आईबापानी आजपर्यंत शुद्ध स्वरूपात ठेवलेले आढळेल काय? किंवा ईश्वराच्या तपासनिसानीं (Sensor) मध्यतरी काही भाग कातरला असेल वैदिक संस्कृतीचे रक्षक जे ब्राह्मण त्यानी आपला वंश शुद्ध राखला आहे किंवा गुणकर्मांप्रमाणें एकसारखी त्यात गल्लत होत आलेली आहे चातुर्वर्ण्य अनादि असो वा नसो, पण उत्क्रान्तिवादाप्रमाणे प्राणिकोटीचा विकास होता होता अखेर नक्र,चोपई, गरुड आणि मनुष्य हे जसे चार वर्ग ठरले, त्याप्रमाणे एकदा चातुर्वर्ण्य ठरल्यानंतर तरी प्रत्येक वर्णानें आपला वंश शुद्ध राखला आहे कीं गुणविकासानें मध्यतरीं चोपईचा नक्र किंवा गरुडाचा मनुष्य अथवा ह्याच्या उलट वर्गांतर झाले आहे, ह्या सर्व गोष्टींचा विचार त्या काळच्या धर्मसुधारकापुढे होता.

· सामाजिक, भौतिक इत्यादि शास्त्रात कालांतराने व स्थित्यंतराने बदल होण्याचा संभव असतो, तशी गोष्ट तत्त्वज्ञानाची नाहीं तत्त्वज्ञान देशकाल व परिस्थिति याची परवा करीत नाही. कित्येक असें समजतात की, चिज्जड भेद, जीवेश्वरसंबंध आणि द्वैताद्वैतविवेक असे ठराविक प्रश्न गणितातील आवर्तांप्रमाणें तत्त्वविवेचनात नेहमीं तेच तेच येत असतात कधींच निश्चित उत्तर न मिळणारा असा तो एक प्रगमन-हीन व्याप आहे. यामुळें समाजशास्त्राच्या किंवा भौतिकशास्त्राच्या वाढी-बरोबर तत्त्वज्ञानाचीही वाढ होऊ शकते, ही गोष्ट पुष्कळ लोक मान्य करीत नाहींत. तत्त्वज्ञानाचे प्रश्न मानवी बुद्धीस कधींच सुटण्यासारखे नाहींत, अथवा तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त त्रिकालाबाधित आहेत, असें काहींतरी गृहीत धरून लोक त्याची अधिक चिकित्सा करीत बसत नाहींत. तें काही असो. तत्त्वज्ञान हा दयानंदाचा तरी आवडीचा विषय दिसत नाही. कोंकणातील घाट्याप्रमाणें तत्त्वज्ञानाचे कमीअधिक उचींचे टप्पे असतात अर्थात् तत्त्वज्ञानाच्या फार उच्च उच्च टप्प्यावर जसजसें जावें तसतसे रूढीच्या किंवा परंपरेच्या नागमोडी प्रवाहाचीं कित्येक सुंदर वळणें अस्पष्ट किंवा दृष्टिआडही होण्याचा पुष्कळ संभव असतो सामा-जिक स्थितीचें स्पष्ट व्यावहारिक ज्ञान उच्च भूमिकेवरून व्हावें तसें होत नाहीं. यामुळें

आजपर्यंत झालेले कित्येक दर्शनकार, स्मृतिकार, भाष्यकार किंवा इतर धर्मशास्त्रज्ञ यांनीं वेगवेगळ्या भूमिकेवरून केलेले उपदेश परस्पर भिन्न असे दिसतात ह्या भेद जसा सांगणाऱ्यांच्या भूमिकेमुळें उत्पन्न होतो तसाच तो ऐकणारांच्या अधिकाराच्या अपेक्षेनेंही बुद्धया अगिकारावा लागत असतो यामुळें अमुक पूर्ण आणि अमुक अपूर्ण, एक शहाणे आणि दुसरे मूर्ख असें ठरवितांना बराच विचार करावा लागतो. उत्कृष्ट वक्त्यांची रसवती वाणी तान्ह्या मुलाजवळ बोलताना बोबडी आणि अर्थहीन अशीही भाषा वापरते

सर्वेषा प्रस्थानकर्तॄणा मुनीना विवर्तवाद–पर्यवसाने-नाद्वितीये परमेश्वर एव प्रतिपाद्ये तात्पर्यम । न हि ते मुनयो भ्रान्ताः सर्वज्ञत्वात्तेषाम् । किन्तु बहिर्विषय-प्रवणानापाततः पुरुषार्थे प्रवेशो न सभवति इति नास्तिक्य–वारणाय तैः प्रकारभेदाः प्रदर्शिताः । तत्र तेषा तात्पर्यमबुद्ध्वा वेद विरुद्धेऽप्यर्थे तात्पर्यमुत्प्रेक्ष्यमाणास्त-न्मतमेवोपादेयत्वेन गृण्हन्तो जना नानापथजुषो भवन्तीति सर्वमनवद्यम् ।।

**भावार्थ**—सर्वप्रस्थानकर्त्या मुनींचे विवर्त वादाकडे पर्यवसान असल्यामुळें अद्वितीय परमेश्वराचे प्रतिपादन करण्याकडे तात्पर्य आहे ते मुनि भ्रात झालेले आहेत अशी कल्पना करणे ठीक नव्हे, कारण ते सर्वज्ञ होते बाह्य विषयाकडे गढून गेलेल्या जीवाचा सहज रीतीने पुरुषार्थात प्रवेश होणार नाहीं, यासाठीं त्याची नास्तिकता निवारण करण्याकरिता त्यानी प्रकारभेद दाखविलेले आहेत परतु मुनींचा अतरहेतु न जाणल्याकारणामुळे त्याच्या उघड म्हणण्याचे तात्पर्य वेदविरुद्ध असताही तें त्याचेंच खरे मत मानून, व ग्रहणीय आहे असे समजून लोक नाना पंथाचे होतात ह्या मधुसूदनसरस्वतींच्या उताऱ्यात दर्शविलेल्या अन्वयपद्धतीनेच विचार करून दयानदसरस्वतींच्या मनोभूमिकेची उची आणि खोली तत्कालीन समाजस्थितीच्या सापेक्षत्वानेंच अजमावली पाहिजे असेंही कोणी म्हणतील.

दयानदानी गुरुगृह सोडल्यानतर काही कालाने पुढील कार्याची रूपरेषा अजमाविली त्या वेळी हिंदु आपले राज्य तर गमावून बसलेच होते, पण इग्रज सरकारनीं राखलेल्या धर्म-राज्यातही जिकडे तिकडे अज्ञान, द्वेष, धर्मवेड, आपत्ति आणि जुलूम याची बजबजपुरी पाहिल्यामुळें त्याना स्वताला एकातिक अशा शातीची इच्छा राहिली नाहीं ते स्वातंत्र्याचे भोक्ते होते पण त्याना त्या वेळीं असें दिसून आलें कीं, ज्या आपल्या मायभूमींत एका काळीं परमोच्च विचार, शुद्ध नीति आणि अत्यंत उदात्त परंपरा चालत होत्या, ती वेदांची आणि उपनिषदाची भूमि, ती कपिल,

कणाद व गौतमांची भूमि, ती पतजलि व व्यासाची भूमि, ती युधिष्ठिर व रामाची भूमि, ती कुमारिल व शंकराचार्य यांची भूमि, अशा त्या भूमींत सर्व अनास्था पसरली असून मन्त्रद्रष्ट्या ऋषीचे व दर्शनकारांचे गोत्रज, मनु आणि याज्ञवल्क्य यांचे वशज, अज्ञान व मोह यात बुडाले आहेत पूर्वीचें विचारस्वातंत्र्य व आत्मस्वातंत्र्य आतां राहिलें नाहीं वास्तविक धर्मगुरूच्या मध्यस्थीवांचून आणि दुसऱ्या कोणत्याही आध्यात्मिक अगर धार्मिक बंधापासून जे मुक्त असावयाचे त्या आर्यांनीं ३३ कोट देव आपल्या डोक्यावर निर्माण केले असून तितक्याच धर्मगुरूचे पारतन्त्र्य मानण्यापर्यंत मजल आली आहे! अशा रीतीने अधश्रद्धा, अधानुकरण, स्वतत्र विचारांचा अभाव इत्यादि दैन्य पाहून त्याचें अतःकरण व्याकुळ झाले तत्त्वतः ते एक जबरदस्त मूर्तिभजक होते हिदूच्या अवनतीचे मुख्य कारण मूर्तिपूजा असे त्यांस वाटे, [ असे कोणी-मानतात. ] मूर्तीच्या देवळापेक्षा विभूतिपूजन, रूढि, आणि धर्मवेडे यांनी भारलेल्या हिंदूच्या मनावर त्याचा फार कटाक्ष होता मृतप्राय शांतीस उराशीं घेऊन बसलेल्या हिंदूचा त्यांस वीट आला ससारांत राहून मनोविकारावर ताबा चालविण्याची लढत न जिकता षड्विकारांस भिऊन पळणाऱ्या भीरूची त्यांना कीव आली. ते स्वतः जयशाली वृत्तीचे होते व लोकांनाही तसेच बनवावे असें त्यांस वाटत होते आकाशभेदी हिमालयाच्या वर्फाच्छादित शिखरांशी सगत करून त्यानीं हेच विचार केले, गगा आणि नर्मदा यांच्या प्रवाहाबरोबर त्यांचा हाच विचारांचा ओघ वहात राहिला अभेद्य अरण्यांत शिरून त्यांनी ह्याच गूढ रहस्याचा उलगडा केला आणि हिमालयांतील उच्च देवदार वृक्षांवर रात्रीच्या रात्री काढून त्यांनीं याच उच्च विचारांचे चिंतन केले.

दयानदानी कार्यारंभीं पुन्हा हिमालयाच्या सत्सगतीत बसून तत्कालीन समाजस्थितीचा व ती सुधारण्याच्या उपाययोजनांचा विचार केला भूतकालावरून नजर फिरवून दयानदांनीं वर्तमान कालाकडेही आपली दुर्बिण फिरविली. तीं त्या काचेंतून त्यांना मुबई आणि कलकत्ता शहरच काय, पण बर्लिन आणि न्यूयॉर्क हीं शहरेंही जवळ दिसूं लागलीं त्यांनीं आपला समाज आणि आपले समाजसुधारक यांच्याकडे एकदां निरखून पाहिलें. वेध घेणाऱ्या ज्योतिर्विदास खग्रास ग्रहणाचा काळ हा जसा एक योगच होतो, त्याप्रमाणे स्वातन्त्र्यसूर्यास लागलेल्या ग्रहणाच्या सन १८५७ सालानंतरच्या खग्रास काळांत वेध घेणाऱ्या दयानदांनीं ह्या उत्तर भारत महा-

मंडळावरील काळे डागही पाहिले. जेथें पूर्वी राम–युधिष्ठिर, जनक–जनार्दना-सारख्या पुण्यश्लोकाची आणि अशोक व हर्ष, चद्रगुप्त व समुद्रगुप्त अशा सम्राटाची राज्यें होतीं, तेथे महर्गता व मत्सर ह्या ज्वालामुखींचीं उघडी पडलेलीं तोंडें त्यानी पाहिली! क्वचित् कोठे दिसणारी हिरवळ ही बडाच्या वेळी इग्रजास मदत केल्यामुळें बचलेल्या सस्थानिकाच्या उद्यानातच असून विस्तृत गायराने उजाड झालेलीं त्यानीं पहिलीं. सरस्वती नदींतील पाडित्याचे खडक आणि अर्थहीन घोकपट्टीचे गोटे उघडे पडलेले दिसत होते नलदादि विद्यापीठातील आदित्य ब्रह्मचाऱ्याची चमक कोठेंच दिसत नव्हती. अग्निहोत्राचा धूर क्वचित्च कोठे निघत होता कारखान्यातील गिरण्यातून निघणारे सोन्याचे धूर तर कोठेच दिसत ना ब्रह्मजिज्ञासा आणि धर्मजिज्ञासा याच्या आचेचें तेज काळया डागात लोपले होते लाखो गरिबाची धाब्याची व कुईटारू झोपडीं मुग्याच्या वारुळाप्रमाणे किवा वाळलेल्या काटेरी झुडुपाप्रमाणें बहुतेक जमिनीस टेकलेली दिसत असता त्यापासून दूर अतरावर कोठे कोठें जैनाच्या आणि शैव वैष्णवाच्या मदिराच्या उच्च शिखराचे सोन्याचे कळस स्मशान-वेलीच्या कर्णिकेप्रमाणे भेसूर दिसत होते धर्मविधींच्या मोठ्या आणि खोल अशा पुष्करण्या आणि तलाव कोरडे पडल्यामुळे खाचा झालेल्या डोळयाप्रमाणे निष्प्रभ आणि ओंगळ भासत होते बालविधवाचा धुमसत असणारा कामाग्नि, पतिताचा रक्षाच्छादित द्वेषाग्नि, पडितांचा दाहक मदाग्नि आणि अरक्षिताच्या धर्मांतराचा सुसह्य मोहाग्नि, असे हे पंचाग्नि गावोंगाव धुमसत असलेले दिसत होते. आणि त्यावर जणु प्रळयकाळच्या सूर्याप्रमाणें दुर्दैवाचा कोपाग्नि तळपत होता! असा ह्या दयानदांनी स्वग्रहाचा वेध घेतला तोच त्याना वेध लागला आणि ह्या दुर्दैवाच्या ग्रहणातून सुटका होऊन मोक्षकाल लवकरच यावा म्हणून त्यानी स्वतांचें जणु काय बलिदान करण्याचे ठरविले अशना, पिपासा या दोन मागिणी जवळ येऊन [ तमशनापिपासे अब्रूतामावाभ्यामभिप्रजानीहीति —ऐ०, २-५] अधिष्ठानाचे दान मागू लागल्या. तेव्हा त्या अस्पृश्यांची दयानदास दया येऊन त्याना नवभारताचे ज्ञान व बल हे अधिष्ठान दिले. त्याबरोबर मृग जळाच्या मागें लागलेल्या हरणांच्या झुडीच्या झुंडीप्रमाणें वेदोक्ताची नवीन तहान लागलेल्या लोकांचे थवेच्या थवे त्याना भेटले. त्याना चुळका चुळका तरी ज्ञान-गंगाजल पाजावें म्हणून तीर्थोपाध्यायांचे घरी जाऊन त्यांच्याकडील खाते-

वह्यांस येणारांचे गोत्र विचारतां, [नाहमेतद्वेदतात यद्गोत्रस्त्वमासि—छां०, ४ ४-२] 'बाबा तुझे गोत्र काय तें मला माहीत नाही' असें त्यानी साफ सागितले. तेंव्हा त्या सत्यकामाच्या गोत्रावळीचा पत्ता लागेपर्यंत ते तीर्थोपाध्याय दाद देत ना! कोठे तीही अडचण कश्यपाने दूर केली असता पुढे असे आढळले की, त्याच्याकडील वेदामृताच्या गगाजळीना अधिकारवादाची बसलेली लाखणे बरेच दिवस उपयोग न झाल्यामुळे इतकी किटून गेली होती की, त्यातून एक थेंबही बाहेर निघेना! तसेच आणखी असे आढळले की, ज्यास वाछा राहिली नाही, अशा आळस आणि ऐदीपणा यानी अग्निमाद्य झालेल्या योगभ्रष्टापुढे षड्रसान्नाची ताटें व्यर्थ पडलेली असून बाहेर जमलेल्या भिकाऱ्यास उष्ट्या पत्रावळीही चाखण्यास मिळतना अशी ही उद्वेगकारक परिस्थिति पाहून विटलेल्या आचाऱ्याप्रमाणे, हे उत्कृष्ट अन्न बाहेरच्या क्षुधितास तरी चारावे, ते चवीने सेवन करतील, असे दयानद आचार्यास वाटले असावे. मग " अथातो धर्म जिज्ञासा " [पूर्वमीमासा], " अथातो धर्मव्याख्यास्यामः " [वैशे.], " अथायोगानुशासनम् " [योग], " अथत्रिविधदुःखात्यन्तनिवृत्तिरत्यन्त पुरुषार्थः", [साख्य] " अथातो ब्रह्म जिज्ञासा " [वे सू], " ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत " [छादोग्य], इत्यादि पुरणाच्या पोळ्याच्या चळतींची ब्राह्मणापासून अतिशूद्रापर्यंत सर्वांस सरसहा [ब्रह्मराजन्याभ्या शूद्राय चार्याय च स्वायचारणाय —यजु०, २६।२८] खैरात करावी असे त्याच्या उदार मनास वाटलें असावे.

भलतेच सूर भलत्याच वेळी काढले असता त्या बदसुरानी अतरिक्षातील असुर जागे होतात अशी समजूत आहे त्याप्रमाणे " विकार हे केवळ वाणीचें अवलबन आहे. मृत्तिका हेच केवळ सत्य आहे." [ वाचारभण विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ॥—छा०, ६।१।४ ] किंवा [ नाह मन्ये सुवेदेति नो न वेदेति वेद च ॥ यो नस्तद्वेद तद्वेद नो न वेदेति वेद च ॥—केन०, २।२]. भावार्थः— " मला ब्रह्म नीट समजलें नाही हें मला समजलें. ब्रह्म समजले नाही असें नाहीं, समजलें असेंही नाहीं आमच्यापैकी ज्याला हें म्हणणे कळले त्याला ब्रह्म समजलें." असल्या क्लिष्ट आणि अप्रासगिक घोषणेने आळस व महर्गतेचे राक्षस मात्र उत्तेजित होत आहेत, असा त्याचा अनुभव असावा. शिवाय बुभुक्षित होत चाललेल्या हिंदुस्थानाकडे पाहून त्यांच्या मनात प्रथम हें आलें असावें कीं, उदरभरण ह्या आद्ययज्ञकर्माकडे अगोदर लक्ष दिलें पाहिजे. वावटळा-

सारख्या साऱ्या चळवळी आणि भयंकर खटाटोपाची आंच ही केवळ या पोटासाठीं आहेत. ती पोटे संस्कृत नसून असंस्कृत असली तरी त्या सर्वास वेळेवर आहुति दिलीच पाहिजे कारण ती जठराग्नीची आद्य स्थानें आहेत

**व्रात्यस्त्वं प्राणैकऋषिरत्ता विश्वस्य सत्पतिः ॥**

**वयमाद्यस्य दातारः पितात्वं मातरिश्वनः ॥** —प्रश्न,१९।२।११.

प्रश्नोपनिषत् सांगतें कीं, हे प्राणा, तू आद्य असल्यामुळे तुझा संस्कार कोणीं केला नाही सर्व हविर्भक्षण करणारा एकर्षि नामक अग्नि तू आहेस, तू विद्यमान् विश्वाचा पति आहेस आद्य अशा तुला हवि देणारे आम्ही आहोत वायूचा देखील उत्पन्नकर्ता तू आहेस प्राण आणि अन्न हेंच ब्रह्म असे प्रातृर्दादि अनेक ऋषि म्हणत आले आहेत 'सर्वारंभास्तंडुलाप्रस्थमूलाः ।' हे वचन तर लोकप्रसिद्धच आहे ज्यास प्रेयाचा अनुभव नाहीं आणि श्रेयाची कल्पनाही नाही, त्यांनी [ श्रेयो हि धीरोऽभिप्रेयसो वृणीते प्रेयो मन्दो योगक्षेमाद्वृणीते ।—कठ०, २।२ ] " बुद्धिमान् मनुष्य प्रेयाहून श्रेय पसंत करतो, आणि मंद मनुष्य योगक्षेमाला साधन म्हणून प्रेय पसंत करतो " हे वाक्य उराशी घेऊन उपयोग काय? [ आनंदो ब्रह्मेतिव्यजानात् ।–तैत्ति०, ३।६ ] आनंद हेंच ब्रह्म आहे, हे जाणण्याचा अधिकार येण्यास अगोदर [विज्ञानं ब्रह्मेतिव्यजानात् ॥–तैत्ति०,३।५] विज्ञान हेंच ब्रह्म आहे–हे जाणले पाहिजे षडैश्वर्यसंपन्न भगवानाचे दर्शन होण्यास बल, आरोग्य, आयु, संतति, संपत्ति व स्वातंत्र्य अशा षडैश्वर्यांनी संपन्न भारतभक्त तयार झाला पाहिजे. [ कुर्वन्नेवेहकर्माणि जिजीविषेच्छत समाः ॥—ईशः, २ ] या लोकी याप्रमाणे ईश्वरार्पण बुद्धीने कर्मे करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी किंवा [अदीनाः स्यामशरदः शतम् । य०, ३६।२४] [बुध्येम शरदः शतम्, अथर्व०, १९।६७ ] आम्ही दैन्यावाचून शंभर वर्षे ज्ञान संपादीत रहावे हीच खरी महत्त्वाकांक्षा पाहिजे वेदोत्तरकाळी धर्माधर्मांचे गुंफलेले जाळे मनुष्यकृत व मनःकल्पित आहे. तें [ यथोर्णनाभिः सृजते गृण्हते च ।–मुंड०, १।१।७] कोळी आपले जाळे विणतो आणि तेंच पुन्हा आवरतो, त्याप्रमाणे आपले आपणच आवरले पाहिजे. शुद्धाशुद्धतेची, स्पृश्यास्पृश्यतेची चिकित्सा ह्या आपत्काळी घातक आणि लज्जास्पद आहे. [ आपत्कालेतु सम्प्राप्तेशौचाऽऽचारनचिंतयेत् । शुद्धिं समुद्धरेत्पश्चात् स्वस्थोधर्मं समाचरेत् ॥–पराशर, ७-४३ ] आपत्काल प्राप्त झाला असतां आचारशुद्धीबद्दल फारशी चिकित्सा करीत बसू नये. पुढे स्वास्थ्य प्राप्त

झाल्यावर सावकाश धर्मशुद्धीचा विचार करता येईल तात्पर्य, धर्माचरणांतलें स्पृश्यास्पृश्यादि विचिकित्सक धर्माचें एक टोंक आणि [ अमात्रश्चतुर्थोऽव्यवहार्यः- मांडू० ५।१२ ] हे तुर्यावस्थेचे अलौकिक असें दुसरें टोंक, ही दोन्ही टोंके सोडून देशकालानुसार धर्माचा सुवर्णमध्य शोधावा अशी दयानदाची त्यावेळीं मनःप्रवृत्ति झाली असावी. किंबहुना आपत्कालाच्या भयंकर ओढीमुळे त्याचा विचाराचा गुरुत्वमध्य निःश्रेयसापेक्षा प्रकृत अभ्युदयाकडे बराच जास्त झुकला असावा असे दिसते

अशा मनःस्थितींत त्यानी ह्या प्रकरणाच्या आरंभी लिहिल्याप्रमाणे प्रार्थना ईश्वरास केली असावी धर्मशास्त्रापलीकडे भारतीय समाजशास्त्र असे वेगळे नाही. यामुळे त्याना इष्ट असलेली समाजोन्नति साधण्यास धर्मसुधारणा हाच उपाय योजणे जरूर होते हिंदुस्थानात अभ्युदयाची सुखस्वप्नेही धर्माच्याच भाषेंत पडत असनात येथें कर्म म्हणजे शास्त्रीय कर्म हें जवळ जवळ गृहीतच धरलें जाते फल म्हणजे अदृष्ट फल असेच भाविकाचे आणि कर्मठाचे मत असते. शास्त्रीय कर्मावाचूनही दृष्टफळ मिळत असल्यामुळें शास्त्रीय विधि दृष्टफलक नसतात असेंच ते मानतात. [ विनापिविधिना दृष्टलाभान्नहि तदर्थता-जैमिनी ] जो आपणास उघड रीतीनें नास्तिक किंवा धर्महीन म्हणवून घेण्यास तयार नाहीं असा प्रत्येक हिंदु-त्यास वेदातील एक अक्षरही ठाऊक असो वा नसो तरी वेदच प्रमाण मानीत असतो

अशी ही जरी सामान्य श्रद्धावान् जनतेची स्थिति असली, तरी ज्या विद्वान् आणि वजनदार शिष्टाच्या साह्याने सुधारणा घडवून आणणें दयानंदास इष्ट होते, ते नवे विद्वान् जुन्या विद्वानापासून दक्षिणोत्तर ध्रुवाप्रमाणें दूर होते. एक [ वेदोऽखिलो धर्ममूलम् ।-मनुः, २।६ ] वेद हेच धर्माचे मूळ आहे असे सागणार. तर दुसऱ्याची मजल [त्रयो वेदस्य कर्तारो भण्डधूर्तनिशाचराः॥-चार्वाक, ९.] वेदाचे कर्ते भाडखोर, लबाड आणि निशाचराप्रमाणे निरर्थक वल्गना करणारे होते, असे म्हणण्यापर्यंत जाणार. [आप्तोपदेशः शब्दः ।-न्याय.] असें शब्दप्रामाण्य एक सागणार तर दुसरे [प्रत्यक्षमनुमानं च प्रमाण द्वितय तथा ।---बौद्धदर्शन.] प्रत्यक्ष व अनुमान ही दोनच प्रमाणें सागून थाबणार. अशा स्थितींत सर्वांची तोंडमिळवणी करून मी सर्वांना प्रिय होईन ही दुराशाच होती. जुने पंडित तडजोडीस पुढें येणे सभवनीय नव्हतें, यामुळें नवे पदवीधर हातीं धरणेंच ओघास आलें. ब्राह्मण तर हातांशीं येतना व सस्कारलोपा-

मुळे क्षत्रियवैश्य हेही वर्ण हातास लागतना अशा स्थितींत गल्लत करून चौघांत डाव वाटावा, अशी चातुर्वर्ण्याची नवीन सघटना करणें त्यांच्या वैदिक महत्त्वाकांक्षेस क्रमप्राप्तच होते असें करीत असतां वायूचा द्रव आणि द्रवाचें घन द्रव्य बनताना जसा आकारात सकोच होत जाणे स्वाभाविक असतें, त्याप्रमाणें दयानदांची मी सर्वांना प्रिय होईन ही मूळची विश्वव्यापि कल्पना मूर्ति रूपास येत असता बरीच सकोच पावेल, हे भविष्य त्यास दिसत असल्यामुळे आपल्या धर्ममदिरास मागीलदारून आणि आजूबाजूनेही आत येण्यास दारकसी बसविलेल्या असाव्या असेही त्याच्या मनात आले असावे हिंदु सस्कृतीत सकोच उत्पन्न करणारी मुसलमानी सस्कृति त्याच्या शेजारी होती, त्या उभय सस्कृतींचे एकीकरण करू पाहणारी शीखधर्मसस्थाही नजीकच होती महानुभाव आणि वसव याचे जाति मोडण्याचे प्रयत्न त्यांच्या ऐकिवात होते आणि रामरहीम एकच आहेत हा कवीराचा दडकही त्याना ठाऊक होता. उलटपक्षीं धर्मांतरासाठीं मुसलमानाचे आडदाडपणाचे उघड छापे आणि ख्रिस्त्याचे मोहनास्त्राचे प्रयोग त्याच्या नजरेसमोरच होत होते विलायतेत कंठनासिका आणि फुप्फुसे यातील कित्येक रोग तेथें फार सवग झालेल्या चुबनानीही वाढतात, असे तज्ज्ञ म्हणतात त्याप्रमाणे ख्रिस्तीपाद्र्याच्या प्रेमाने आणि परोपकारबुद्धीनेही हिंदुधर्मावर अनर्थ ओढवतात ! याची पूर्वचिन्हे त्या वेळीही दिसू लागली होती अशा अनेक कारणास्तव त्याच्या सर्वसग्राहक महत्त्वाकाक्षेचा सकोच होणे, म्हणजे तीस काही मर्यादेचे नियत्रण घालण्याची बुद्धि होणे अपरिहार्यच होतें

वाचक म्हणतील की, आम्ही दयानदांचे चरित्र येथे आगाऊच सांगत बसलों आहोत तर त्यांस आमचे उत्तर इतकेंच कीं, घटाच्या पूर्वकल्पनेंत जसा घटाचा आकार येतो, इमारतीपूर्वी तिच्या नकाशात जसे इमारतीचें मान समजून चुकतें, त्याप्रमाणे ज्यास त्याचे अनुयायी युगकर्ते किंवा भविष्यवादी (Prophets) मानतात, त्यांच्या चरित्राचा चित्रपट त्यांच्या दृष्टीने तरी बहुतांशीं त्यांनीं अगोदरच आखलेला असावयास पाहिजे. त्यासबधी विषयप्रवेशाच्या दृष्टीनें अनुमान करीत असतांना पुढच्या कांहीं गोष्टी अगोदरच उघड होणे हें सहजच आहे. आर्य लेखकांनीं जें तत्कालीन परिस्थितीचें चित्र रगविले आहे तें जास्त भडक रंगांत रंगविले आहे, असें आमचें मत आम्हीं वर दर्शविलेंच आहे तसेंच त्या परिस्थितीचा दयानंदांच्या पंथाशीं दाखविण्यांत येतो तितका कार्यकारणभावही नाहीं, असेंही वर सांगितलेच आहे. असें असतां दयानंदांची मनोभूमिका रंग-

वितांना पुन्हा त्याच परिस्थितीचे रंग आम्ही वापरीत आहोत असे वाचकांस वाटण्याचा संभव आहे परंतु परिस्थितीचें जें दर्शन दयानंदांस दिसलें तें कितपत यथातथ्य होतें वगैरे गोष्टींचा विचार येथे न करतां केवळ दयानंदांची भूमिका कशी मानावी लागते त्याचेच दिग्दर्शन केले आहे आणि थोडें बारकाईने पाहिल्यास असे दिसून येईल की, दयानंदांची मनोभूमिका तत्कालीन अनुकूल अगर प्रतिकूल वातावरणास अनुयोगी अगर प्रतियोगी बनत गेली असे मानण्यापेक्षा तिचे प्रस्तर कांहीं त्यांचे स्वभावजन्य व कांही त्यांचे गुरु विरजानंद यांच्या जोरकस संस्कारांनी बनलेले होते, असेच मानणे आम्हांस जास्त पटते पित्याच्या आज्ञेस्तव आईचा वधही करणाऱ्या परशुरामाच्या ठिकाणी जी पितृनिष्ठा दिसते त्याच जातीची गुरुनिष्ठा दयानंदांच्या ठिकाणीं होती आर्ष ग्रंथ आणि प्राचीन ऋषि यांशिवाय तू कोणासच प्रमाण मानू नकोस, ही गुरुजींची शिकवण आणि पाश्चिमात्य संस्कृति आणि भौतिक विज्ञान ह्यांवर छाप टाकण्याची दयानंदांची महत्त्वाकांक्षा, यांचा मिलाफ दयानंदांच्या लोकसंग्राहक बुद्धींत होऊन त्या त्रिवेणीसंगमांत आर्यसमाज मूर्तिरूपास आला यासंबंधी विवेचन यापुढे यथाक्रम यावयाचे असल्यामुळे त्याचा येथे अधिक विस्तार करीत नाही आर्यमतसमीक्षणांत विशेष खुलासा होईल

असो त्या काळी वस्तुस्थिति अशी होती कीं, जुन्या पंडितांस सोडून ज्या नवीन पदवीधरांस दयानंदांना हातीं धरावयाचे होते, त्यांची निष्ठा व दयानंदांची निष्ठा ह्या मूळांत भिन्न होत्या स्वतःच्या निष्ठेमुळे म्हणा किंवा गुरुजींच्या आज्ञेनें बांधले गेले होते म्हणून म्हणा, हिंदु-समाजाच्या अंधश्रद्धेच्या अनुकूलतेमुळे म्हणा अथवा कित्येक [अग्निहोत्री, फर्कुहार वगैरे] तर्क करीत असतात त्याप्रमाणे जुनी परंपरा ज्यांत विधान पावली आहे असें दुसरें सोयीचें वाङ्मयच नसल्यामुळे नाखुषीनें म्हणा, दयानंदांनीं वेद हेच आपल्या समाजाच्या इमारतीस पायाभूत मानले; परंतु तत्कालीन सुशिक्षितांची निष्ठा वेदांपेक्षांही भौतिक शास्त्रावरच अधिक होती. अर्थात् समाजसुधारणेसंबंधीं दोघांचा दृष्टिकोन आणि उपाययोजनाही भिन्न होणार होत्या आमच्या देशाचा भावी अभ्युदय मागून मिळणार नाहीं. तो मिळविण्यास आपण समर्थ झालों कीं तो न मागतांच प्राप्त होईल, हे दोघांसही कबूल होतें. तसेंच अभ्युदयप्राप्तीकरितां आमच्या आर्यावर्तांतील हिंदुसमाज उत्कृष्ट बल, दीर्घायु, व्यापक ज्ञान आणि सदृढ व पुष्कळ संतति यांनीं समृद्ध झाला पाहिजे याबद्दलही मतभेदाचा संभव नव्हता. परंतु बलाकरितां एकानें

शाकाहार आणि यमनियमादि साधने सांगावीं आणि दुसऱ्यानें आधुनिक षड्रस म्हणजे प्रोटेन्स, कर्बो हायड्रेटस्, फॅटस्, क्षार, पाणी आणि व्हिटॅमिन्स सांगून " न मांस भक्षणे दोष. " हें मनुवचनही वाटल्यास पुढे करावे. दीर्घायुष्यासाठीं एकाने ब्रह्मचर्य सांगावे, तर दुसऱ्यानें असंभोगी जीवकोटी लवकर नाश पावते हा प्राणिशास्त्राचा आधुनिक सिद्धान्त सांगावा व्यापक ज्ञानासाठीं एकाने सर्वज्ञ वेदाचें नाव सांगावे तर दुसऱ्यानी भौतिकशास्त्राच्या ज्ञानावाचून सारे व्यर्थ आहे असें म्हणावे सुप्रजानिर्मितीबद्दल आणि संततिनियमनाबद्दलही दोघांच्या उपाययोजना तितक्याच भिन्न स्वदेशातील हजारो विधवा सुप्रसू होण्यास समर्थ असता जनरूढि त्यांच्या सौख्यास व सुप्रजावृद्धीस आड येत आहे, असे म्हणून एक नियोग तर दुसरे विधवाविवाह असे इलाज सुचविणार सर्व राष्ट्रभेद, धर्मभेद, वर्णभेद किंवा पंथभेद हे नाहींसे होऊन पुढे मागे पृथ्वीवरील साऱ्या मानवकोटींचा एकच समाज केव्हा तरी होणे शक्य असेल तर त्यास देशकालावच्छिन्न असे परमात्मज्ञान हेंच कारण होईल असें एक सांगणार, तर दुसरे काल आणि अवकाश ह्यांस आपल्या काबूत आणण्याचें अद्भुत कार्य भौतिक शास्त्रानीच चालविले आहे असे ठासून सांगणार 'जन्माद्यस्ययतः' ह्या सूत्राने एकास ब्रह्मबोध होणार तर दुसरा सूर्यगोल ह्याच लक्ष्यार्थ मानणार तात्पर्य, अविद्यायामृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥ [यजु०, ४०।१४.] या वेदवचनातील जोडीप्रमाणे वेदविद्या कीं भौतिक शास्त्रें यापैकीं खरे शास्ते व मार्गदर्शक कोण ? भौतिक शास्त्र हीच खरी विद्या कीं वेदविद्या हेंच खरे शास्त्र ? किंवा दोन्ही परस्पर भिन्न असून परिणामीं एकच ध्येय साधणारीं आहेत असे हे प्रश्न त्या वेळी धर्मसुधारकांपुढे होते दोन्ही पक्ष प्रबल होते किंबहुना ओल्या इंधनानी पेटविलेल्या अग्नीपासून सर्वत्र धूर पसरतो, त्याप्रमाणे हे महानूभूत जो परमात्मा त्याचा हा ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराण, विद्या, उपनिषदे (ब्राह्मणातील) मंत्र, सूत्रें, मंत्रविवरणे, व्याख्याने इत्यादि सर्व निश्वास होत. [स यथार्द्रैधाग्नेरभ्याहितात्पृथग्धूमा विनिश्चरन्त्येव वा अरेऽस्य महतो भूतस्य निश्वसितमेतद्यदृग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरस इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानान्यस्यैवैतानि सर्वाणि निश्वसितानि ॥—बृह०, २।४।१०.] ह्या सिद्धान्तापेक्षा भौतिक शास्त्रें अनुभवसिद्ध आहेत हेंच नवशिक्षितांस लवकर पटण्यासारखें होतें. अशा स्थितींत [परोक्षप्रिया इवा हि देवाः प्रत्यक्ष

द्विषः। शतपथ.] देवांना परोक्ष प्रिय असतें तसें प्रत्यक्ष नसते. ह्या वचनाचा उभय-पक्षीं चरितार्थ होऊं लागला. परकीय विज्ञान आणि संस्कृति परोक्ष असल्यामुळें सुशिक्षितास अधिकच हवीशी वाटली. पण तें विज्ञान परोक्षतेनें वेदातच वर्णिलें आहे, असे मत दयानदानी उचलल्यामुळे उभयताही निरनिराळया तऱ्हेनें परोक्ष-प्रियच झाले. तात्पर्य, भौतिकशास्त्रे हीच खरी विद्या नसून वेदविद्या हेंच ज्ञान-विज्ञानात्मक पूर्ण शास्त्र होय, असे दाखविण्याचा बोजा दयानदानी आपल्यावर घेतला तसेच पारलौकिक सुखाची आशा किंवा अदृष्टाचा मोह आधुनिक चिकित्सकास वाटण्यासारखा नसल्यामुळे वैदिक विधि हे दृष्टफलक आणि सद्यःफलदायी आहेत, असे दाखविणे त्यास जरूर भासले असावें ह्या दृष्टीनेंच त्यानीं पुढे भगीरथ प्रयत्न केले. प्राचीन वैदिकाच्या वेदीतून विज्ञानगंगा वहाती करीन आणि वेदाची पुष्पितावाचा फलित करीन अशी त्यानीं दुर्धर ईषणा मनी धरली ती कितपत सिद्धीस गेली ते पुढे यथाक्रम कळेलच

ह्याप्रमाणें नवशिक्षित समाजधुरीणाचे पूर्वग्रह आणि तत्कालीन सामान्य वस्तु-स्थिति ह्यात अगदींच पालट करणें अशक्य झाल्यामुळे धर्मशास्त्राचे नियम आणि तत्कालीन सामाजिक स्थिति यातील अंतर शक्य तितके कमी करण्याचे धोरण त्यास ठेवावें लागले. असें हे धोरण त्यानीं अंगीकारल्यामुळें त्याच्या गुरूपदिष्ट अनन्य-साधारण वैदिक निष्ठेस शाब्दिक मान्यता देण्यास नवशिक्षितांनीही फारसे आढेवेढे घेतले नाहींत कारण त्या निष्ठेंत याच्या दृष्टीनें दुसरें काहीं विशेष नसले तरी स्वाभिमान म्हणजे राष्ट्राभिमान जागृत ठेवण्यास ती फार उपयोगी होती. शिवाय अनेक देवता आणि विधिविधानें यावर विभागलेली धर्मभावना कोठे तरी एके ठिकाणी केंद्रीभूत होणे हेही त्यास इष्टच होतें. धर्मसुधारकानें धर्मसुधारणा घडवून आणीत असता समाजाच्या भूमिकेच्या फार पुढें किंवा वर असून त्याचा उपयोग होत नाही म्हणूनच श्रीरामकृष्णास मानवदेहधारी होऊन जनतेप्रमाणेच प्रायः वर्तावे लागले. या लोकसंग्राहक तत्त्वास अनुसरूनच मतभेदास अवसर कमी रहावा म्हणून त्यानीं आपली प्रामाण्याची सांप्रदायिक सहितेची पोथी आटोपशीर केली आणि उलट आर्यपदाची म्हणजे त्यास लागणाऱ्या गुणकर्मांची मर्यादा अत्यंत व्यापक आणि सुलभ करून साऱ्या हिंदूंसच काय पण अखिल मानवकोटीस त्यानीं आपल्या स्वत्वाच्या उंबरठ्यावर उभें राहून या या म्हणून हाक मारिली.

स्वानंदसाम्राज्याची म्हणा अथवा हिंदी स्वराज्याची म्हणा, सत्तेची दिल्ली तर फार दूर होती, पण ती प्राप्त होण्याकरिता जरूर तें सामर्थ्यही दुरावले आहे तें कसें मिळवावे, हा विचार सन १८५७ साल ज्यांनीं पाहिले त्याच्या मनांत उभा राहणे अगदीच स्वाभाविक होते 'यथा राजा तथा प्रजा' हा अनुभव स्वराज्यातील असेल, पण परराज्यात 'यथा प्रजा तथा राजा' हा अनुभव घेण्यास लोकानीं शिकले पाहिजे जेथे सारी सुप्रजा आहे तेथे स्वराज्य नसले तरी सुराज्य सुरू होणे प्राप्तच होते तेव्हा ज्यानी दिल्लीची अनेक साम्राज्यें निर्माण केलीं, राखली आणि गाजविलीं अशाच्या विशेषेकरून उत्तरभारतीय वशजानी ज्ञान, बल, आयु, संतति,सपत्ति आणि स्वातंत्र्य हे षडैश्वर्य सपादन करण्यासाठी जोराचा सघटित प्रयत्न करावा ही दयानदाच्या मनाची तळमळ असावी पूर्वीच्या आर्यवीराने दिल्लीपद मिळवून साधल्यास राजसूय यज्ञाचीही महत्त्वाकांक्षा धरावी, त्याप्रमाणे ह्या आर्याच्या सघटनात इष्ट फल मिळवून साधल्यास इतर संस्कृतीवरही विजय मिळवावा, इतकी त्यानी आपल्या धर्मसस्थेची रूपरेषा साधी आणि सर्व सग्राहक ठरविली शिवछत्रपतीना आपल्या बाजूला लोक वळविण्यासाठी ज्याप्रमाणे निरनिराळ्या युक्त्या योजाव्या लागल्या त्याप्रमाणे दयानदानीही निरनिराळी धोरणे बाधली ज्ञाना करिता गुरुकुल शिक्षण, बलाकरिता यमनियम, दीर्घायूकरिता ब्रह्मचर्य, सुप्रजेकरिता अतिप्रौढविवाह व नियोग, सपत्तीकरता भौतिक विज्ञान आणि ह्या सर्वांनीच स्वातंत्र्य अशी त्याच्या धोरणाची रूपरेषा थोडक्यांत सागता येईल विश्वामित्राच्या प्रतिसृष्टीप्रमाणे प्रायः सस्कारहीन झालेल्या समाजातून नवीन संस्कारी चातुर्वर्ण्य निर्माण करण्याचा त्यानी सकल्प केला जादुगार ज्याप्रमाणे खेळाचे आरभीं लोकाचे लक्ष आपल्याकडे आकर्षित करण्यासाठी शाब्दिक अवडबरही उठवितो त्याप्रमाणे स्वामींनी आरभीं विरोधाचे शिग फुंकले. आणि मग वेदाचा गौरव, पौराणिकांचा उपहास, ब्राह्मणाची निंदा आणि अब्राह्मणांचें संस्कारस्वागत, इत्यादि नानाविध साधनाच्या योजनेने सिद्ध होऊन ते आपल्या कार्यक्षेत्रांत उतरले. त्यानंतरही प्रत्यक्ष कार्यांत असता त्याच्या मतांत पालट झाला, त्यांच्या मनोभूमिकेचे रंगही फिरले, त्यांच्या साधनांची गरज वाढली आणि योजना बदलली, असेही प्रकार थोडेफार झाले असतील; परतु ते आपल्या कार्यक्षेत्रांत उतरण्यापूर्वी त्यांच्या आयुष्याचा दीर्घकाल चिंतनांतच गेला असल्यामुळें त्यांनीं आपल्या पुढील मार्गक्रमणाचा अंदाज आणि क्रम हे बरेच बारकाईनें ठरविले असण्याचा संभव

आहे. आणि ते परिस्थितीला अगदीच सोडून असणे शक्य नाही. कारण, दैव पुरुषार्थ वादाप्रमाणे हा संबंध गुतागुंतीचाच आहे यास्तव त्याचेंच कल्पनाचित्र रंगविण्याचा आम्ही वर प्रयत्न केला आहे. किंबहुना दयानदाच्या रगीत चित्रां- तील सार्‍या रंगाचा एकत्र मिलाफ करून ही एक पृष्ठभूमिका तयार केली आहे. तयार करताना कोठे अनेक शास्त्रातील विचारसरणी, कोठे त्यांतील सिद्धान्त- वचनें, कोठे उपमा, कोठे केवळ पारिभाषिक शब्द यांचा उल्लेख झाला असल्यामुळे एक ततुवाद्य छेडल्याने सभोंवारच्या अनेक वाद्यात नाद उठावे, त्याप्रमाणे बहुश्रुत वाचकाच्या अतःकरणांत अनेक शास्त्रीय स्मृति जागृत होतील वेदात ब्रह्मविद्या आहे त्याचप्रमाणे सर्व भौतिकशास्त्रेंही बीजभूत आहेत असा ज्याचा विस्मय- कारक सिद्धान्त त्यांच्या चित्राच्या ह्या पृष्ठभूमिकेवर वेदवेदांगें, दशोपनिषदे, स्मृति आणि अनेक भौतिकशास्त्रें यांतील सिद्धान्तरूप सुवर्णावलीची छटा यावी हे सहजच आहे दयानदगीताचे आरभी त्याची चाल, ताल आणि राग याचा हा येथवर उल्लेख झाला किंवा दयानदकीर्तनाचा येथवर हा पूर्वरंग झाला, असेंही मानतां येईल अथवा त्याहीपूर्वी निरनिराळया तालांत सचार करून सम संभाळण्याची हुरूप धरणाऱ्या तबलजीची हांस पुरविण्याकरिता ज्याप्रमाणे हरिदास एकादे धृपद काढून त्यास साधि देतात, त्याप्रमाणे आम्हीही आपल्या लेखणीला थोडी स्वेच्छेने झिज देऊन पावन केली अनेक स्फुट विचार एकत्र जोडलेल्या ह्या कथेवर बसून दयानदकीर्तनास आता यापुढे आरभ व्हावयाचा आहे, तरी जिज्ञासूनीं सावधानतया तिकडे लक्ष पुरवावे

---

## प्रकरण दुसरें

# मूळशंकराचे दयानंद

**अग्निस्तु विश्रवस्तमं तुविब्रह्माणमुत्तमम् ।**
**अतूर्तं श्रावयत् पतिं पुत्रं ददाति दाशुषे ॥**

—ऋग्वेद, ५।२५।५.

" अग्नि आपल्या उपासकाला एक दिव्य पुत्र देतो, तो अत्यंत कीर्तिमान्, भक्तश्रेष्ठ, अजिंक्य व मातापितरास यश देणारा असा निपजतो "

ह्या भावार्थाच्या ऋग्वेदातील वरील ऋचेने लाला लजपतराय ह्यानी स्वामी दयानदाच्या चरित्राला आरभ केला आहे तो कितपत अन्वर्थक आहे हें पुढील हकीगतीवरून दिसून येईल

काठेवाडांत मोर्वी संस्थानात मच्छुका महानदीच्या काठीं टंकारा नामक एका खेडेगावात इ. सन १८२४ सालीं स्वामी दयानद याचा जन्म झाला. शंकरोपासनेच्या मुळावरच आलेल्या ह्या मुलाचे मूळ नांव मूळशकर असें होतें त्यांचे वडील अंबाशंकर हे संस्थानी नोकरींत जमादारीच्या हुद्द्यावर होते त्यांच्या हाताखालीं शिपाईप्यादे असून त्याचा इतमाम कलेक्टरप्रमाणें मोठा होता. शिवाय ते मोठे जमीनदार असून त्याचा पिढीजाद सावकारीचाही धदा होता. अंबाशंकर हे सामवेदी (औदीच्य) ब्राह्मण होते. ते शिवाप्रमाणे लक्ष्मीचेही उपासक होते. तसेंच अग्नीच्या उपासकाप्रमाणें ते अत्यत कर्मठ व मोठे तामसी होते. दयानदाची आई अशिक्षित पण अत्यत सालस व दयाळू अशी साक्षात् गृहलक्ष्मीच होती ह्या आधुनिक जमदग्नि—रेणुका दपत्याच्या पोटीं अजिंक्य वीरवृत्तीचे परशुरामच पौराणिकाचीं लहानसहान राज्यें पादाक्रांत करण्याकरितां दयानदाचे रूपानें जन्मास आले कीं काय कोण जाणे !

दयानद पाच वर्षांचे होतांच त्यांच्या विद्याभ्यासाला सुरुवात झाली. आठवे वर्षी त्यांचें मौंजीबंधन झालें. दहावे वर्षी त्यांनीं आपल्या वडिलांकडून पार्थिवपूजा घेतली. आणि चौदाव्या वर्षापर्यंत त्यांची यजुःसंहिता पाठ होऊन

शिवाय इतर वेदांतील कांहीं ऋचा व व्याकरणावरील लहान प्राथमिक ग्रंथ त्यांचे म्हणून झाले अर्थात् त्या काळच्या पद्धतीप्रमाणे हे सर्व अर्थहीन पाठांतर होतें. त्यांच्या वडिलांनींही वेदार्थ समजून घेण्याचा फारसा प्रयत्न केलेला नव्हता त्यांचा भर कर्मठपणा, उपासना, मंत्रजागर, अनुष्ठाने, ह्यावर होता आणि आपल्या मुलाचें कोमल वय न पहाता त्याच्यावरही ह्या कडक शिस्तीचा अमल त्यानीं चालविला होता मुलाची जात पाहून आईचा जीव कळवळे, पण अंबाशंकर यांच्यापुढे कोणाचीच मात्रा चालत नसे

अशा रीतीनें दयानंद चौदा वर्षांचे झाले असता माघातील महाशिवरात्रीचा महोत्सव आला त्या दिवशी कडकडीत उपवास व जागरण करून दयानंदानीं व्रत पाळावें असें अंबाशंकर ह्यांनी ठरविले तेव्हा घरच्या मंडळीबरोबर दयानंद हेही रात्रीं गावाबाहेरील एका शिवमंदिरात गेले. पहिले दोनप्रहर सर्व मंडळींनीं जागून काढले पण पुढे एकेक मंडळी झोप व ग्लानि यामुळे पेंगू लागली हळुहळू अंबाशंकरही कलंडले व पुजारीही घोरू लागले. तेव्हा एकटे बाल दयानंद काय ते निष्ठेने जागे राहिले परंतु महेश्वराच्या मायेला तेही रुचले नाही, म्हणूनच की काय त्यांचीही निष्ठा मोहवश झाली आणि ज्या काठेवाडांतील सोमनाथावर महमदाने स्वाऱ्याची आवर्तनें करून शेवटी आपल्या लोहदंडाने त्या रत्नखचित शिवलिंगाच्या ठिकऱ्या उडविल्या असताही जेथील शिवभक्ति नरसी मेहत्यासारख्या शिवभक्ताचे रूपाने खंडी अभंगची अभंगच राहिली, त्याच प्रांतात मोर्वी येथील देवालयातील एका शिवलिंगावर शिवसुताच्या लहानग्या वाहनाने स्वारी केलेली पाहताच त्या गुर्जर शैवाच्या मुलाचे भक्तिप्रेम निराशेमुळे तीव्र द्वेषाच्या रूपांतरांत उलटले !

एका कर्मठ बंगाली शाक्तानें शिवलिंगावर वाहण्याकरितां दिलेले बिल्वपत्र राममोहन ह्यांनीं चुरडून फेंकून दिले, त्यातून ब्राह्मपंथ निर्माण झाला. त्याचप्रमाणे काठेवाडच्या ह्या उदीची ब्राह्मणाने आरंभिलेल्या शिवरात्रीव्रताचा अव्हेर करून बाल दयानंद ज्या पावलीं घरीं परतला त्या पावलानीं त्यानीं आर्यसमाजाच्या भावी इमारतीचा पायाच न कळत मापून टाकला. त्या वेळीं एका पावलाने पौराणिक मत व दुसऱ्या पावलाने अद्वैत वाद याचें आक्रमण करून,तिसऱ्या पावलासाठीं शास्त्रात् 'हठिर्बलीयसि' या वाक्याप्रमाणें बळी बनलेल्या रूढीस ह्या आधुनिक वामनानें आपली मान वांकविण्यास लावले, असेच आर्यांचे मन त्यांस

ग्वाही देत आहे. यामुळें दरसाल शिवरात्रीचा दिवस हा आर्यसमाजाच्या जन्मोत्सवाप्रमाणें आर्य अजूनही पाळीत असतात. असो

मूळशकर देवळातून जो परतला तो तडक घरीं येऊन त्यानें आईजवळून अगोदर खायला मागितलें. आणि आपला उपवास शिवरात्र संपण्यापूर्वीच सोडून तो खुशाल झोंपी गेला. त्यानतर दीर्घकाळ अनेक सुखस्वप्नाच्या तद्रींत गेल्यावर त्याची अखेर जागृति चाळीस वर्षांनी आर्यसमाजात दिसून आली, असे म्हणतात. हा कार्यकारणभाव सर्वांसच सहज पटण्यासारखा नाहीं तथापि ह्या बीजभूत झालेल्या क्षुद्र कथातून अश्वत्थाप्रमाणे अनेक शाखायुक्त वृक्षसंस्था निर्माण होणारच नाहीत असे तरी काय म्हणावे मात्र त्या बीजभूत स्फूर्तीस धार्मिक म्हणावें की अधार्मिक म्हणावे, विवेक म्हणावे की अज्ञान म्हणावें, ह्याबद्दल सर्वांचें एकमत होणे कठीण

त्या महोत्सवाच्या रात्री मूळशकरानें जेंव्हा तो उदीर शिवस्वाचा अपहार करून व शिवलिगावरून उडी मारून जाताना पाहिला, तेंव्हा ज्यास ह्या यःकश्चित् उदराचें निवारण करता आले नाही तोच हा त्रिशूलधारी देवाधिदेव कैलासाधिपति महादेव कसा? असा विकल्प मूळशकराचे मनात उद्भवला लगेच त्याने आपल्या बापास उठवून तो प्रश्न त्यास विचारला. बापानें उत्तर केलें, “ वेड्या, तू म्हणतोस ते शिवस्वरूप आज ह्या कलियुगात अदृश्य आहे; परतु ह्या लिगात त्याची शास्त्रोक्त प्रतिष्ठा केली असून महादेवाचें हें एक प्रतीक म्हणून पूजावयाचें असतें ” परंतु हा त्रोटक खुलासा दयानदास पटला नाहीं याचा अर्थ मूर्तिभजकाचे एक जातभाई सर सय्यद अहमद असा लावतात की, ईश्वराने त्या वेळी त्यास असा आदेश दिला कीं, ‘तू मूळ वेदसहिताचा अभ्यास कर, शहाणा हो आणि तुझ्या धर्मबाधवास मूर्तिपूजेपासून परावृत्त करून एक्या जगदीश्वराच्या उपासनेस लाव’ त्या रात्रीनंतर दयानदाच्या मागची सदाशिवपूजा सदाची सुटली व ते निघटु, निरुक्त व पूर्वमीमांसा ह्याच्या अभ्यासांत गुग झाले. अर्थात् हा अभ्यास राजा राममोहन ह्यांच्या बालपणीं हातीं लागलेल्या ॲरिस्टॉटल, युक्लिड व सुफी ह्या ग्रथांप्रमाणेच श्रद्धाहीन चिकित्सक बुद्धि वाढवून सगुण मूर्तीच्या उपासनेस विरोधकच झाला.

अशा रीतीने टकारा येथील एकोणिसावे शतकातील कोणी पंडित दयानदांस विवेकाचे धडे शिकवीत असतां, दयानंद वयांत येतांच ईश्वरानें त्यास वैराग्याचेही

धडे दिले. एका रात्रीं त्यांचे वडील व ते एका स्नेह्याचे घरी देशरीती-प्रमाणें कोठेंसे नाच-तमाशास गेले असतां, त्यांच्या लहान बहिणीस वाख्याचा उपद्रव झाल्याची एकाएकी बातमी आली लगेच सर्व मडळी घरीं गेली. पुष्कळ इलाज केले, परतु त्याचा काहींच उपयोग न होता, ती मुलगी असह्य वेदना होऊन अखेर मरण पावली घरात दु:खाने हलकल्लोळ झाला! पण दयानदाच्या डोळ्यांस मात्र पाण्याचे टिपूसही आले नाही चार घटकापूर्वी आनदानें खेळत बागडत असलेली आपली बहीण एकाएकी नाहीशी झाली, ह्या अननुभूत प्रसगानें दयानद एकदम गभीर व सचिंत मात्र झाले ह्या गोष्टीस फार दिवस लोटले नाहींत तोंच सुप्रसिद्ध ब्राह्म देवेद्रनाथ याच्या 'दादी मा'प्रमाणें दयानंदावर अतिशय लोभ करणारे त्याचे एक विद्वान् चुलतेही पटकीच्याच आजारानें मरण पावले मरणसमयीं त्यानीं पुढे उभा असलेल्या दयानदाकडे एकवार अत्यत पुत्रवात्सल्याने पाहिले त्याच्या डोळ्यात प्रेमाश्रु आले दयानदाना या वेळीं मात्र शोक अनावर झाला. त्यानी रडून रडून आपले डोळे सुजविले. अखेर त्यांचा तो प्रिय चुलताही त्यांस सोडून गेला ह्या लागो पाठ बसलेल्या यमाच्या दोन अजब तडाख्यामुळें दयानद अत्यत विचारक्रात झाले. आणि ह्या मृत्यूच्या भीतीतून सोडविणारा मोक्ष कशाने प्राप्त होईल हा प्रश्न गौतम-बुद्धाप्रमाणे त्याचे मनास निरतर डांचू लागला त्यानीं तो प्रश्न कित्येक विद्वान् पंडितांस विचारला. तेव्हां त्यांनी 'योगाभ्यास' हा मार्ग त्यांस सुचविला त्या वेळी ते सुमारें एकोणिस-वीस वर्षांचे असतील.

योगाभ्यास म्हटला, की त्यांस गुरूचा आश्रय व एकात ह्या दोन्ही गोष्टींची जरुरी असणारच. दयानदांचें मन त्यांसाठीं उत्कठित झालेले पाहून प्रपंचात मुरलेल्या त्यांच्या आईबापांस चिंता उत्पन्न झाली मुलाच्या ह्या वैराग्याच्या लक्षणांवर ठरीव रामबाण उपाय म्हणजे लग्न असेंही त्यानीं मनात आणले तेव्हा विद्याभ्यासाच्या निमित्तानें दयानंदांनी लग्नाची गोष्ट प्रथम एक वर्षावर टाकली. पण ते वर्ष निघून जातांच पुन्हा तो विषय पुढे आलाच लग्न ठरलें व मुहूर्तही कायम झाला. तेव्हा आतां घरांतून पळाल्यावांचून गत्यतर नाहीं असा विचार करून, लग्नमुहूर्त अगदीं आठ दिवसांवर आला असे पाहून, दयानद एक दिवस घरातून पसार झाले. त्या वेळीं ते एकवीस वर्षांचे असतील. ते लपतछपत आडमार्गानें जात असतां वाटेंत त्यांना कांहीं लबाड लोकांनीं गाठले व ही डर तुझ्याजवळ कशाला असें सांगून त्यांच्या जवळची सर्व चीजवस्त पसार केली.

त्यानतर कित्येक मैल चालून गेल्यावर लाला भगतराम नांवाच्या सत्पुरुषाच्या आश्रमांत ते गेले, व तेथें शुद्धचैतन्य हे नाव धारण करून त्यानीं नैष्ठिक ब्रह्मचर्याची दीक्षा घेतली त्यापुढे ते कौपीन कमडलू धारण करून पुढील प्रवास करू लागले आपल्याला कोणी तरी मार्गदर्शक योगी भेटावा ह्या शोधांत ते होते इतक्यांत सिद्धपूर येथील वार्षिक यात्रेचा दिवस जवळ आला, तेव्हा तेथें जमणाऱ्या साधूच्या मेळयात आपल्याला कोणी योगी भेटतील असे वाटून ते सिद्धपूर येथे नीलकठ महादेवाच्या देवळात उतरले ती बातमी कोणी त्यांच्या वडिलास कळविल्यावरून वडील बरोबर शिपाई घेऊन त्याच्या शोधास आले. शिपायानीं त्यास घेरले अबाशकर अत्यत क्रोधवश होऊन त्यांनीं आपल्या मुलाच्या अंगावरील भगवी वस्त्रे फाडून टाकली आणि असे घरातून पळून जाऊन तुला तुझ्या आईला मारावयाची आहे काय? असेही ते त्याच्या मनास लागेसे बरेंच बोलले मी भलत्याच्या नादी लागून हा मार्ग पत्करला असे सांगून दयानदानी वडिलाची माफीही मागितली परतु ह्या सर्व प्रकारास काही तास लोटले नाहीत तोंच दयानदाच्या विचारानी पुन्हा उचल खाल्ली व वडिलांनी ठेवलेल्या पहारेकऱ्यांचा डोळा लागला आहे असे पाहून दयानदांनी पुन्हा जो पळ काढला, ते पुन्हा कधींच आपल्या घरी गेले नाहीत पहिला दिवस त्यांनी एका पिंपळाचे झाडावर नुसते पाणी पिऊनच काढला दुसरे दिवशी तेथून जे निघाले ते अहमदाबादेवरून बडोद्यास गेले व तेथून नर्मदेच्या काठी एक साधूचा मेळा जमावयाचा होता तिकडे ते निघून गेले तेथे परमहस परमानद नामक एका सत्पुरुषाजवळ त्यांनी वेदातसार, वेदान्तपरिभाषा, आर्याहरिमीडे तोटक, आर्याहरीहर तोटक इत्यादींचा अभ्यास केला

पुढे नर्मदेच्या कांठीं हिंडत असतां चलोदर जवळील अरण्यांत एक दडीस्वामी त्यांस भेटले ते मूळचे महाराष्ट्रीय ब्राह्मण असून त्याचे नाव पूर्णानंदस्वामी असें होतें. ते जाडे विद्वान् व योग्य पुरुष आहेत असे पाहून ब्रह्मचारी शुद्धचैतन्यांनीं त्यांच्याकडून चतुर्थाश्रम घेतला. प्रथम ते दक्षिणी पडित दयानदांस ते गुर्जर म्हणून संन्यास देण्यास कबूल होतना. परतु ब्रह्मचारी वृत्तींत स्वतःचें जेवण स्वतः करावयाचे वगैरे अनेक व्याप असतात, ते सर्व निर्बंध सुटावे म्हणून विशेष गळ घातल्यामुळे त्यांनीं आश्रमदीक्षा देऊन मूळच्या मूळशंकरांस चतुर्थाश्रम देऊन दयानंदसरस्वती हें नामाभिधान ठेवले. त्याच नांवानें ते पुढे प्रसिद्धीस आले. नतर

स्वामी पूर्णानंद यांचेजवळ कांहीं दिवस राहून पुढें ते द्वारकेस गेले. पुढें स्वामी योगानंद, कृष्णशास्त्री, ज्वालानंद पुरी, शिवानंदगिरी अशा अनेक महात्म्यांजवळ कांहीं दिवस राहून त्यांनीं योगाभ्यास केला.

त्याप्रमाणे इ० सन १८४५ ते १८६० पर्यंत पंधरा वर्षे बहुतेक साऱ्या हिंदुस्थानभर त्यांनी पर्यटण केले वाटेंत कोणी योग्य पुरुष भेटल्यास त्यांचेजवळ थोडे दिवस राहून त्याचेकडून विद्या सपादन केली या वेळी त्यांचा सर्वस्वी भर योगाभ्यासावरच होता मोठमोठ्या योग्याच्या गांठी पडाव्या म्हणून त्यांनी हिमालय, विंध्य व अरवली ह्या पर्वतांवरील दाट जगलातील योग्याची वसतिस्थाने धुडून पाहिली गगा, यमुना व नर्मदा ह्या नद्याचे तीर शोधले, त्याचे थेट उगम गांठले ज्या ठिकाणी बर्फावांचून काहीं नाहीं अशा ठिकाणीं अन्नावाचून आणि वस्त्रावाचून त्यांनी दिवसचे दिवस काढले एक दोन वेळां तर प्रवासातील भयंकर कष्टाने त्यांची प्राणातिक अवस्था झाली ! पौष महिन्यातील गगाकिनारीच्या थंड वाळूंत आपण वस्त्रावांचून कसे राहता ? असे एका साहेबाने त्यांस विचारले असतां ते म्हणाले कीं, तुम्ही साहेब लोक सतरा कपडे घालून शेवटी तोंड उघडेंच ठेवतांना ? तसेंच सारे शरीर उघडेच ठेवण्याची आम्ही सवय केली आहे. दयानदांनीं कित्येक दिवस जगली फळें नाहीं तर दूध यावरच काढले कित्येक वर्षे साधुसंगतींत संस्कृतावांचून दुसरी भाषाच सोडली ही एवढी तपस्या आपण कशासाठी करीत आहो, ह्याची पुरी जाणीव त्या वेळीं त्यांस नव्हती एकदां तर द्रोणासागरावर बरेच दिवस काढल्यावर हिमाचलांत जाऊन तेथे देहत्याग करावा असेंही त्यांच्या मनांत आले. परतु त्यांची ज्ञानार्जनाची लालसा पुन्हा जागृत झाली. ते पुन्हा त्या मार्गास लागले. "बाबावाक्यं प्रमाणम्" हें तर त्याना कधींच पटणारें नव्हतें. त्यांच्या शंकाखोर मनाची खात्री होणे महादुर्घट होतें. त्यानीं हठयोगप्रदीपिका इत्यादि ग्रंथांच्या द्वारें शारीरशास्त्राचा काहीं अभ्यास केला होता. एक दिवस गढमुक्तेश्वर येथे गंगानदीच्या किनाऱ्यावर हिंडत असता त्यांनीं एक प्रेत वाहात येत असलेलें पाहिले. आपण पुस्तकात वाचलेलें शारीरज्ञान पडताळून पाहण्याकरितां लगेच त्यानीं ते प्रेत नदीच्या काठावर ओढून घेतले. व चाकूने तें फाडून पाहतां आंतील रचनेशी पुस्तकातील वर्णनाचा मेळ जमत नाही असे पाहून त्यानी तें प्रेत व त्याबरोबर हठयोग, आयुर्वेदादि साऱ्या शारीरशास्त्राचीं धडें सत्यप्राणहीन मानून ती फाडून गगाप्रवाहात फेकून दिली !

दयानदाची भव्य शरीरयष्टि, तेजस्विता व विद्वत्ता इत्यादि गुण पाहून त्यांस हिमालयातील सुप्रसिद्ध व सपन्न अशा ओखी मठाचे महत म्हणून नेमण्याचीही साधि आली होती परतु त्या महतीच्या विलासाना ते लुब्ध झाले नाहींत ते ओखी मठाधीशास उलट म्हणाले की, " मी घरचे ऐश्वर्य सोडून येथे दूरवर आलों तो महतीच्या ऐश्वर्याकरिता नव्हे योगविद्येच्या द्वारे मोक्ष मिळवावा व तोंपर्यंत देशवासीयांची सेवा करावी हेच माझे एक ध्येय आहे " त्यासाठी त्यानीं आजन्म देशपर्यटन अखड कायम ठेविले नर्मदेच्या किनाऱ्यापासून बदरी-नारायणापर्यंत त्यानी अनेक वेळा केलेल्या देशपर्यटनात त्यास शेकडो साधुसत, पंडित व योगी भेटले जोशी मठात सन्यासाश्रमात चवथ्या श्रेणीचे बरेच महाराष्ट्रीय सन्याशी होते त्याच्याशीं स्वामींनी समागम केला पण ज्यास गुरु करावा असा एकही पुरुष त्यास भेटला नाही अथवा पटला नाही ! अर्थात् हा केवळ योगायोग होय असेच म्हटले पाहिजे शिवाय असेही कदाचित् म्हणता येईल की, त्याच्या मूळच्या दुर्दमनीय वृत्तीस त्या १८५७ च्या बडाच्या कालाने अधिकच प्रक्षुब्ध केले असेल. अशी ती असतुष्ट व चचल वृत्ति शात होण्यास तीर्थाटनाची व योग्य कालावधीचीही अपेक्षा होती. पुढें काहीं कालानें त्याची मनोभूमिका एक प्रकारे तयार झाली पण त्याची जास्त मशागत करून त्यात योग्य बीजारोपण करण्या एका निष्णात माळयाची गरज होती, पुढे तोही मिळाला. कोणी इतिहासकार असें म्हणतात, की दयानदाच्या ठिकाणीं प्रज्वलित झालेली जी जिज्ञासा हिमाचलाच्या बर्फमय दुर्लंघ्य कड्यानीं गारठली नाहीं, किंवा गगाप्रवाहाबरोबर वाहवून विलीनही झाली नाहीं, ती सत्यविद्येच्या निर्झरानें शात झाली तो झरा खोलून दाखविणारे पायाळू अखेर कोण मिळाले तें पुढील प्रकरणात पाहूं.

---



श्रीविरजानन्द सरस्वति

जन्म—इ सन १७९८ ] [ मृत्यु—इ. सन १८६९

## प्रकरण तिसरें

# स्वामी विरजानंदसरस्वती

**उत त्वः पश्यन्न ददर्श वाचमुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम्।**
**उतो त्वस्मै तन्वं१ विसस्रे जायेव पत्ये उशती सुवासाः॥**

—ऋग्वेद, १०।७१।४ *

दयानदानी पंधरा वर्षे तीर्थाटन केले (सन १८४५ ते ६०) ते प्रायः मध्य व उत्तरहिंदुस्थानातच केले ह्यात त्याचा उद्देश गुरूच्या लाभ व योगविद्यासपादन हाच केवळ नसून लोकस्थितीचें सूक्ष्मावलोकन हाही कदाचित असावा असें दिसते. निदान असे देशपर्यटन करीत असता त्यांना जी लोकस्थिति पाहिली, त्यात कडक जातिनिर्बंध,निरर्थक आचारनिर्बंध, तीव्र मतभेद, नैतिक दौर्बल्य, मानसिक अधःपात, सामाजिक अवनति,बालविवाहाच्या चाली, असमजस अनुष्ठाने व धार्मिक समारभाचें बाह्यतः अवडबर, असे अनेक प्रकार त्यास आढळून आले त्या वेळी ज्ञानजिज्ञासेचा सर्वत्र अभाव दिसत होता, आणि निरनिराळया कलाच्या शिक्षणाचीही काही व्यवस्था नसावी ह्याबद्दल ऊहापोह मागे झालाच आहे.

हिंदुसमाजाची बाधणी एका धर्मसूत्रात असल्यामुळे समाजोन्नतीचा खरा उपाय म्हणजे धर्मसशोधन हाच एक आहे असे दयानदांनी ठरविले व त्या वेळीं त्याच्या हेही लक्षात आले कीं, सर्वाच्या बुध्दीस पटेल अशा रीतीनें शास्त्राची सगति लावून त्या आधारावर हिंदु समाजाची पुनर्रचना करणे, हे काम फारच अवघड असून त्याला आपली अद्याप तयारी नाही. ती तयारी कशी करावी ह्या विवचनेत दयानद असतां मथुरेंत वेदशाळा चालविणारे स्वामी विरजानदसरस्वती वेदविद्येंत परम निष्णात आहेत असे त्याच्या कानीं आलें. तेव्हा ते त्याच्या भेटीसाठी मथुरेस जाऊन तारीख १४ नोव्हेंबर १८६० रोजीं त्यांस शरण गेले.

---

* काहीं डोळयांनीं शब्द पाहतात, पण जाणूं शकत नाहीत. काहींच्या कानांवर शब्द पडतात, पण ते अर्थ ग्रहण करण्यास समर्थ होत नाहींत. एकाद्याला मात्र ही वाणी, सुदर वस्त्र नेसलेली स्त्री जशी आपल्या पतीला प्रेमानें आपला देह अर्पण करते, तसें आपलें अंतरंग उघडें करून दाखविते.

पंजाबांत धर्मसुधारक गुरुनानक यांनीं आपल्या आयुष्याचीं अखेरची वर्षे ज्या कर्तारपूर गांवीं घालविलीं, त्याचेच शेजारीं गंगापूर नामक ग्रामी स्वामी विरजानद यांचा जन्म सन १७९८ सालीं झाला त्यावेळी शीखांचे राज्य परमोत्कर्षाला पोंचले होते. विरजानंद जातीने सारस्वत ब्राह्मण असून त्याच्या वडिलाचे नांव नारायण दत्त असें होतें. विरजानद पांच सहा वर्षांचे झाले तोंच देवींचे आजारानें त्यांचे डोळे जाऊन ते अध झाले ह्या अध मुलाच्या शिक्षणाची सोय त्याचे वडिलांकडून होत आहे तोंच त्याचे आईबाप निवर्तले तेव्हा त्याचें वय अवघे अकरा वर्षांचे होतें अशा अल्पवयात व परस्वाधीन स्थितीत ते आपल्या ज्येष्ठ बंधूजवळ रहात असता त्यांच्या भावजयीकडून त्यास फार छळ सोसावा लागला. तेव्हां त्या जिण्यास कटाळून विरजानद अवघे बारा वर्षांचे असतांच त्यांनीं घर सोडले, आणि त्यांनी हरिद्वारचा रस्ता धरला त्या काळीं आजच्यासारखीं वाहनांचीं साधनें नव्हती आणि त्यांतही ते असहाय व आंधळे ! त्यांचे प्रवासात किती हाल झाले असतील, त्याची कल्पनाही करवत नाही हृषिकेशास जाऊन पोंचेपर्यंत त्यास पंधरावे वर्ष लागले तेथें गंगातटाकी राहून त्यानीं गंगाजलांत बसून एक वर्ष गायत्री-मन्त्राचें पुरश्चरण केले. त्या मुदतींत थडी, वारा व पाऊस यांची कशाचीही क्षिति त्यांनीं बाळगली नाहीं. अरण्यांतील हिंस्र श्वापदांचेही भय मानले नाही इतकी कडक तपश्चर्या झाल्यावर त्यांस एक रात्र स्वप्नात देववाणीने चतुर्थाश्रम घेण्यावद्दल अनुज्ञा झाली तसे ते हरिद्वार येथे गेले तेथील स्वामी पूर्णानंद सरस्वती याच्या हातून त्यांनीं चतुर्थाश्रम घेतला, आणि विरजानदसरस्वती हे नाम धारण केलें तेथें व कनखल येथें त्यानीं कौमुदीचा अभ्यास केला व पुढें काशीस जाऊन मनोरमा, शेखर, न्याय, मीमांसा व वेदान्त याचा अभ्यास करून प्रज्ञाचक्षुस्वामी असें अलौकिक नांव मिळविले. काशीस असतां त्यांच्या शेजारचे एक दाक्षिणात्य पंडित रोज अष्टाध्यायीचा पाठ करीत असत. त्या अष्टाध्यायींतील सूत्रक्रम त्यास इतका सरळ, सुंदर आणि सुसंगत वाटला कीं तो क्रम बदलणाऱ्या कौमुदीकाराचे ते कट्टे द्वेष्टे बनले. इतकेच काय पण भट्टोजी दीक्षितांच्या ग्रंथाबरोबर सर्व अर्वाचीन व्याकरणग्रंथ त्यानी यमुनेत फेंकून दिले. शिष्यांजवळचेही तसले ग्रंथ त्यानी जाळून टाकण्यास सांगितले. ही त्याची विक्षिप्त वृत्ति उत्तरोत्तर वाढतच गेली पुढे अलवारचे महाराज विनयसिंग याचे आग्रहावरून ते त्यांस शिकवण्यास

तीन वर्षे त्यांच्या येथें राहिले. त्याची शर्त अशी होती की, रोजच्या अभ्यासांत राजाकडून जर एक दिवस खंड पडला, तर स्वामी तेथें न राहतां निघून जातील. अखेर एक दिवस तो योग आलाच तेव्हा स्वामींनी राजास सांगितलें की, " राजा, तू आपला नियम मोडलास, पण मी आपला नियम मोडण्यास मात्र तयार नाहीं." असें सांगून स्वामी निघून गेले काही दिवस भरतपूर येथे राहून नंतर सन १८३७ साली मथुरेस जाऊन ते एका देवळात राहू लागले. लवकरच त्यांनी तेथें एक संस्कृत शाळाही काढली ते अध्यापनाचे कामात फार निष्णात होते तसेच त्याच्या विद्वत्तेबद्दल कोणीं शंका काढल्यास ते लगेच वादास तयार होत. त्यांना शास्त्रार्थाच्या वादाची हौस असे. तीच पुढे दयानंदाच्या ठिकाणीही दिसून आली एकदा वैष्णवांचे पुढारी रंगाचार्य व त्याचे गुरु कृष्ण-शास्त्री विरजानंदाकडे गेले असता अजातोक्ति (?) [Ajatukti] हा समास षष्ठि तत्पुरुष की सप्तमी तत्पुरुष त्याबद्दल वाद उपस्थित झाला. शेठ राधाकृष्ण यांना मध्यस्थ नेमून शास्त्रार्थाकरिता मोठें बक्षीस लावून सभा झाली. सभेत कृष्ण-शास्त्री स्वतः आलेच नाहींत, तेव्हा उभयतांचे विद्यार्थ्यांत वाद होऊन विरजा-नंदाचा पक्ष पराजित झाला, असा मध्यस्थांनीं निर्णय दिला. तेव्हा विरजा-नंदाना अत्यंत संताप येऊन त्यांनी कलेक्टर मि० अलेक्झांडर यांची भेट घेतली व एकतर कृष्णशास्त्री यांनी आपल्याबरोबर पुन्हा शास्त्रार्थ करावा, नाहीतर बक्षिसाची सर्व रक्कम स्वामीस द्यावी असा आग्रह धरला पुढें हा वाद आग्रा व बनारस येथील पंडितापर्यंत गेला, परंतु अखेर त्यात विरजानंद यांच्या बाजूचे काहींच निष्पन्न झाले नाहीं तथापि स्वामींचा आत्मविश्वास मात्र कायम होता आर्ष-ग्रंथांचा त्यांना अभिमान वाटे पौराणिक वाङ्मयाचा ते मनस्वी तिटकारा करीत. ते आपल्या पांडित्याचे विलक्षण अभिमानी होते एकदा वादाचे प्रसंगी त्यांचे पुढले दात पडले असल्यामुळें त्यांच्या तोंडून 'पुंसु' ह्या शब्दाचा पुक्षु असा अशुद्ध उच्चार झाला पण तो अशुद्ध आहे असा प्रतिपक्षानीं आक्षेप घेतल्या-बरोबर स्वामींनीं सहज घडलेला दोषही कबूल न करता 'पुक्षु' हाच शब्द बरो-बर आहे, असा दुराग्रह धरून त्या शब्दासिद्धीकरता एक प्रबंध लिहिला. अर्थात् तो त्याचा प्रयत्न जरी निष्फळ झाला, तरी यौगिक अर्थपद्धतीच्या पुरस्कर्त्यांचे गुरु काय वृत्तीचे होते, याचा या गोष्टीवरून चांगला बोध होतो. अशाच आणखी एका शास्त्रार्थाच्या वादांत ते हरले, असा मथुरेच्या वैष्णवांनीं त्यांचा दुर्लौकिक केला.

तेव्हापासून वैष्णव व त्याचा भागवत ग्रंथ याचा त्यांस मनस्वी संताप आला तो इतका की, श्रीमद्भागवताच्या पोथ्या खाटेच्या पायाखाली दडपून ते वर निजत असत! आणि भट्टोजी दीक्षिताच्या ग्रंथांची तर खरोखरच खेटरानीच संभावना करीत! ह्या पुराणानी आमच्या धर्माचे जगात हसे केले ह्या पुराणानी एका देवाचे शिव, विष्णु, ब्रह्मा असे अनेक देव करून त्याच्या दरम्यान युद्धाचे नसते द्वैत उभे केले ह्या पुराणानीच एका परमात्म्याचे पद मूर्तीस दिले असे स्वामी नेहमी म्हणत त्याना महाभारतोत्तर-वाङमयाचा मनस्वी तिटकारा असे एकदा ग्रिस्टले या नांवाचे एका कलेक्टरानी " स्वामी, मी आपल्याकरिता काय करावे ? " म्हणून विचारले असतां स्वामी म्हणाले, " तुम्हाला मिळतील त्या साऱ्या कौमुदीच्या प्रती यमुनेत नेऊन बुडवा किंवा जाळून टाका ! " ह्या तामसी स्वामीच्या पोटातील क्रोधानल इतका उग्र असे की, एकदा त्याच्या पोटात सोमल गेला असतां तोही त्यानी पचविला असे सांगतात !

ह्याप्रमाणे स्वामी विरजानदासबंधी सविस्तर लिहिण्याचे कारण त्याच्या विचाराची छाया स्वामी दयानदावर विशेषच पडलेली दिसते 'तू ज्याच्या शोधात आहेस तेच हे गुरु विरजानद यांच्याकडे तू जा' असे दयानदाच्या कानात कोणीं सांगितल्याचा त्याना प्रत्यय आला तसे ते मथुरेस त्याच्या भेटीसाठी गेले स्वामी दयानद प्रथम स्वामी विरजानदाकडे गेले, तेव्हा ते नेहमीच्या पद्धतीप्रमाणे आपल्या मठाचा दरवाजा लावून बसले होते दयानदानी जाऊन दार ठोठावले तेव्हा " बाहेर कोण आहे ? " असा आतून सणसणीत सवाल आला " एक दयानद नावाचा सन्याशी " असा स्वामींनी जबाब दिला " तुम्ही संस्कृत व्याकरणाचा काही अभ्यास केला आहे काय ? " असा पुन्हा सवाल झाला. " होय, मीं सारस्वताचा वगैरे अभ्यास केला आहे " असा स्वामींनी जबाब दिला तेव्हां मठाचा दरवाजा उघडला दयानद आंत गेले विरजानदांनी त्यांची परीक्षा घेतली. आणि दयानदाची लायकी पाहून त्यांस ते म्हणाले:—

' हे पहा दयानद, संस्कृत वाङ्मयाचे महाभारतपूर्व व महाभारतोत्तर असे दोन भाग आहेत ह्यांपैकीं पूर्व भागांत आर्यांचें आध्यात्मिक, नैतिक व बौद्धिक वैभव दिसून येते. कारण तत्कालीन वाङ्मय रचणाऱ्या ऋषींचें चारित्र्य अत्यंत उदात्त असून त्यांचें जीवन म्हणजे चुकलेल्या मानवकोटीला मार्गारूढ करणारा एक प्रकाशस्तंभच होय. परंतु महाभारतोत्तरकाळीं ह्या

वाङ्मयाचा अभ्यास सुटला आणि त्यानंतर कलुषित व संकुचित बुद्धीच्या लोकांचे वाङ्मय तयार झाले, त्याने धर्माची अत्यन्त हानि केली यासाठीं ऋषिप्रणीत ग्रंथांचाच अभ्यास करावा इतर गबाळ ग्रंथकाराच्या वाङ्मयाचा त्याग करावा "

दयानंदानी हे सर्व ऐकून घेतले व त्याप्रमाणे वागण्याची शपथ घेतली आणि गुरुजींनी संतुष्ट होऊन आपणास शिष्यत्व द्यावे, यासाठी गुरुजींनी निंद्य मानलेला आपल्याजवळील सर्व ग्रंथभार त्यांच्या आज्ञेनुसार खरोखरीच यमुनेस अर्पण केला ! तेव्हां विरजानंद प्रसन्न झाले व त्यांनी एकतीस रुपयांची वर्गणी गोळा करून दयानंदांस (व्याकरण) महाभाष्याची एक प्रत अभ्यासाकरिता घेऊन दिली

दयानंदानी आपल्या हयातीत अनेक गुरु केले त्यात विरजानंदसरस्वती हे त्यांचे शेवटचे गुरु होत त्यांच्या आज्ञेचे परिपालन हेच पुढे त्यांनी आपलें जीवितकार्य मानले शिवाय त्या वेळी ते स्वतः संन्यासी असून चाळिशीच्या घरात गेले होते, असें असता त्यांनी जी गुरुसेवा केली तीही प्रशंसनीय आहे दयानंद तेथे गेल्यानंतर दुसऱ्याच साली भयंकर दुष्काळ पडला चांगल्या सुखवस्तु गृहस्थानाही आपला धर्मादाय आंवरावा लागला अशा वेळी अनाथ विद्यार्थ्यांची फार आबाळ झाली दयानंदांस नुसत्या चण्यावर कित्येक दिवस काढावे लागले अर्थात् हा आपत्काल फार दिवस राहिला नाही लवकरच त्यांच्या जेवण्याची उत्कृष्ट सोय लागली पंडित अमरलाल या नावाचे एक थोर धर्मात्मे तेथे रहात असत त्यांच्या घरीं रोज सव्वाशें ब्राह्मण भोजनास असत त्यांनी दयानंदाच्या भोजनाचा पत्कर घेतला तो असा की, ते जेवलेले स्वतः नजरेने पाहिल्यावाचून ते दुसरीकडे कोठे मेजवानीसही जात नसत दुसऱ्या एका हरदेवनामक गृहस्थाने दयानंदास दुधाकरितां दरमहा दोन रुपये दिले. ह्याप्रमाणे निरनिराळ्या गृहस्थांनी दयानंदास मदत केली. ह्या विद्यार्थिदशेत दयानंदाचे ब्रह्मचर्यपालन अत्यंत कडक असे. एक दिवस नदीतटाकीं संध्यावंदनात ध्यानस्थ असता त्यांची तेजस्वी व भव्य मूर्ति पाहून एका स्त्रीने भक्तिभावाने पुढे होऊन चट्कन् त्यांच्या पायावर मस्तक ठेविलें. असा हा निर्मळ बुद्धीनेही झालेला स्त्रीस्पर्श त्यांना पापरूप वाटला व तत्प्रायश्चितार्थ त्यांनी कित्येक दिवस निराहार व एकांतवास केला !

दयानंदांनीं आपलेकडून गुरुसेवेची शिकस्त केली. विरजानंद अत्यंत तामसी असत. सर्वांत हुषार विद्यार्थ्याला तर ते अगदी तलवारीच्या धारेवर धरीत. पूर्वा-

श्रमींच्या गर्भश्रीमत व आश्रमानतर नारायण स्वरूप झालेल्या दयानंदानी गुरुजींची मर्जी संपादण्याकरिता घराची झाडझूड करणें, यमुनेचें पाणी रोज पंधरा वसि हृडे लावून डोक्यावर आणणें वगैरे हलकी कामेही निरलस वृत्तीनें केली परतु गुरूजींचा राग तेवढ्यानें शमत नसे एकदा अष्टाध्यायीच्या एका क्लिष्ट प्रयोगसिद्धीचा पाठ गुरुजीनीं दिला तो दयानदाचे लक्षात राहिला नाहीं. म्हणून तो पाठ पुन्हा सागण्या बद्दल त्यानी गुरुजींची अनेक वेळा विनवणी केली. पण गुरुजींनीं साफ उत्तर दिले कीं, एकान्तात जाऊन स्मरण कर नाहीतर भले यमुनेंत जाऊन जीव दे ! दयानंदाचा निरुपाय झाला तेव्हा पाठ आठवला तर बरा नाहींपेक्षा यमुनेंत खरोखरच समाधि घ्यावयाची ! अशा निर्धारानें स्वामी यमुनेच्या काठी एकातात एकाग्रचित्त करून बसले. अशा स्थितीत त्याचे देहभानही सुटले. तेव्हा अचानक कोणी तरी तीच प्रयोगसिद्धि आपल्याला म्हणून दाखवीत आहे, असा त्यास भास झाला. तेव्हा अत्यानद होऊन ते त्या तद्रीतून उठले व लगेच गुरुजीजवळ जाऊन त्यानी तो पाठ म्हणून दाखविला.पुढे ही विद्या त्यास चागलीच अवगत झाली. तात्पर्य, गुरुशिष्यास देववाणी ऐकण्याचा याप्रमाणें स्वताचाच अनुभव असल्यामुळें श्रुतीच्या अपौरुषेयत्वाबद्दल त्यास शका वाटण्याचें कारण नव्हतें असो कधीं कधी स्वामी विरजानदाचे दर्शन त्याच्या शिष्याशिवाय इतर कोणासही घेण्याची सक्त बंदी असे. एकदा स्वामी विरजानदाचे एक जवळचे नातेवाईक फार दिवसानीं त्यास भेटण्यास आले. परंतु त्यास दर्शन होईना, तेव्हा त्यास फार वाईट वाटलें. फार लाबून ते आलेले. आता असेंच परत गेल्यास भेटीचा लाभ पुन्हा ह्यातीत होणार नाही ! असे मनात येऊन त्यानी दयानदाजवळ फार अजीजी केली कीं, मी एक अक्षरही बोलणार नाही. गुपचुप येऊन एकदा तरी त्या दर्शनीय पुरुषाचें मला दर्शन घडू द्या. तेव्हा दयानदाना दया येऊन त्यानी त्यास आपल्याबरोबर नेले. त्याच्या दर्शनाने त्याच्या नातलगास आनद झाला. विरजानद अधच असल्यामुळें त्या वेळी त्यास कांहीच कळलें नाही, पण मागून जेव्हा ती गोष्ट सहज दुसऱ्या शिष्याच्या तोंडून त्याच्या कानी गेली,तेव्हा विरजानदास इतका सताप आला कीं, त्यानी दयानदास लगेच घरातून घालवून दिलें. याप्रमाणें दयानदास घरांतून चालते होण्याचे धाक हमेशा ऐकावे लागत. इतकेंच काय, पण असल्या योग्यतेच्या ह्या प्रौढ विद्यार्थ्यास गुरुजींच्या हातच्या दंडुक्याचे घावही खावे लागत. त्यांचे सहाध्यायी दयानंदांचा फार मत्सर करीत. त्यांनीं विरजानंदांना एकदा खोटेंच

सांगितलें, कीं हा दयानंद तुमच्या पुढें पुढें करतो, म्हणून तुम्हांस आवडतो; पण तुमच्या मागें तो तुमची फार कुचेष्टा करतो. विरजानंद म्हणजे साक्षात् जमदग्नीच ! त्यांनीं हें ऐकून दयानंदांस आपल्या दंडुक्यानें सडकून मारलें ! त्या घायांच्या खुणा त्याच्या अंगावर कायमच्या स्मारकरूप राहिल्या होत्या. पण पुढें त्यांच्याकडे पाहून दयानंदाना गुरुजींचें क्रौर्य मनात न येतां विद्यादानाचे कधीं न फिटणारे जे उपकार त्यांनी करून ठेविले होते, त्याचे स्मरण होऊन त्यांचें अंतःकरण सद्गदित होई. ते म्हणत कीं, ज्याप्रमाणे कुंभार मातीचा घडा थापटून थापटून तयार करतो, त्याप्रमाणे स्वामींनी मला तयार केलें स्वामी विरजानंद तामसी होते खरे, पण त्यांचे दयानंदावरील प्रेमही तितकेंच विलक्षण होतें ते दयानंदास नेहमीं म्हणत कीं, मीं आजवर पुष्कळ विद्यार्थी शिकविले, पण तुला शिकवितांना मला जो आनंद वाटतो, तसा दुसऱ्यास शिकवितांना आजपर्यंत कधींच वाटला नाहीं.

ह्याप्रमाणे सुमारें दोन अडीच वर्षें स्वामी विरजानंदाजवळ राहून दयानंदांनीं अष्टाध्यायी, महाभाष्य, वेदान्तसूत्रें इत्यादि आर्षग्रंथांचा अभ्यास केला त्यांचा अभ्यासक्रम जेव्हां पुरा झाला तेव्हां ( सन १८६४ ) एक दिवस त्यांच्या प्रखर गुरुजींनीं आवडत्या तिखट लवंगा ओंजळींत घेऊन गरीबाची गुरुदक्षणा म्हणून त्यांच्यापुढे ठेवून त्यांनी गुरुजींचा निरोप घेतला. गुरुजी निरोप देतांना ह्या आपल्या शिष्यश्रेष्ठास म्हणाले--

" माझ्या मुला ! तुला जर गुरुदक्षणा द्यावयाची असेल, तर जे सत्यज्ञान तुला प्राप्त झालें आहे, तें तू आपल्या देशबंधूंस दे ह्या भारतवर्षात अलीकडे बहुत काल वेदाचा अभ्यास कोणी करीनासें झालें आहे तर तू जाऊन त्यांस शिकव. सत्शास्त्राचा उपदेश कर. आणि निरनिराळ्या दांभिक पंथांनीं उत्पन्न केलेलें अज्ञान त्या योगानें तू दूर कर. एक्या सद्रूप परमात्म्याच्या वास्तविक स्वरूपा-विषयी व गुणांविषयीं सामान्य लेखकांचे ग्रंथ सर्वस्वी गैरसमज करणारे असून ते पूर्वकालीन ऋषि व मुनी यास व्यर्थ कमीपणा आणतात. परंतु प्राचीन आचार्यांच्या ग्रंथात हा दोष नसतो. प्राचीन संस्कृति व सामान्य लेखकांचे लेख यांची निवड करण्याची हीच एक खूण आहे हें लक्षांत ठेव. आणि गंगायमुनांच्या अखंडित प्रवाहांप्रमाणें लोकहितबुद्धीनें प्रेरित अशा क्रियासातत्यांतच आपलें आयुष्य घालवीत जा."

दयानदांनीं गुरुजींस वंदन करून त्यांच्या आज्ञेप्रमाणे वागण्याचें वचन दिले आणि त्यांचा आशीर्वाद घेऊन ते तेथून परत फिरले दयानंदांनीं आपले वचन कसें चोख रीतीने पाळलें, ह्याचें वर्णन यापुढे येणारच आहे. पुढें इ सन १८६८ सालीं स्वामी विरजानंद ह्यांनीं स्वतः दोन वर्षापूर्वी वर्तविल्याप्रमाणे ते आपल्या वयाच्या ७१ व्या वर्षी पोटशुळाच्या आजाराने मरण पावले ती बातमी दया-नंदास समजली तेव्हां " खरोखर व्याकरणाचा सूर्य मावळला ! " असे त्यानीं दुःखोद्गार काढले

---

## प्रकरण चवथें

# दिग्विजयारंभ

**कृतं मे दक्षिणे हस्ते जयो मे सव्य आहितः ।**

—अथर्व०, ७।५२।८

" माझ्या उजव्या हातात पुरुषार्थ व डाव्या हातात विजय ठेवला आहे "

---

**उपज्यो दण्डी छिपे पाखण्डी, डरे हैं घमण्डी धूर्त अन्याई १**
**विद्या पाकर निकला दिवाकर, तिमिर हटाकर ज्योति दिखाई २**
**आये हैं स्वामी दयानन्द नामी, गर्जे सभा में सिंह की न्याई ३**
**सत्य का मण्डन दम्भ का खण्डन, कर पाद तिलक की धूल उडाई**
**डरे हैं प्रमादी अनीश्वरवादी, पौराणिक दें राम-दुहाई ५**
**बडे २ नास्तिक होकर आस्तिक, हाथ जोड़ आए शरणाई ६**
**वेदों के बलसे युक्ति प्रबल से, कलियुगकी काया पलटाई ७**
**तप अखण्ड से तेज प्रचण्ड से, रिपुओं की छतिया धडकाई ८**
**योगीश्वर महर्षिः आत्मदर्शी, दिग्विजय जिनके हिस्से में आई ९**

—मेहता अमीनचंद.

स्वामी दयानंदाच्या साधकावस्थेतील तपस्येचा उन्हाळा संपला आणि त्याच्या मेघवृष्टीचा काळ आता जवळ आला मेघराज आपल्या आरंभीच्या प्रचंड गर्जनेनें पृथ्वीवरील गरीब प्राण्यांस ज्याप्रमाणे भेदरून टाकतो, त्याप्रमाणे दयानंदाच्या दिग्विजयाचा आरंभ झाला किंबहुना आरंभापासून अखेरपर्यंत परशुरामाच्या क्षात्र तेजानें त्याचें वाग्युद्ध दणाणून गेलें खाडववन दग्ध करणाऱ्या अर्जुनाप्रमाणे पौराणिक मतें व रूढि यांचे माजलेलें रान जाळून फस्त करण्याकरिता ते उद्युक्त झाले. तेव्हां प्रतिपक्षाची जिकडे तिकडे पळापळ व लपालप झाली ! अशाच अर्थाचें वर्णन त्यांचे अनुयायी करतात. एका आर्यकवीच्या वरील कवितांत तोच ध्वनि आहे. यास्तव ह्याच दिग्विजयाचें आतां आपणांस वर्णन करावयाचें आहे.

प्राचीन कालापासून भारतवर्षावर ग्रीक, हूण, सीथियन, पारसीक, इस्लामी

आणि ख्रिश्चन इत्यादि बाह्य आक्रमणांप्रमाणे आंतरिक प्रतिक्रियाही अनेक झाल्या. वैदिक मंत्रांचें परिवर्तन ब्राह्मण ग्रंथांत आणि ब्राह्मण ग्रंथांची प्रतिक्रिया औपनिषदिक धर्म आणि बौद्धधर्म यात झाल्यावर पुढें काहीं कालाने पौराणिक धर्म मूर्तरूपास आला या सर्व रूपातरास शिकदरापासून होत आलेल्या विदेशीय संस्कृतीचा ससर्गही कारणीभूत झाला. परतु आतापर्यंतचे बाहेरचे घाले धार्मिक स्वरूपाचे नसून साम्राज्य-वाद्यांचे राजनैतिक स्वरूपाचे होते मध्यतरीं इस्लामी हल्ल्यानें मात्र आपले रूप आरंभीं तरी पालटले आणि राजकारणापेक्षां धर्मकारणावरच त्यांनीं जास्त भर दिला त्याची प्रतिक्रिया पौराणिक धर्म अधिकाधिक संकुचित होण्यात झाली उदाहरणार्थ, जातींची कडक बंधने, स्पर्शास्पर्श निषेध, भक्ष्याभक्ष्य निषेध, स्त्रियांचा पडदा, सतीची चाल, इत्यादि निरनिराळ्या धर्मसंरक्षणाच्या रूढींनीं हिंदुधर्म जास्त जखडून गेला प्रतिबंधाचे अनुल्लंघनीय खंदक खणून हिंदूंनी स्वधर्माचा एक जंजिरा किल्ला बनविला. पण त्यामुळे बाह्य जगाशीं योग्य ते दळणवळण बद होऊन, वेढा दिलेल्या किल्ल्याप्रमाणे आंतल्या लोकाची अत्यंत जाचणूक झाली ! तेव्हां याचाही प्रतिकार करण्याचा प्रयत्न अकबर कबीरासारख्या काहीं उभयान्वयी थोर पुरुषानीं केला. परंतु इस्लामी धर्म व हिंदुधर्म हे स्वरूपातच इतके भिन्न होते, व त्या धर्मांचे अनुयायी जेते आणि जित यासंबंधानें इतक्या विषम स्थितींत होते कीं दोन्ही धर्मांतील विरोध नाहीसे होऊन हिंदी धर्माला व्यापक स्वरूप प्राप्त होणें अशक्य झालें. इतकेंच नव्हे तर वैष्णव,* शैव§ आणि शाक्त† ह्या तीन प्रमुख पंथाचेही आणखी

---

* (१) श्रीसम्प्रदाय (२) वल्लभाचारी (३) मध्वाचारी याचा ब्रह्मसंप्रदाय (४) सनकादिक संप्रदाय किंवा नीतावत पंथ (५) रामानन्दी किंवा रामावत (६) राधावल्लभी (७) नित्यानंदी (८) कबीरपन्थी (९) खाकी (१०) मलूक दासी (११) दादूपथी (१२) रमदासी (१३) सेनाई (१४) मिराबाई (१५) सखीभाव (१६) चरणदासी (१७) हरिश्चंद्र (१८) सधना पन्थी (१९) माधवी (२०) बैरागी आणि नागेसन्यासी

§ (१) संन्यासी, दडी (२) आदि योगी (३) जगम (४) उर्ध्वबाहू (५) गूदड (६) रूखड (७) कडीलिंगी.

† (१) दक्षिणाचा, (२) वामी (३) कानचेलिये (४) करारी (५) अघोरी (६) गाणपत्य (७) सौरपत्य (८) नानकपंथी (९) बाबालाली (१०) प्राणनाथी (११) साध (१२) सन्तनामी (१३) शिवनारायणी (१४) शून्यवादी [ आर्या दर्पण जून, १८८० ]

स्वयंनिर्णित अनेक पोटभेद उत्पन्न झाले यात्रमाणें कबीर नानकादि धर्मसुधारकांचे धर्म-एकीकरणाचे प्रयत्न ज्याप्रमाणें बहुतांशी निष्फल झाले, त्याचप्रमाणें, ख्रिस्तीधर्म, सुधारलेली संस्कृति आणि अनिवार वाढलेली संपत्ति हे त्रिधारी शस्त्र घेऊन जेव्हा युरोपिअनानी, आक्रमण केले, तेव्हां त्याच्याशीं मिळतें घेण्याचे ब्राह्मसमाजाचे प्रयत्नही वायफळच ठरले होते. दयानदाना वैदिकधर्माचा प्रकाश कर अशी ज्या वेळी त्यांच्या गुरुजीची आज्ञा झाली, त्या वेळी धार्मिक परिवर्तनाचा वरील साराच इतिहास दयानदांच्या नजरेसमोर असेल असे नाही. विधर्मी सस्कृतीशी त्यांचा परिचय बराच मागून झालेला दिसतो इतकेच नव्हे तर पुस्तकीज्ञानाच्या दृष्टीनें अर्वाचीन मानलेले ग्रथ तर अपोत, पण वेदाचाही अभ्यास त्याचा त्या वेळी पूर्ण झाला नव्हता तसेच निरानिराळ्या पथातील साधु, बैरागी व महत त्यानी पाहिले असले तरी हिंदूंचा गृहस्थाश्रम आणि कर्मठाचीं विधिविधानें याचेंही प्रत्यक्ष आणि अनुभविक ज्ञान मिळविण्यास त्यास मिळावा तितका अवसर मिळाला नव्हता याप्रमाणे हिंदु सस्कृतीची प्रकृति,तिला जडलेल्या विकृतीची पूर्वपीठिका आणि निदान, याबद्दलची त्याची काहींच निश्चित बुद्धि नसल्यामुळें पुढील योजनाची आणि साधनाची रूपरेषाही प्रारभी पुरी सिद्धच असेल असें दिसत नाहीं संस्कृत, व्याकरण आणि वैशेषिकादि कांहीं दर्शनें यांचें खोल ज्ञान अखंड ब्रह्मचर्य, प्रतिभा, उत्साहपूर्वक वक्तृत्व, वैराग्य, लोकसग्रहाची महत्त्वाकांक्षा अशा कांहीं ठळक गुणांचा विकास, आणि त्याचबरोबर अनेक प्रचलित मतांबद्दल तीव्र तिरस्कृति ही एवढी सामुग्री त्याच्याजवळ होती तरी शैवमतासबधीं त्याचे जन्मादारभ्य असलेले अनुकूल संस्कार पूर्णपणें नष्ट झाले नव्हते. गुरुजींनीं त्यांना आज्ञा केली. व ती पुरी करण्याचें वचन देऊन ते बाहेरही पडले. परंतु पुढें कोणत्या मार्गानें कसकसें जावें आपला कार्यक्रम कसा आंखावा, कोणतीं साधनें ध्यावीं, मान्याचीं स्थानें कशीं हेरावीं इत्यादि गोष्टींचा शांतपणें विचार करण्याकरितां त्यांना काहीं काळ [ सन, ८६४ ते ६९ ] एकांत सेवन करणें भाग पडले.

युद्धाचें शिंग पुकारण्यापूर्वी सेनापतीनें आपल्या सैन्याची मांडणी करावी, त्याप्रमाणे दयानदानीं आपल्या विचाराची व्यवस्थित जुळणी करण्यात काहीं काळ घालविला. विजांच्या कडकडाटापूर्वी ढगाची जमवाजमव होत असता आकाशाला जसें काहीं काल गाभीर्य येते तसा तो काल होता. किंवा लाब पल्ल्याची उडी मारणारा

मनुष्य अवसान घेण्याकरितां जसा अंमळ मागें येऊन किंचित् काळ स्थिर होतो, त्याप्रमाणें दयानद काहीं काल स्थिर राहिले. आणि अगात स्फुरण आल्यानतर वरपुत्र वीरभद्राने ज्याप्रमाणे पहिली धडकी कैलासपर्वतालाच दिली, त्याप्रमाणें या धर्मवीराची पहिली सलामी आग्र्याचे स्वामी कैलासपर्वत याच्याशीच झाली· आग्र्याच्या आगरवाल्याच्या बागेत त्याचे गीतेवर प्रवचन सुरू होतें त्यातील 'सर्वधर्मान् परित्यज्य' हा श्लोक कैलासपर्वत स्वामीना अडला तो त्याना उकलेना. दयानदानी सर्वधर्मान् ह्या समासात अचा लोप झाला आहे, यास्तव "सर्व अधर्मांना सोडून" असा अर्थ समजावा, याप्रमाणे उत्कृष्ट फोड केलेली पाहून त्याची सर्वत्र वाहवा झाली व लगेच तेथील मडळींनीं दयानदाचे पचदशीवर प्रवचन सुरू केले झाले येथूनच लढाईला सुरुवात झाली पचदशीतील थोडा भाग सागून झाला नाही तोच ईश्वर मायाधीन आहे (?)† असा भाग आला दयानदाच्या मतानें ब्रह्म आणि ईश्वर एकरूप असल्यामुळे 'अकायमव्रणमस्नाविर' अशा ईश्वरास ब्रह्माचें प्रतिबिंब मात्र लेखणे हे बिलकुल पटलें नाही असे भलतेच विधान पाहिल्याबरोबर रजूक पेटत पेटत पहिला सुरुग उडावा त्याप्रमाणे स्थिति होऊन दयानंदानीं अद्वैती वेदान्त्याचे जें प्राथमिक पुस्तक विद्यारण्याची पचदशी ते हातीं धरण्यासही नालायक म्हणून एकदम झिटकारून फेकून दिले असल्या सामान्य लेखकाचे गैरसमज करणारे अनर्थावह अद्वैतपर ग्रथ सागून मी माझ्या गुरुजींच्या स्पष्ट आज्ञेचा भग करणार नाही आणि प्राचीन ऋषींच्या ग्रंथाना हरताळ लावणार नाही असे स्वामींनीं आपल्या श्रोतृसमाजास निक्षून सांगितले नतर त्याच ठिकाणीं त्यानी आपले संध्या हें पुस्तक छापून त्याच्या तीस हजार प्रति फुकट वाटल्या.

वेदान्ताच्या गाडीचा साध्यावरीलच रूळ वरीलप्रमाणें उखडून काढल्यानंतर दयानंदाची स्वारी इ सन १८६५ सालीं लष्कर ग्वाल्हेरकडे गेली. आणि तिकडे त्यानीं आपला मोर्चा पुराणिकाकडे वळविला त्यावेळीं सरकारवाड्यात भागवताचा सप्ताह सुरू होता स्वामी अबूवर होते त्यास हें वर्तमान कळताच ते

---

† But he had not gone through many pages when he came across a passage which said that God himself is subject to the power of maya (*P. 80 life of Dayanand by Bawa Chhaju Singh.*) पंचदशींत असें कोठें आहे न कळे! कदाचित् [ "माया बिम्बो वशीकृत्य तांस्यात्सर्वज्ञ ईश्वरः" हा तत्त्वविवेक प्रकरणांतील १६ व्या श्लोकाचा उत्तरार्ध असेल.]

चार पाच विद्यार्थ्यांसह खालीं उतरले, आणि पुराणिकाचा जो अत्यंत आवडता ग्रंथ श्रीमद्भागवत त्यावरच ते घसरले. भागवत व्यासकृत नसून बोपदेवकृत एक अत्यंत निंद्य ग्रंथ आहे. भागवतातील शिकवण अत्यंत असंबद्ध व अनीतिमय आहे, अशी त्यांनी जाहीर रीतीनें व निर्भीडपणे खरमरीत टीका सुरू केली. महाराजाच्या कानावर ही गोष्ट गेल्यावर त्यांनी दरबारच्या पंडितास स्वामींकडे पाठवून त्यांचा अभिप्राय आणविला. स्वामींनी असा खडखडीत निरोप पाठविला, "की भागवताच्या पठनाने दुःख आणि आपत्ति गुदरल्यावाचून राहणार नाहीत हे लवकरच परिणामावरून दिसून येईल तेव्हा भागवत सप्ताह एकदम बंद करून गायत्रि-पुरश्चरण सुरू करावें." महाराजानीं स्वामींचा निरोप विनोदावारीच नेला पुढें दैववशात महाराजावर एकावर एक संकटें गुदरली. घरी महाराणीसाहेब दुखितल्या आणि शहरात वाळ्याचा उपद्रव भयंकर सुरू झाला. ज्या छोट्या राजकुमारास दीर्घायु प्राप्त व्हावें म्हणून भागवतसप्ताह सुरू केला होता, ते राजकुमार पंडिताच्या आयुर्दायी आशीर्वादास न मानता भागवतसप्ताह समाप्त होताच परीक्षिति राजाप्रमाणे वैकुंठवासी झाले! या दिवसात स्वामी रोज दोनदा नियमाने योगारूढ होत असत पुढे ते आग्र्यास असताना कधी कधीं त्यांची अठरा तास समाधि लागलेली लोकांनीं पाहिली आहे. अशा वेळी त्यांचा चेहरा विशेष तेजःपुंज होत असे. इतकेंच नव्हे तर जमिनीचा आधार सुटून त्यांचें आसन वर अधांतरीं असलेलें एकानें पाहिलें आहे.

स्वामी संन्याशी होते तरी आतापर्यंत भस्मरुद्राक्षादि शैवचिन्हे धारण करीत असत. आणि शैवमताचें प्रतिपादनही करीत मथुरा वृंदावनातील वैष्णवांच्या कृष्णलीलांचा त्यांना मनस्वी तिटकारा आला होता. यामुळे वैष्णवांचा खरपूस समाचार घेताना त्यांची मति प्रथम शैव मताची पक्षपाती दिसे. त्यामुळें कित्येक लोक वैष्णवपंथ सोडून भराभर शैवपंथात शिरले. जयपुरचे महाराज रामसिंह यास त्यांनींच शैवदीक्षा दिली. मग स्वामींच्या हातातच काय, पण महाराजाचे हत्ती आणि घोडे यांच्या गळ्यातूनही रुद्राक्षमाळा मिरवूं लागल्या. ते शिवाला परमात्मा मानीत पण पार्वतीचा पति असें मात्र मानीत नसत. पुढें त्या मायामहेश्वरावरील त्यांची निष्ठा लवकरच मावळली. ती इतकी कीं, शंकरावर बेल वाहण्यापेक्षा तो उंटाला घातला तर बरा, त्याची भूक तरी शमेल. शिवाला फुलें वाहून तीं तेथें कुजून जाण्यापेक्षा तीं झाडांवरच राहूं दिलीं तर हवा तरी शुद्ध करतील. खालीं गळून

पडलीं तर जमीन तरी खतावतील. अशी ते टीका करीत एकदां एका शिव- भक्तानें शिवलिंगावर पाणी घालण्याकरिता स्वामींच्या जवळ क्षणभर लोटा मागि- तला. स्वामीनीं तो देण्याचें नाकारून ते उलट उपहासाने म्हणाले, “ तुमच्या जवळ लोटा नाही तर तोंड तर आहेना तोंडात खच्चून पाणी भरून शिवलिंगावर चूळ टाका ! ते देवमूर्तीला अर्पण केलेले दूधही पिण्यास दिलें तर घेत नसत. तात्पर्य, असलीं धर्मवेडें समूळ नाहीशी करावयाची असा कटाक्ष धरून त्यांनी स्वतः रुद्राक्षमालादि चिन्हें सोडून दिलीं आणि रुद्राक्ष किंवा कंठी धारण न करण्याबद्दल ते लोकासही सागू लागले स्वामी फार करून स्त्रियास उपदेश देत नसत ते म्हणत, त्याच्या पतीनीं आमच्याकडून उपदेश ऐकून तो आपल्या स्त्रियास द्यावा कामवासना जिकण्यासाठीं स्त्रियाची सगति व स्मरणही वर्जावे, रात्रंदिवस प्रणवाचा जप करावा, प्रातःकाळी मालकगणीचे पाच दाणे खावे, असें ते सांगत

स्वामी पुष्करास गेले असता त्या प्रातातील एक विद्वान् तार्किक व्यकटशास्त्री म्हणून होते, त्याच्याशी स्वामींचा भागवतपुराण-खंडण-मडणावर शास्त्रार्थ झाला हे व्यंकटशास्त्री एका अघोरी गुरूचे चेले असून नागपर्वतावर रहात असत त्याच्या वादाचे मुद्दे प्रसिद्ध नाहीत पण “ दैवासुर ” आणि “ देवासुर ” ह्यांपैकी शुद्ध उच्चार कोणता एवढाच एक वादाचा मुद्दा स्वामींच्या चरित्रात दिला आहे. स्वामी दैवासुर म्हणत होते अखेर एकदर वादांत पुष्करच्या व्यंकटशास्त्र्यांस त्यांनीं आपले म्हणणें कबूल करणे भाग पाडलें. पण व्यंकटशास्त्री इतकेंच म्हणाले कीं, स्वामींचीं एकंदरींत सुधारलेली मतें राजाश्रयावाचून लोक मानणार नाहीत. ही त्यांची सूचना स्वामीस कदाचित् पटली असावी कारण त्यानंतर लगेच इ. सन १८६६ सालीं स्वामी अजमीरास गेले तेव्हा त्यांनी बऱ्या पाद्री लोकाच्या व युरोपिअन अंमलदारांच्या भेटी घेतल्या. हिंदुधर्मातील पाखंडी लोक भलत्याच धर्मसमजुती प्रसृत करून लोकाकडून पैसे उकळतात, यासाठीं पितृस्थानीं असलेल्या राजाच्या अंमलदारानीं याचा बंदोबस्त करावा, असें त्याच्याकडे स्वामीनीं गाऱ्हाणे- ही नेलें. पण सरकार तुमच्या धर्मात हात घालूं इच्छीत नाहीं, असेंच त्यास उत्तर मिळालें. मात्र रे० रॉबिन्सनसाहेब यानीं, आपण आपल्या हयातीत स्वामीइतका वेदविद्येंत निष्णात पुरुष दुसरा पाहिला नाही, असा स्वामीस दाखला दिला. अशाच प्रकारचा काही दाखला व्हाइसरॉयसाहेबाचे एजटानी स्वामीस दिला. व याचा

ठिकाणीं त्यास उपयोग होईल असाही भरंवसा दिला. तसेंच जयपूरचे राजे रामसिंग यांनीं स्वामींना नीट परामर्श न घेतल्याबद्दल एजंटसाहेबांनी त्याचीही पत्रद्वारें सामोपचारानी कानउघाडणी केली त्याबरोबर जयपूरच्या दरबारचे पंडित रगाचार्य याच्याशी शास्त्रार्थासाठी यावे म्हणून जयपूरच्या महाराजाचे लगेच निमत्रणही आले पण त्याप्रमाणे तिकडे जाण्यापूर्वी स्वामींनी मथुरेस जाऊन आपल्या गुरूची भेट घेतली गुरुवर्य स्वामी विरजानद याच्या पुढे दोन मोहरा व उची वस्त्र दयानदानी ठेविले तसेच भागवत पुराणावर लिहिलेल्या खडणात्मक निबंधाची एक छापील प्रतही त्याच्या चरणी अर्पण केली शिष्यानी आरभलेल्या कार्याबद्दल गुरूजीनींही आपली पसती व्यक्त केली अगीकृत उद्योगात यश येईल असा मन.पूर्वक आशीर्वाद दिला, आणि त्यास हरिद्वारच्या कुभमेळ्याकडे जाण्याविषयी आज्ञा केली

इ सन १८६७ च्या एप्रिल महिन्यात हरिद्वारास फार मोठा कुभमेळा होता. श्रद्धामय हि‍ुस्थानची कुभमेळा ही एक महापर्वणी असते ह्या महोत्सवास ज्यास धड चालताही येत नाहीं,असे वृद्ध जातात आणि ज्यास काहींच कळणें शक्य नाहीं, अशी तान्ही मुलेही नेतात अष्टौप्रहर पैशाच्या पेटीजवळ ठाण बाधून बसलेले शेठ्ये लोक आपला रोजमेळ टाकून या मेळाम येतात, आणि ज्याचें पदनख पाहण्याचें सूर्यासही भाग्य नाही, अशा पडद्यातील स्त्रियाच्या मुखकमलाचे नुसते रान गगातटाकी भर माध्यान्ह काळी चोहोकडे पसरलेले दिसते ! वारुळातील मुग्याप्रमाणे चोहोकडे पसरलेल्या असख्य जनसमर्दातून निरनिराळया प्रातातील विविध शिरस्त्राणांची डोकीं वर निघून,आसेतु हिमाचल सारा देश एक राष्ट्र बनला आहे,हे न बोलताच सागत असतात. शिवरूप झालेल्या तपस्व्याचे जटाभार आणि मदनमूर्ति सुदर स्त्री पुरुषांचे कुतल केशकलाप, ज्या एकाच गगाप्रवाहात निमज्जन करतात, ती भगीरथाची भागीरथी म्हणजे भगवताच्या भक्तांचेच विविध स्वरूपाने नटलेले, पण अतर्यामी एक असें व्यक्त स्वरूप होय, असे त्या वेळी दिसून येतें. तपश्चर्येने रविमडळासही दिपविणारे महात्म्यांचे उग्र व तेजस्वी चेहरे आणि किंचित् श्रमाने म्लान झालेले, व कज्जलमिश्रित घामानें मलिन झालेले सुकुमार साध्वी स्त्रियाचे मुखचद्र यास एका मेळयात एकत्र धारण करणाऱ्या हिंदुधर्मांत आपण जन्माला आल्याबद्दल भाविकांस त्रिवार धन्यता वाटते ! पण भोळया भाविकांस दिसणाऱ्या या उच्च दृश्यांत चिकित्सक दृष्टीच्या

दयानदांस कांहीं वेगळेंच दिसू लागले मयसभेंतील भ्रामक देखाव्याप्रमाणें भक्तिभाव आणि वैराग्य या बाह्य चिन्हांच्या मुळाशीं छळ, कपट आणि आळस त्यांस दिसून आला भोगमय त्याग, दुराचारमय साधुभाव, बैरागयाची अतुल संपत्ति, सन्यस्ताची गुप्त रखेली, साधूंचा कार्यसाधूपणा, महंताची लोकेषणा, पंडिताचें अज्ञान आणि गुरुमहाराजाचे पाखंड, अशा अनेक रूपानी हिंदु धर्माचें अधःपतन त्यास दिसू लागले. त्यातल्या त्यात जें सर्वसामान्य वैगुण्य त्यास दिसून आले तें त्याचे चरित्रकार स्वामी सत्यानंद याच्यान्त शब्दाचें भाषांतर करून आम्ही देतों "ह्या मोठ्या मेळ्यात एकही मन्याचा साहाय्यक साधु दिसला नाहीं. हिमाचलाच्या पायथ्याशीं त्याना एक सत्पुरुष असा भेटला नाही की, जो बंधुप्रेमानें प्रेरित असून ज्याच्या ठिकाणीं परपीडेबद्दल अनुकंपा आहे. ब्रह्मज्ञानाचा अभिमान बाळगणाऱ्या शेकडों पुरुषात यत्किंचितही क्रियाधर्म किंवा पराक्रम दिसला नाहीं. गंगौघाच्या पवित्र आणि निर्मल तीरावर भगवद्भक्ति व प्रजाप्रेम यांची एकत्र माला जपणारा एकही पुरुष आढळला नाही"

तात्पर्य, विरक्ताने 'मी उपकारापुरता उरलो' ही हुरूप धरावी, ज्ञात्याने आपली आत्मौपम्यबुद्धि सतत क्रियेंत व्यक्त करण्यासाठीं झटावे आणि भगवद्भक्ताने 'ज्यास आपंगिता नाहीं, त्यास धरी जो हृदयीं' ह्याप्रमाणे भगवताची मूर्तिच बनून रहावें, अशा प्रकारची ही निदानपक्षींची अपेक्षाही अगदींच व्यर्थ ठरली ह्याप्रमाणे गुरुजींची आज्ञा घेऊन दयानंद जे हरिद्वारला गेले, तेव्हा तत्कालीन हिंदुसमाजाबद्दल त्याची कलुषित वृत्ति होऊन त्यांनी व्याख्यान, विज्ञापन आणि शास्त्रार्थ अशा साधनत्रयीची योजना मनात धरून आपल्या लोकशिक्षणाच्या उद्योगास आरंभ केला.

तेथे हृषिकेशाच्या रस्त्यावर त्यानी आपली मठी उभारली व त्यावर "पाखंडखंडनी" अशी पाटी लावली यात्रेकरू मंडळींत भागवतखंडणाच्या हजारों प्रती वाटल्या आणि त्याचबरोबर तीर्थ, क्षेत्र आणि तांत्रिक जैनादि पंथ याच्यावर आपले तीक्ष्ण टीकास्त्र सुरू केलें. यानंतर वर्णभेद आणि मूर्तिपूजा यावर लवकरच गदा येणे हे अगदीं स्वाभाविकच होतें. त्याच कुंभमेळ्याचे वेळी एकदा काश्मीर आणि जम्मूचे महाराज विशुद्धानंदस्वामीस बरोबर घेऊन दयानंदांच्या भेटीस गेले असता तेथें जो संवाद झाला त्यात दोन महत्त्वाच्या गोष्टींचा दयानंदानीं आपल्याकडून खुलासा केला. 'ब्राह्मणोस्य मुखमासीद् बाहू राजन्यः कृतः। ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रोऽजायत।' ह्या वेदातील सुप्रसिद्ध मंत्रांचा

जो लोक अर्थ समजतात तो खोटा आहे. ईश्वराच्या मुखापासून ब्राह्मण झाले बाहू-पासून क्षत्रिय झाले वगैरे प्रकारचा त्या मंत्राचा अर्थ नाही. अर्थात् मुख, बाहू, मांड्या व पाय हे परस्पर कायमचेच भिन्न अवयव आहेत, तसे वर्ण कायमचे भिन्न नाहीत तर वरील मंत्राचा अर्थ इतकाच की, जे गुणकर्मांनी अत्यंत श्रेष्ठ ब्राह्मण ते मुखापासून उत्पन्न झालेले नसून मुखाप्रमाणें वरिष्ठ होत आणि जे बाहूप्रमाणें बलिष्ठ ते क्षत्रिय होत वरील शरीराचे अवयववाचक शब्द केवळ गुणकर्मवाचक आहेत ते वस्तुतः ईश्वराचे अवयव नव्हत कारण ईश्वर निरवयव आहे त्याची प्रतिमा कल्पिणें हा मूर्तिपूजकाचा मूर्खपणा आहे' कारण ईश्वराची श्रुतिच स्पष्ट आहे की, ["न तस्य प्रतिमा अस्ति यस्य नाम महद्यशः ॥ य० ३२–३"] अनंत ऐश्वर्यवान अशा त्या परमपुरुषाची प्रतिमा, वजन अगर माप करता येणार नाहीं."

एकदरीत, हरिद्वाराचा कुंभमेळा पाहून स्वामींची फार निराशा झाली जिकडे तिकडे मूर्तिपूजकाचे अज्ञान आणि स्वार्थसाधकाचें कपट पाहून त्याचे मन विटले हिंदुधर्मरूप विराट पुरुषाच्या छातीवर सत्ता गाजवणाऱ्या अज्ञान आणि भ्रांतीच्या सहस्रमुखी राक्षसापुढें मी एक व्यक्ति काय करू शकणार ! असे त्यास वाटू लागले पण ही निराशा फार वेळ टिकली नाही. काही काळ तप करून आपण अधिक सामर्थ्य मिळवू अशी त्यानीं उमेद धरली आणि त्यानंतर संचार थोडा कमी करून वाणीवर जय मिळविण्याकरिता अथवा तिला दिग्विजयी करण्याकरिता संस्कृताशिवाय अन्य शब्द उच्चारावयाचाच नाही, असा नियम त्यानीं बरेच दिवस कडक रीतीनें पाळला. तसेंच आपल्याजवळची सर्व चीजवस्तु गोरगरिबास वाटून टाकून आपल्याजवळचा महाभाष्याचा ग्रंथही त्यानीं आपल्या गुरुजींकडे पाठवून दिला व ते काहीं काळ तरी सर्वस्वत्यागी बनले.

हा आपण साराच त्याग काय चालविला आहे ? असें कैलासपर्वतजींनी त्यास विचारले, तेव्हा स्वामीनीं त्यास उत्तर दिलें कीं, "जोपर्यंत आपण आपल्या गरजा संपुष्टात आणल्या नाहींत तोंपर्यंत आपल्याला स्वातंत्र्याचा लाभ घडत नाहीं आणि आपला कार्यभागही सिद्ध होत नाहीं. मी आता ज्याअर्थी साऱ्याच पंथाशीं स्पष्ट विरोध करू पहात आहें, त्याअर्थी मी अगदी निर्द्वंद्व असावे हे अत्यावश्यक आहे." स्वामी त्या वेळीं दोन-दोन, तीन-तीन दिवस गंगातटाकी उघडेच वाळूवर अन्नपाण्यावाचून अगदीं निराहार स्थितींत पुढील मार्गाचें चिंतन करीत रहात

असत एकदा एका खलाशाच्या झोंपडीशेजारी असेच निराहार स्थितींत ते पडले असता, त्या खलाशाला दया येऊन त्याने आपल्या भाकरींतील भाकर त्यांस खाण्याला दिली शूद्राच्या हातचे खाण्याला त्याना मुळींच सकोच वाटत नसे उलट पाकक्रिया करण्याचें काम शूद्राचेच आहे असे ते सागत ते गोरगरीब शेतकऱ्याकडेही भोजनास जात एकदा कोणी एकाने त्याचे वाढलेले ताट पायात जोडे घालून आणले, तेव्हा त्यास दुसऱ्याने आक्षेप घेतलेला पाहून स्वामींनी मी असल्या गोष्टीस महत्त्व देत नाही असे सागितले

स्वामींनी त्यावेळी ज्याप्रमाणें सर्व वस्तूंचा सग्रह सोडला, त्याप्रमाणे फारसे बोलणेही सोडले परतु व्रतपालनाच्या आवडीपेक्षा गुरूपदिष्ट धर्मप्रचाराची कड त्याच्या ठिकाणी जास्त होती हरिद्वारला एक दिवस ते आपल्या कुटींत असता " निगमकल्पतरोर्गलित फलम् अशा भागवताचा महिमा वेदाहूनही अधिक आहे," असे बाहेर कोणी म्हटल्याचे ऐकले त्याबरोबर झटदिशी त्यान्या मताभिमानाने मौनव्रताचा भग करून एकदम बाहेर येऊन भागवतखडनास पुन्हा सुरुवात केली.

ते सूर्यनारायणाचे प्रकाशकिरणात गगातटाकीं सदा विचरत होते खरे, पण कोणी जर त्यांस विचारले की, ही गगामाई, आणि हे भगवान् सूर्यनारायण ह्या विभूति आहेत काय ? तर त्यावर स्वामी निक्षून सागत की, ते जड पदार्थ आहेत मग तुम्ही गगेतील वाळू अगास का लावता ? म्हणून प्रश्न केला तर, अगावर माशा मुर्कुटानी त्रास देऊ नये म्हणून, असे ते उत्तर देत गगातटाकीं सूर्यास अर्घ्यप्रदान करणेही त्यास धर्मखूळच वाटे ते म्हणत तुम्ही पाण्यात अर्घ्यप्रदान करतां त्यापेक्षा झाडाच्या खालीच का पाणी घालीत नाही त्याचा काही उपयोग तरी होईल ते म्हणत, ही सारी माहात्म्ये म्हणजे निव्वळ गप्पा होत एका वेदानुसार वागण्यानेच पापक्षय होतो तसेच राम आणि कृष्ण ह्या अवताराबद्दल ते म्हणत की, ते प्रतापी पुरुष होते इतकेच, त्याना देव मानणे व्यर्थ आहे

दुसऱ्यास निरुत्तर करण्याचे त्याचे अनेक मार्ग असत "हरिभजो छोड दो धदा" असा जप करणाऱ्यास ते नीट समजुतीने सागत की, "भला, सत्यकर्म कैसे छोडे जा सक्ते है ? " कोणी म्हटले की, आपण अवधूत ह्या खडनमडनाच्या खटाटोपांत कशाला पडावें ? त्यास ते उत्तर देत की, " आम्ही हा सारा खटाटोप करूनही पुन्हा निर्लेपच आहोत. आम्हाला हा झगडा कशाला पाहिजे ? पण हे ऋषिऋण आहे, तें फेडलेच पाहिजे. जनहितबुद्धीने प्रेरित होऊन शास्त्रीय प्रवृत्ति करणें सर्वांनाच योग्य

आहे. आपल्या देशांतील लाखो लोक अनेक प्रकारचें दैन्य भोगीत असलेले आपण पहात असता त्याचें दैन्य निवारण्यासाठीं न झटणे हें आत्मीय प्रेम तरी कसलें ?" तात्पर्य, समजुतदाराशीं समजुतीच्या गोष्टी बोलाव्या ऐकतील त्यास संध्या, गायत्रीप्रणवाचा जप असे नित्यकर्म सांगावे, पुराण मूर्तिपूजा, वैष्णवादि संप्रदाय, तंत्रादि वाममार्ग, मदिरादि मादक पदार्थ, व्यभिचार, चोरी आणि कपट ह्या अष्टकांचा त्याग सांगावा, अशी त्यांची नेहमीं शिकवण असे क्षत्रिय वैश्यांची मुले दाढीमिशा फुटल्या तरी उपनयन संस्कार न झालेली पाहून त्यांना राग येई ते म्हणत "देशाच्या अधोगतीला संस्कारलोप हेंच कारण होय संस्काराने वर्ण तेजास चढतो"

अशा समजुतीच्या संवादाशिवाय त्यास अन्य प्रकारही अनुसरावे लागत कोणी त्यांचा घात करण्याची बुद्धि ठेवून आल्यास ते आपल्या मनगटाच्या जोरावर त्याची गाळण उडवीत किंवा त्यास आपल्या यौगिक बलानें चीत करीत त्यांच्या एका हुंकारासच कित्येक लोक वचकत ! एकदा अगदीं कडाक्याची थंडी पडली असता त्यांनी योगाग्नी एक प्रक्रिया दाखविण्यासाठीं आपले हाताचे आंगठे ढोण्यावर इतके जोरानें दाबले कीं त्यासरशी त्यांच्या कपाळावर कडक उन्हाळ्याप्रमाणें घामाचे बिंदु दिसूं लागले हें पाहून सर्व मंडळी चकित झाली. एकदा खदोईचा एक छत्रसिंह नावाचा जाट जग वंध्यापुत्रसमान कल्पित आहे वगैरे अद्वैतांतील मायावादाच्या बाता मारूं लागला, तेव्हां स्वामींनीं त्याच्याशीं युक्तिवाद करण्याच्या भानगडींत न पडतां हळूच एक श्रीमुखांत लगावली त्याबरोबर तो जाट रागावलासें पाहून स्वामी म्हणाले कीं, "तुमच्या अद्वैतांत तुम्हाला मारणारा दुसरा कोण निघाला ? तुम्हाला ह्या मिथ्या गोष्टीची प्रतीति कशी आली ?" याप्रमाणे, कोठें "इतिहासपुराणानि धर्मशास्त्राणि श्रावयेत्" यांतील पुराणाचा अर्थ पुरातन असा करून शाब्दिकाजवळ व्युत्पत्तीची शिकवणी, तर कोठें शस्त्रार्थी आडदांड येतील त्यास लाठीची (शाब्दिक) हबकणी, कोठे, "अहो, एवढा मोठा कैलासपर्वत आमच्या कुटींत कसा शिरला !" असा अहंमन्याचा उपहास तर कोठें पंडित म्हणविणाऱ्यांना व्याकरणादि क्लिष्टशास्त्रांतील कूट प्रश्नांचा त्रास "अहो, अद्वैती तुम्ही आणि ईश्वर एकच ना मग ही मेलेली माशी उठवा पाहू !" अशी कोणाची अडवणूक, तर "अदृश्य रजःकण झरोक्यांत दिसतात त्याप्रमाणे निराकारास अंतःकरणाच्या झरोक्यांतून पहावें" अशी अडलेल्या साधकाची सोडवणूक, अशा निरनिराळ्या तऱ्हानीं प्रतिपक्षावर छाप टाकण्याचा त्यांनीं क्रम सुरू केला.

त्या मुदतींत ते गंगाकिनारा सोडून फारसे कोठेंच गेले नाहींत जे त्रैवर्णिक येतील त्यास यज्ञोपवीत व गायत्रिमंत्राचा उपदेश याप्रमाणे अनुग्रह देण्याचा सपाटा त्यानीं जोराने चालविला त्याचप्रमाणे कर्णवास येथे त्यांनीं (सन १८६८ साली) देशोदेशींच्या पडितांच्या साहाय्याने एक मोठा यज्ञ केला बहुतेक सारी पुराणे आणि ईश्वराचीं सगुण चरित्रे यज्ञप्रसगींच सांगितलेलीं आहेत. पण या यज्ञप्रसगी फावल्या वेळीं पुराणे, तत्रे, देवदेवतापूजन, निरनिराळे पंथ आणि पचमहापापे यावर स्वामींकडून अत्यत कडक रीतीने निर्भर्त्सना करण्यात आली अशा त्या कठोर टीकेचा परिणाम लोकांवर हळुहळू होऊ लागला तो ऐकून अनुपशहर येथील एका हिरावल्लभशास्त्र्यानीं आपल्या देव्हाऱ्यातील श्रीठाकुरजींना गगेत जलसमाधि दिली ! प० अनगड रामशास्त्री, गोसावी बलदेवगीर इत्यादि अनेक लोकांनी आपल्या नित्यपूजेच्या शाळिग्रामादि देवाची तीच वाट लावली ! कोणी प० टीकाराम यांनी एका देवस्थानचे पुजारीपण सोडले कोणी आपल्या गळयातल्या साप्रदायिक कठया व रुद्राक्षमाला फेकून दिल्या आणि याचेच अनुकरण वाढता वाढता छलेश्वरचे ठाकूर मुकदसिग यांनी आपल्या गावच्या झाडून साऱ्या देवळातील देवाच्या मूर्ति भ्रष्ट करून काळी नदीत फेंकून दिल्या !

दयानदाच्या या क्रांतिकारक चळवळीने त्याना मित्रापेक्षा शत्रूच फार केले. बरोलीचे राव कर्णसिंह यांनी तर त्यास जीवे मारण्याचा अनेक वेळा प्रयत्न केला. पण त्यात त्यास यश आले नाहीं त्यास निराश होऊन आपल्या गावीं परत जावें लागले व तेथे त्यास भ्रम होऊन त्याचा वाईट रीतीने शेवट झाला अशा रीतीने क्षत्रियाचा व दयानदाचा कोठे कोठे वैरभाव आला असला तरी एकदरीत त्याच्याकडून यज्ञोपवीत घेणारात क्षत्रियाचाच भरणा जास्त होता त्याच्या चळवळीला ब्राह्मणवर्गाकडूनच विरोध अधिक झाला आणि त्याची कारणेही उघडच आहेत. पुराणिक, पुजारी, पुरोहित, पाठक आणि पडित हे सारे प्राय: ब्राह्मणवर्गापैकीच असत आणि मुख्यत्वेकरून त्याच्यावर आणि त्यांच्या क्षत्रिय शिष्यांवरच दयानदांची तिरदाजी सुरू असे यामुळे एकदा एका माथेफिरूने त्यांस विषारी विडा देऊन त्यांचा घात करण्याचा प्रयत्न केला होता पण स्वामींची पुण्याई जबर होती. त्यानी सशय येताच योगप्रक्रियेतील नवलिकर्म करून लगेच आपलीं आतडी धुऊन काढलीं व ते त्या अपघातांतून बचले

इ सन १८६९ साली स्वामी विरजानंद समाधिस्त झाले. ते हयात होते तों-

पर्यंत दयानदांचा धर्मप्रचार त्यांच्याच तत्रानें चालत असे. दयानदांच्या क्रांतिकारक मतांची त्यांच्या गुरुजींकडूनच प्रेरणा होत असावी असे दिसतें एकदां दयानंदांचे सहाध्यायी प० जुगल किशोर यांनी विरजानदांकडे जाऊन दयानदांनीं सारा अधर्माचा प्रसार चालविला आहे शालिग्रामाची पूजा करणे, कठी व तिलक धारण करणे, या सर्वांसच दयानद थोताड म्हणत आहेत, इत्यादि तक्रार केली. तेव्हा विरजानदांनीं दयानदाचा पुरस्कार करून ते म्हणाले, "शालिग्राम याचा अर्थ भाताची रास असा आहे असल्या वस्तूची पूजा करणे व्यर्थच आहे तसेंच कंठी व तिलक धारण करण्यास शास्त्रात आधार नाहीं" ते गुरुजींचे भाषण ऐकून पंडितजी लगेच आपल्या गळ्यातील कठी तोडून मोकळे झाले ! विद्यार्थ्यांना स्वतां न शिकविता ते त्यास आपल्या गुरुजींकडे पाठवून देत पण गुरुजींचें हें छत्र नाहींसे झाल्यावर ठिकठिकाणच्या छात्रवर्गाची वैदिक शिक्षणाची काळजी स्वामी दयानदानाच घ्यावी लागला फर्रुखाबाद येथे कोणी एक वैश्य शिवालय बाधीत होता. त्याचे मनावर मूर्तिपूजेचे वैयर्थ्य स्वामींनीं बिबवून त्या होणाऱ्या शिवालयाची पाठशाळा केली हीच स्वामींची पहिली पाठशाळा होय यानंतर लागोपाठ कासगज, मिर्झापूर, छलेश्वर आणि बनारस येथे पाठशाळा स्थापन केल्या सध्या, अग्निहोत्र आणि वैदिक ग्रथाचा (अष्टाध्यायी, महाभाष्य वगैरे) पाठ अशा गोष्टी या शाळातून आवश्यक असत गावच्याच विद्यार्थ्यांना मधुकरी मागावी लागे शिष्यवृत्तीचे पारितोषक म्हणून खाण्यास तूप जास्त मिळत असे उलट सूर्योदयापूर्वी स्नानसध्या न उरकल्यास सायंसध्या होईपर्यंत विद्यार्थ्यांस उपाशी रहावें लागे. ह्या शाळा फार दिवस टिकल्या नाहींत शिवाय शाळेतील विद्यार्थ्यांवरील जुन्या मताचा पगडा जाईना पाठशाळातील अभ्यासक्रम सपल्यावर त्याच्या आनुवांशिक 'पोपलीला' पुन्हा सुरू होत यामुळे त्या सर्व पाच सात वर्षांच्या आतच बद करून त्या शाळांच्या फडाचा विनियोग स्वामींचे वेदभाष्य प्रसिद्ध करण्याकडे झाला. ह्याप्रमाणे स्वामींच्या सैन्यात नवीन धर्मवीराची भरती होण्यात खड पडला असतां, त्यांनी आपली सारस्वत समशेर पाजळून ते एकटेच निर्भय होत्साते शास्त्रार्थांच्या समरांत लढण्याकरितां सिद्ध झाले

---

# प्रकरण पांचवें

# शास्त्रार्थांच्या चकमकी

**न तस्य प्रतिमा अस्ति यस्य नाम महद् यशः ॥**

—य०, ३२।३

" ज्याचें महान् प्रसिद्ध यश आहे, त्या परमात्म्याची कोणतीही प्रतिमा नाही."

स्वामी विरजानंदाच्या पश्चात् दयानंदांना पहिलाच शास्त्रार्थाचा प्रसंग फर्रुखाबाद येथें आला. मनुस्मृतींतील [ देवताभ्यर्चनं चैव समिदाधानमेव च ] पूजाविधानावरून मूर्तिपूजा शास्त्रीय ठरते असा पूर्वपक्ष होता स्वामींनी उत्तरपक्ष करतांना पूजा याचा अर्थ वंद्य मानणें असा करून मनुस्मृतींतील वादग्रस्त वचनाचा अर्थ अग्निहोत्र करणे व विद्वज्जनांचा सन्मान करणे, असा केला. या वादाचा निर्णय लावण्याकरितां तेथील पंडित काशीस जाऊन त्यांनीं स्वामी विशुद्धानंद प्रभृति काशीच्या पंडितांकडून शास्त्रार्थाबद्दल व्यवस्थापत्र आणविलें. त्यांत तीर्थविधि, पुराणें आणि मूर्तिपूजा यांचें प्रामाण्य, अथर्ववेद, देवि, अथर्वशीर्ष, गोपाळतापिनी, बिल्व, इत्यादि उपनिषदें' आश्वलायन गृह्यसूत्रें, मनुस्मृति, बोधायन कल्पसूत्रें, तैत्तिरेय आरण्यक, महाभारत इत्यादि आधारानें सिद्ध केले होते. हें व्यवस्थापत्र पं० श्रीगोपाळ यानीं स्वामींना दाखवितां " हीच का काशीच्या पंडितांची विद्वत्ता ? " असें म्हणून त्यांनीं उपहास मात्र केला. पण इतक्यावरच तें थांबलें नाही श्रीगोपाल पंडित यानीं तें व्यवस्थापत्र एका बांबूला लावून तो बांबू स्वामींच्या आश्रमाजवळ मुद्दाम पुरला. तेव्हा स्वामींनीं त्यास शास्त्रार्थाकरितां बोलावलें " तुमची जागा भारलेली आहे, यास्तव तुम्ही आमच्याकडेच या मग शास्त्रार्थ पाहून घेऊं " असा त्याचा निरोप आला तेव्हा " ज्याला स्त्रीलिंग आणि पुल्लिंग कळत नाही, त्याच्याजवळ शास्त्रार्थ करून काय फायदा ! " असें उपहासपूर्वक म्हणून स्वामी स्वस्थ बसले. पण स्वामींच्या चरित्रकारांचें वरील व्यवस्थापत्राला उत्तर असें आहे कीं, त्या व्यवस्थापत्रांत वैदिक संहितेंतील आधार मुळींच नाहींत आणि इतर ठिकाणचे कांहीं आधार असले तरी ते प्रक्षिप्त आहेत, आणि कांहीं वेदविरोधी असल्यामुळें

अग्राह्य आहेत. त्यासंबंधी जास्त विचार अखेरच्या आर्यमत-समीक्षा या भागात व्हावयाचा असल्यामुळें येथें आम्ही अधिक विस्तार करीत नाहीं.

त्यानंतर स्वामी कानपूर येथे गेल्यावर त्यानी एक उलट संस्कृत जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्यात गप्पाष्टक आणि सत्याष्टक अशी दोन अष्टके होती. पैकीं गप्पाष्टकात [१] सामान्य मर्त्य जीवानीं केलेले पुराणादि सर्व ग्रथ, [२] प्रतिमा-पूजा, [३] शैववैष्णवादि पथ, [४] तात्रिक वाममार्ग, [५] मादक पदार्थसेवन, [६] व्यभिचार व [७] असत्य कपट वगैरे आणि [८] चोरी सत्याष्टकात [१] एकवीस शास्त्रे (वेद, उपवेद, वेदागें आणि उपनिषदे), [२] गुरूपास्ति आणि वेदाध्ययन, [३] सध्या, अग्निहोत्र वगैरे वर्णाश्रमधर्म, [४] पचमहायज्ञ, पतिपत्नी-धर्मपालन, [५] शम, दम, तप, यमादि समाधीपर्यंत उपासना, सत्सगपूर्वक वानप्रस्थ, [६] ध्यान, विवेक, वैराग्य. सन्यासोत्तर निष्कामता, [७] जन्ममृत्यु, सुखदु.ख, काम, क्रोध, लोभ, मोह, कुसगतींचे परिणाम इत्यादींचे भौतिक व आध्यात्मिक शास्त्राच्या साह्याने नियमन, [८] अज्ञान, दभ, प्रेम, द्वेष, मृत्युभय आणि त्रिगुण यापासून होणाऱ्या दुःखाचा नाश, पंचमहाभूतात्मक देहातून सुटका आणि मोक्षसुखाची प्राप्ति, याप्रमाणें मुद्दे होते.

त्यानतर कानपूर येथे पंडित हलधर ओझा आणि दयानद यांच्या दरम्यान जो शास्त्रार्थाचा वाद झाला तो सारा प्रकार हास्यास्पदच दिसतो. ह्या व त्यापुढेंही वेळोवेळीं आणि ठिकठिकाणीं दयानदानी ज्या शास्त्रार्थाच्या सभा भरविल्या, त्याची माहिती आर्यसमाजी वाङ्मयातून वाचली म्हणजे त्या सभातून विद्वत्तेचें यत्किंचितही दिग्दर्शन नसून पोरकटपणा व हेकटपणा, चिरडखोरपणा आणि मूर्खपणा याचेच भरपूर प्रदर्शन दिसते. परतु प्रत्येक ठिकाणचे शास्त्री व पंडित एकजात असे नालायक असावेत, ही गोष्ट खरी मानणें फार कठीण आहे. आर्य-समाजी हकीगतीवरून या शास्त्रार्थाच्या सभाचा सामान्यत्वे गोषवारा सागावयाचा तर ह्या सभा दयानदपक्षीयानीं भरविलेल्या असावयाच्या त्यात कित्येक वेळीं सरकारी युरोपियन रेव्हेन्यू अंमलदार किंवा शेठसावकार शास्त्रार्थाचे मध्यस्थ नेमायचे, सभासरक्षक म्हणून पोलीससुद्धा हजर असावयाचे, वेदात म्हणजे वेदसंहितेंत मूर्ति-पूजा आणि अवतारवाद यास प्रामाण्य आहे काय, हा बहुतकरून एकच ठरीव प्रश्न वादास असावयाचा. आणि हें स्वामींचें आव्हान स्वीकारून प्रातोप्रांतींच्या जाड्या पंडितांनीं अगोदर सभेला समति देऊन मग शास्त्रार्थाची वेळ आली कीं हजार सबबी

सांगावयाच्या. एकच एक मुद्दा अगदीं उघड आणि स्पष्ट असतां, वेदातील मूर्ति-पूजेसंबंधीं वचन कोणीही न दाखवितां कांहींतरी अवातर आणि असबद्ध गोष्टीं-बद्दल पोरांसारखें एकेरीवर यावयाचे, आणि शेवटी दयानद हरले अशी खोटीच ओरड करून गुडगिरीनें सभा मोडावयाची तसेच शेवटीं शास्त्रार्थात हरले कोण याबद्दल दोन अगदीं भिन्न जनवार्ता मागे रहावयाच्या, आणि त्यात सरकारी अंमलदार, ब्राह्मसमाजी, पाद्री लोक, इग्रजी व उर्दू वर्तमानपत्रे ही बहुधा स्वामी-च्या बाजूलाच असावयाचीं असा हा अगदी ठरल्यासारखाच प्रकार दिसतो. त्यांत स्वामी दयानद व तत्पक्षपाती याचे वर्तन अत्यत सरळ, उदार, शांत व क्षमाशील असेंच असावयाचे व प्रतिपक्षाचे वर्तन हरएक प्रकारे खोडसाळ व मूर्खपणाचे असावयाचे असे एकसारखे वाचीत गेले, म्हणजे हे सर्व वर्णन एकतर्फी लिहिले असावे, असे वाटल्यावाचून रहात नाही कारण, स्वामी दयानदाबद्दल अनादर ध्वनित करण्याचे जरी या स्थलीं काहीच कारण नाहीं, तरी प्रतिपक्षी विद्वान् माणसेही इतकी अविचारी असावीत हे सभवनीय दिसत नाही दुसरी गोष्ट अशी की, " वेदात मूर्तिपूजा सागितली आहे काय ? " हा एकच वादाचा प्रश्न महिनेच्या महिने व वर्षेच्या वर्षे पडितापुढे असतां वेदान्त तसे वचन आहे की नाही, याचा काडीमात्र अगोदर शोध किवा विचार न करिता इतक्या सकुचित मुद्द्यावर हजारो लोकाना जमवून अनेक शास्त्री आणि पडित शास्त्राला उभे राहिले कसे ? याचा आम्हाला अर्थच कळत नाही वेदात तशी वचने दाखवून त्या वचनाच्या अर्थाबद्दल वाद माजला असता तर ते शक्य होते पण मूर्तिपूजेचा पुरस्कार करणारे वचन वेदात एकही नाही, असेल तर दाखवा असे असदिग्ध आव्हान दयानंदाकडून आल्यावर ते आव्हान स्वीकारून भरलेल्या ठिकठिकाणच्या सभातून जमलेल्या शेकडो शास्त्री-पडितापैकी एकानेही ते न दाखविता सभा विसर्जन व्हाव्या, हा साराच कल्पनातीत प्रकार दिसतो वेदात मूर्तिपूजेला आधार असल्यास तो दाखविणे, किवा मूर्तिपूजा विधान नाही हें कबूल करणे व मूर्तिपूजेचे समर्थन वेदोत्तर शास्त्रग्रंथाच्या आधारे करणे, ही गोष्ट इतकी साधी आहे की त्याचा उलगडा उत्तर भारतातील शेंकडों पंडितां-पैकीं कोणासच करतां येऊं नये हे मोठेंच आश्चर्य होय! आम्हास ह्या वादांतील दुसरी बाजू पुरी समजण्याला आज तरी अन्य साधन उपलब्ध नाहीं आणि शिवाय आर्यसमाजाचा इतिहास शक्य तों त्यांच्याच ग्रथांच्या आधारें

लिहिलेला बरा म्हणून आम्ही या ठिकाणीं त्यांच्याच ग्रथांच्या आधारावर पुढील हकीगतही लिहीत आहोंत. ह्या मुद्द्याचा सांगोपांग विचार अखेरच्या भागात होईल.

कानपूरच्या शास्त्रार्थांत दोन मुद्दे मूर्तिपूजेच्या बाजूने मांडण्यांत आले एक द्रोणाचार्यांची मृण्मय मूर्ति करून तिच्यापुढे धनुर्विद्येचा अभ्यास करणाऱ्या एकलव्याची भारतातील कथा व दुसरा मुद्दा असा की, जर सर्वत्र देव संचरला आहे, तर तो प्रतिमेत मानायला हरकत कोणती ? यापैकी पहिल्या मुद्द्यास स्वामींनीं असे उत्तर दिले की, “ एकलव्याची कथा म्हणजे काहीं मूर्तिपूजा करावी अशी शास्त्राज्ञा नव्हे अडाणी माणसे ज्या गोष्टी नेहमी करतात तसलीच गोष्ट एकलव्याने केली असेल पण एकलव्य काही ऋषि किंवा मुनी नव्हे, किंवा त्यानें जे केले तेही कोणी ऋषि अगर मुनींनी त्यास सांगितले, म्हणून नव्हे अर्थात् ती कथा प्रमाणभूत होत नाहीं ” तसेच दुसऱ्या मुद्द्याला स्वामींचा जबाब असा होता की, “ सर्वाभूतीं ईश्वर असला तरी त्यास विशेषेकरून पाषाणमूर्तीत का मानावयाचा ? तसेंच सचेतन आणि सुबुद्ध पुरुष सोडून जड व अचेतनाचीच पूजा का करावयाची ? ” ह्या शास्त्रार्थाच्या अखेरीस कोणता पक्ष जिंकला व कोण हरले, ह्याबद्दल पुन्हा वाद राहिलाच ! तेव्हा दयानंदाच्या पक्षाने अध्यक्ष थेरसाहेब यांचे पत्र प्रसिद्ध केले की, दयानंदाचे म्हणणे वेदाना धरून होते तात्पर्य, स्वामी हरले म्हणून त्यांचा कोणी उपहास करून नेहमीप्रमाणे त्यांच्यावर दगडफेक केली, तर दुसऱ्या कित्येकास ते जिंकले असें वाटून, त्यांची मूर्तिपूजेवरील निष्ठा उडाली. व ज्या मूर्तींचे त्यांनी पिढ्यानपिढ्या घरात देव्हारे माजविले होते, त्यास ते भराभर रस्त्यात व नदींत फेकून देऊ लागले ! त्यावर कानपूरचे पंडित ओझा यांनी अशी जाहीर विनंति प्रसिद्ध केली की, देवाच्या मूर्ति अशा फेकून देणे हे पाप आहे यासाठीं ज्याना त्या नकोशा झाल्या असतील, त्यांनी त्या फेकून न देता आमच्याकडे आणून द्याव्या !

हिंदुस्थानांतील वेदविद्येचे मुख्य पीठ म्हणजे श्रीक्षेत्र काशी अशीच त्या शहराची पूर्वीपासून ख्याति चालत आली आहे. शास्त्रार्थाचे हायकोर्ट म्हणजे काशीचे पंडित अशी त्यांची पूर्वीपासून प्रतिष्ठा होती शिवाय दिग्विजयास निघालेल्या पंडितास काशीस गेल्यावाचून गत्यंतरच नव्हतें. तेव्हा दयानंदांनीं काशीस जाऊन शास्त्रार्थ करावा अशी महत्त्वाकांक्षा धरली. व त्यानीं लवकर तसा योग घडवून आणला. ह्या शास्त्रार्थाच्या सभेला आर्यसमाजाचे इतिहासात फार महत्त्व प्राप्त

झालें आहे. सभेच्या कार्यक्रमात दयानंदांच्या बाजूला कोतवालाची सत्ता होती व पंडितांच्या बाजूस काशीचे महाराज होते. पांच-पन्नास हजार मंडळी शास्त्रार्थाला हजर होती असें म्हणतात यातील पाच आणि पन्नास हजार या सख्येंत जितका मेळ आहे तितकाच ह्या काशीच्या अतिशय गाजलेल्या शास्त्रार्थाच्या ज्या हकीकती प्रसिद्ध झाल्या त्यात मेळ आहे त्यामुळें सभेत काय प्रश्नोत्तरे झाली हे निश्चितपणे आज सागता येणें अशक्य आहे एकदरीत सभेचे काम चालावे तसें चालले नाही, आणि अखेर काहींच निष्पन्न झाले नाही असे दिसते कोणी ह्या शास्त्रार्थाला काशीतले सर्व विद्वान् पडित [ स्वामी विशुद्धानदजी, बाळशास्त्री, शिवसत्हाय, माधवाचार्य, वामनाचार्य, ताराचरण, जयनारायण, तर्कवाचस्पति, राधामोहन तर्कवागीश, अबिकादत्त इत्यादि सत्तावीस अठ्ठावीस पडित ] हजर होते असे म्हणतात, तर कोणी काशीतल्या खऱ्या विद्वानांनी दयानदाच्या पाखड मताकडे मुळींच लक्ष दिले नाही व ते वादास आलेही नाहीत, असें म्हणतात.

श्रीमद्दयानद-प्रकाशकार असें लिहितात की, ह्या महत्त्वाच्या वादापूर्वी काशीतले कित्येक विद्यार्थी आणि पंडित दयानदाची चाचणी पहाण्याकारितां त्याच्याकडे अगोदर येऊन गेले. त्यात एक दिवस " राजारामशास्त्री पण भगवीं वस्त्रे परिधान करून स्वामीजींच्या पाण्डित्याची परीक्षा पाहण्यासाठीं आले होते परतु तेथें पाणी उथळ नव्हतें. यामुळें त्याना काही थाग लागला नाही." काशीतील पडितानीं शालिग्राम राजशास्त्री आदि चार पडितास स्वामींकडे काही विचारपूस करण्यासाठीं पाठविले होते पण त्यास त्या वेळी स्वामींनी कांहींच दाद दिली नाहीं पुढें स्वामींचे प्रमाण ग्रथ तरी कोणते असे विचारण्यास ते पुन्हा आले तेव्हा वेद, उपवेद, वेदागे, उपागें आणि मनुस्मृति असें त्यानीं सागितले पण मनुस्मृतींतील किती श्लोक प्रमाण मानता ? असे विचारल्यावर, त्याचे उत्तर शास्त्रार्थाचे वेळीं सभेंत मिळेल, असें त्यानी सांगितले.

वर जी काशीतल्या पडिताची नावें आलीं आहेत, ते सामान्य कोटीतील विद्वान् नव्हत. त्या काळी काशींतील विद्यापीठ चागलेच जागतें होतें वादाच्या पूर्वी काशीचे एक पडित ज्वाहरदासजी यानीं दयानदाना विचारले की, काशींत तर अनेक जाडे पंडित आहेत. आपण कोणकोणास जिंकणार ? सर्वांचेच कसें निराकरण करणार ? त्यावर दयानंदानीं उत्तर केलें कीं, "आमच्याबरोबर काहीं काळ बोलूं शकेल असा एक दक्षिणी बाळशास्त्री आहे, बाकीचे सारे काकभाषेंतच [नवीन न्यायादिमें] काय ते निपुण आहेत. वेदार्थ करण्यांत त्यांची गति नाहीं."

ह्याच चरित्रकारांनीं स्वामींचा आणखी एकदोघा काशीकर सुप्रसिद्ध पंडितांशीं आलेला संबंध वर्णिला आहे, तोही येथेच देणें बरें त्या वेळी काशींतील एका पाठशाळेंत पंडित शिवकुमार हे अध्यापक होते त्यास धर्मोपदेशक नेमावे असें दयानदाचे मनात होते " परतु स्वामीजींनी ते वेदज्ञानशून्य आहेत असे पाहून त्यास मासिक पन्नास रुपये पगार देऊन ठेवण्याची त्याची लायकी नाहीं असें ठरविले आता आणखी एका महामहोपाध्यायांचे वर्णन सदर चरित्रात कसे केलें आहे तें सागून मग या गाजलेल्या काशीचे शास्त्रार्थाकडे वळू काशीस कोणी रामस्वामी मिश्र या नावाचे एक तरुण महामहोपाध्याय होते त्याना दयानदाच्या-बद्दल फारच अनादर वाटत असे परतु असल्या पाखडयाचे मुखावलोकन करणेही पाप आहे अशा समजुतीमुळे ते दयानदास भेटले नव्हते पण रात्री अधेर पडल्या-वर त्यांच्याकडे गेल्यास त्याचे तोड पाहण्याचा प्रसग न येता वाद करता येईल असें मनात येऊन ते एका रात्री त्याच्याकडे गेले अशा पडिताशी देववाणींत बोलणे हेंही पाप आहे, असे त्याच्या तोडावर सागून त्यानी हिंदींत बोलण्याचा सकल्प केला शास्त्रार्थास सुरुवात करण्यापूर्वी ते म्हणाले की, मी आपल्याबरोबर एक सुरी आणली आहे, ती दोघामध्ये ठेवून शास्त्रार्थ होईल जो हरेल त्याचे ह्या सुरीने नाक कापले जाईल ! स्वामी हसत म्हणाले की, " मीही एक चाकू मध्यें ठेवणार आहे. जो हरेल त्याची जीभ त्याने छाटली जाईल ! कारण, वादविवादात नाकाचा बिचाऱ्याचा सबंध काय ? जीभच खरी अपराधी ! यानतर सुमारें अर्धी घटका त्यांचा सवाद झाला तो काय झाला ते चरित्रात दिले नाही. पण त्यात इतके मात्र वर्णन आहे की, स्वामींच्या भाषणाचा त्याच्या मनावर इतका परिणाम झाला की, त्यानतर त्याचे स्वामींशीं अगदी सरळ व सभ्यपणाचे वर्तन होऊ लागले. हे महामहोपाध्याय कोण ? हे महाराष्ट्रीयांस ठाऊक नसेल पण वरील म० राजारामशास्त्री (बोडस), श्री० बाळशास्त्री (सरस्वती) हे दोघे महाराष्ट्रीय पडित व त्यांचेच सहाध्यायी प० शिवकुमार ह्या लोकोत्तर विद्वत्तेच्या पुरुषाची ह्यांत महाराष्ट्रीय अद्याप विसरले नसतील असले विद्वद्वर आणि त्यांच्याच तोडींचे म्हणून दयानंदांच्या चरित्रात वर्णिलेले व्यंकटशास्त्री आदि पंडितांनीं दयानंदाशीं शास्त्रीय वादविवाद करतांना इतकें अज्ञान प्रगट करावें, हें मोठेंच आश्चर्य होय

ह्या बाबतींत प० नरदेवशास्त्री असा खुलासा कळवितात कीं, " त्या वेळीं वैदिक

विषयाकडे पण्डितसमाजाची प्रवृत्ति नव्हती आणि स्वामी दयानंदांनीं वेदविहित कोणतें आणि वेदनिषिद्ध कोणतें हा प्रश्न एकदम आकस्मिक रीतीनें पंडितसमाजापुढें आणल्यामुळे अशा प्रकारच्या शास्त्रार्थात प्रारंभीं पण्डितसमाजाची गाळण उडाली असल्यास आश्चर्य नाहीं पण कालपरत्वें जेव्हा पण्डितसमाज वैदिक विषयाचा स्वाध्यायपूर्वक ऊहापोह करू लागला तेव्हा तो समाज वेदनिर्दिष्ट स्वपक्षपोषक प्रमाणे दाखविण्यास समर्थ झाला." क्लिष्ट आणि अपरिचित अशा एखाद्या विषयासबधीं अचानक प्रश्न उपस्थित झाला, तर पं० नरदेवशास्त्री म्हणतात त्याप्रमाणे क्वचित् फजितीचा प्रसग येईल. पण काशीच्या महाराजानीं मुद्दाम भरविलेल्या विद्वत्सभेंत झालेल्या चर्चेचा जो इतिहास आर्यवाङ्मयात प्रसिद्ध आहे तो खरा असल्यास त्याला हा खुलासा मुळीच पुरेसा वाटत नाही. दयानदाचे वाद स्वा० विशुद्धानदाना पूर्वीच हरिद्वारीं कुभमेळ्याचे वेळीं कळले होते शिवाय फर्रुखाबादच्या पं० गोपाळशास्त्री यानीं काशीच्या पंडिताकडून त्याच वादासबधी पूर्वी व्यवस्थापत्रही नेले होते. यामुळे वादातील मुद्दे सर्वाना पूर्वश्रुत होते. आणि तरी सुद्धा अगोदर तयारी करण्यासाठीं काशीकर पडितानी पधरा दिवसाची मुदतही घेतली होती. खुद्द दयानंदानाच एकदा हेमचद्रजी नावाचे गृहस्थानें असा प्रश्न केला की "भगवन्! हे एवढे बडे बडे धुरधर पण्डित आपल्याकडे शास्त्रार्थाकरिता येतात हे सारेच मूढ कसे?" त्यावर स्वामींनीं हसून उत्तर दिलें कीं, "सत्यासत्य विवेक तर बहुतेक विद्वानांना असतोही, परतु चरितार्थासंबंधी लोभात पडून ते सन्मार्गच्युत होतात!" हाही दोषारोप निस्पृह आणि अल्पसतुष्ट वृत्तीच्या विद्वानाना लागू पडणार नाही. निदान काशीचा शास्त्रार्थ "आजीविकेचे प्रलोभनानें" दूषित झालेला नसावा यास्तव त्याचे महत्त्व आहे.

शिवाय आर्यसमाजाचे इतिहासकार त्या काशीच्या शास्त्रार्थाच्या सभेला बरेच महत्त्व देत असल्यामुळें स्वामी श्रद्धानदांचे चिरजीव प्रो० इद्र विद्यावाचस्पति या सभेची जी हकीगत लिहितात ती पहाणे जरूर आहे. ता. २२ आक्टोबर सन १८६९ रोजीं राजा माधोसिंह याच्या आनंदबागेंत ही सभा झाली. दयानंदांनीं जेव्हा काशीचे अधिपति ईश्वरनारायणसिंह यांचे मार्फत काशीच्या पंडितांना सत्यासत्यनिर्णयाकरितां प्रथम आव्हान दिलें, तेव्हां तेथील पंडितांनीं वेदशास्त्रावलोकनासाठीं पधरा दिवस मुदत मागून त्या मुदतींत खूप

तयारी केली. त्यानंतर शास्त्रार्थाचा दिवस उगवला त्या वेळचें वर्णन विद्यावाचस्पति यांच्याच शब्दांत सागणें बरें *

सारांश ता १६ नोव्हेंबर १८६९ रोजी [कोणी १७ नोव्हेंबर म्हणतात] काशींत पूर्वी कधींही जमला नव्हता इतका समाज आनदबागेत जमा झाला. त्यांत काशींतील सर्व प्रमुख पडित, बडे बडे गृहस्थ, आजूबाजूच्या गांवचे जमीनदार, खिस्ती धर्मोपदेशक, कलकत्त्यापासून वर्तमानपत्राचे सपादक किवा बातमीदार अशी अभूतपूर्व गर्दी होती. अध्यक्षस्थानीं काशीचे महाराज होते. पण काशीचे कोतवाल पडित रघुनाथ सहाय्य हे वादविवादाची शिस्त राखण्यासाठी हजर होते. काही दगाफसाट होऊ नये म्हणून पोलीसपार्टीही हजर होती. अशा थाटांत दुपारी तीन वाजता वादास सुरुवात झाली. प्रथम काशीदरबारचे पंडित ताराचरण नैय्यायिक यानी आरभ केला.

ताराचरण०—आपण मनुस्मृतीला वेदमूलक कसे मानतां ?

स्वामी—मनुवचन हें दिव्य औषध आहे असे सामवेदांत म्हटले आहे.

यावर ताराचरण निरुत्तर झाले. मग विशुद्धानंद मदतीस आले.

विशुद्धानद--रचनानुपपत्तेश्चनानुमानम् हे वेदातसूत्र वेदमूलक कसें तें सिद्ध करा

स्वामी--हा मुद्दा अप्रस्तुत आहे.

विशुद्धानद—अप्रस्तुत असला म्हणून काय झाले, तुम्हांला त्याचें समाधान करतां येत असेल तर करा.

स्वामी—त्याचा पूर्वापार संबध पाहून खुलासा करतां येईल.

विशुद्धानंद—जर सर्व गोष्टींचें पाठातर नाही तर काशीस शास्त्रार्थाला कशाला आलेत ?

स्वामी—तुम्हांला तरी सर्व तोंडपाठ आहे का ?

विशुद्धानद—होय. आम्हांला सर्व कांहीं पाठ आहे.

स्वामी—तर मग सागा पाहूं धर्माचीं लक्षणें किती आहेत ?

विशुद्धानदांनीं सर्वज्ञतेचा आव मात्र आणला, पण मनुस्मृतींतील धृतिक्षमादमोस्तेयम् इ० श्लोक त्यांस न आठवल्यामुळें ते निरुत्तर झाले, तेव्हां पंडित बाळशास्त्री पुढें सरसावले.

" आज एक ओर माधोबागमें सभा का समारोह होने लगा और दुसरी ओरसे पण्डितोंको सभास्थानतक पहुचने के लिये काशी नरेश के दरबारसे पालकी छत्र, चंवर आदि सामग्री भेजी जाने लगी। आज मानो काशीके पण्डितों-का परीक्षादिन था। इस दिन की सफलता पर उनका भविष्य अवलम्बित था। प्रतिपक्ष मे कौपीनधारी साधु था, विद्या ही जिसका शास्त्र था, सत्य हि जिसका

---

बाळशास्त्री—आम्ही धर्मशास्त्राचे संपूर्ण अध्ययन केले आहे ह्यासाठीं कांहीं विचारणें असेल तर आम्हाला विचारा

स्वामी—तर मग आपण अधर्माचे लक्षण सांगा पाहू—अधर्माचेंही लक्षण कोणी विचारील याचा त्यानी कधीच विचार केला नसल्यामुळे ते निरुत्तर झाले !

याप्रमाणे प्रश्नोत्तरे झाली त्यात काशीच्या पंडितानी इतकेच दाखविले, कीं वेदात " प्रतिमा " शब्द आला आहे तो मूर्तिवाचक आहे आणि " पूर्त " शब्द आला आहे, तोही मूर्तिपूजेचा सूचक आहे त्यावर स्वामींनी ईश्वराच्या प्रतिमेचा वेदात स्पष्ट निषेध आहे, असे दाखविले आणि पूर्त शब्दाचा अर्थ नदी, तडाग इ० आहे, असें सांगून समाधान केले

आपली कांहींच मात्रा चालत नाहीं असे पाहून काशीच्या पंडितांनी मुख्य मुद्दा सोडून पुराणाचा विषय काढला पण तेथेही त्यांना तोच अनुभव आला मग उलट स्वामीजींनी व्याकरणासबधीं कांहीं प्रश्न पंडितास विचारले, पण त्याचें समाधानकारक उत्तर त्यास देता आले नाही तेव्हा ते हताश झाले ! हे पाहून माधवाचार्य पुढे सरसावले आणि एक पोथीचे पान पुढे करून म्हणाले कीं, यज्ञसमाप्तीनंतर दहाव्या दिवशीं यजमानाने पुराणश्रवण करावे असे म्हटले आहे. तेव्हां येथे पुराण शब्द हा कोणत्या विशेष्याचा विशेषण आहे तो दाखवा

स्वामी—आपण संदर्भ वाचून दाखवा

विशुद्धानद—( पान पुढे करून ) तुम्हींच वाचा कीं

त्या वेळी सायंकाळ झाल्यामुळे दयानंदाना ते पान नीट वाचता येईना ही योग्य संधि आहे असें पाहून विशुद्धानंद चला आता संध्येची वेळ झाली तुमची काय परीक्षा व्हायची ती होऊन चुकली ! असें म्हणत उठले त्यावर स्वामींनी त्यांस वाद अर्धवट टाकून उठू नका, असें पुष्कळ सांगितले पण तें त्यांनीं ऐकले नाही. ते म्हणाले, आतां तुम्ही बसा, जे व्हायचें तें होऊन चुकले. तेव्हां

किला था, और परमात्माहि जिसका सहायक था। इधर अनेक पण्डितों की मण्डली थी, जिनके पास विद्या खड्ग तो थी, परन्तु स्वतन्त्र विवेक के अभाव से रूढिरूपी जगार से निकम्मी होगई थी। सत्यका मुख हिरण्मय पात्र से बंद हो चुका था। परमात्माका स्थान एक ओर जड मूर्तियो ने और दुसरी ओर अन्नदाता काशी नरेश ने छीन लिया था। जहां कौपिनधारी अपने सहायक पर भरोसा करके, सत्य के गढ मे डेरा जमाकर विद्या की तलवार पकडे निर्भीक बैठा था, वहां आपनी शक्तियों और सहायकों को कमजोर समझकर पण्डित मडळी कभी छत्रचवर के ढोंग का आसरा ढूढती थी, और कभी सैकडो शिष्यो की पक्तिया बांधकर समझती था कि अब दयानन्द अवश्य दहल जायगा। परन्तु यहां वह लोहा न था, जो जरासी आच से पिघल जाता। यहां वह लौ न थी जो हवा के जरा से झोके से बुझ जाती ! + + +

पौराणिको की अक्षोहिणी सेना आ पहुची। रोब जमाने को काशीनरेश; बाल की खाल उधेडने को वृद्ध स्वा० विशुद्धानद, प्रसिद्ध बालशास्त्री और अन्य माधवाचार्य, वामनाचार्य, नारायण आदिविख्यात पडित, और हल्ला मचानेको। काशीके विद्यार्थी और गुडे, इस प्रकार झूमती झामती और बेतहाशा जय जय-कारोसे आकाश को गुजाता हुई अगत्रय सपन्न पौराणिक सेना माधोबागमें पहुंच गई। + + +

शास्त्रार्थ आरभ हुआ। + + +

प्रश्नरूपी तीरो की अनवरत बौछार हो रही थी, साधनसपन्न ब्रह्मचारी फेंके हुए तीरों को मार्गमे हि काटता जाता था, और साथ हि अपने धनुष की करा-मत दिखा रहा था। उस उपजाऊ धनुष से फेंके हुए अमोघ बाण विरोधियों की कवचों में छेद कर रहे थे।

पं० ताराचरण ने पूछा—'आप मनुस्मृति को वेदमूलक कैसे मानते हैं ?'

स्वामीजीने उत्तर दिया—'सामवेद के ब्राह्मण मे कहा है कि जो कुछ मनु ने वर्णन किया है वह औषधों का भी औषध है।'

---

अध्यक्ष काशीचे महाराज हेही उठून त्यांनी टाळ्या वाजविल्या त्याबरोबर काशी-च्या पंडिताचा जयजयकार करीत सर्व मडळी उठली ! आणि उलट दयानंदांवर विटाचे तुकडे व दगड येऊ लागले ! याप्रमाणें काशीकर पण्डितांचा पुरा पाडाव झाला असतां त्यांनीं लबाडीने खोटीच हूल उठविली.

ताराचरणजी चुप होगये, स्वा० विशुद्धानन्दजी मदत के लिये पहुचे। आप बोले—'रचनानुपपत्तेरचनानुमानम' इस वेदान्त सूत्र को वेदमूलक सिद्ध कहो।

स्वामी ने उत्तर किया-'यह उपस्थित वाद के भीतर नहीं है'।

स्वामी विशुद्धानन्दजी 'प्रकरण के बाहिर है तो क्या हुआ ? यदि तुम्हे इसका समाधान आता है तो कह दो।'

स्वा० दयानन्द—'इसका पूर्वापर पाठ देखकर समाधान किया जा सकता है'।

स्वा० विशुद्धानन्द—'यदि सब कुछ याद न था तो काशी मे शास्त्रार्थ करने क्यों आये थे ?'

स्वा० दयानन्द—'क्या तुम्हे सब कुछ कण्ठाग्र है' ?

स्वा० विशुद्धानन्द—'हा, हमे सब कुछ स्मरण है'।

यहा उल्टा वार प्रारम्भ हुआ। पेच मे आता २ चतुर सिपाही निकल गया।

स्वा० दयानन्दने पूछा—'तब बताइये धर्म के लक्षण कितने है ?

स्वामी विशुद्धानन्द ने सर्वज्ञता का दावा तो किया, परन्तु उन्हे मनुस्मृति का धर्मलक्षणसम्बन्धी, 'धृतिक्षमा दमोस्तेयम इत्यादि श्लोक याद नहीं था। वह निरुत्तर हो गये।

स्वामी दयानन्दने श्लोक पढ सुनाया। झटपट प्रसिद्ध धर्माचार्य प० बालशास्त्रीजी मदद पर आ पहुचे। आपने कहा कि 'हमने सम्पूर्ण धर्मशास्त्रका अध्ययन किया है, इस विषय मे कुछ पूछना हो तो हमसे पूछिये।

स्वा० दयानन्दने पूछा—'आप अधर्म के लक्षण बतलाइये। बालशास्त्रीजीने कभी सोचा भी नहीं था कि कोई आदमी अधर्म के लक्षण भी पूछ सकता है। उन्हें निरुत्तर होना पडा।

इसी प्रकार प्रश्नोत्तर होते रहे। मूर्तिपूजा के सम्बध मे काशी के पडितोंने दो ही बाते पेश की। एक तो यह कि, वेदमें प्रतिमा शब्द आया है, वह मूर्तिका वाचक है, और दूसरा यह कि, 'उद्बुध्यस्वाने' इत्यादि मन्त्रमें जो 'पूर्त' शब्द आया है, वह मूर्तिपूजाका सूचक है। स्वामीजीने दोनोंकाही समाधान कर दिया। ईश्वर की प्रतिमाका वेदसे स्पष्ट निषेध है, और पूर्त शब्द नदी, तडाग आदि का वाचक है। यह समाधान करके स्वामीजी वारवार यही पूछते रहे कि, 'वेद में मूर्तिपूजा का विधान कहा है ?'

हर तरहसे लाचार होकर पण्डित मण्डली ने चालाकी शरणली। इस विषयपर शास्त्रार्थ करनेसे टालकर पण्डित लोग स्वामीजीकों उलझाने की नीयत से पुराणोके विषयपर विवाद करने लगे, परतु शीघ्र ही अनुभव करने लगे कि, यह व्यूह भी अभेद्य नहीं है। स्वामीजीने अवसर पाकर व्याकरण सम्बन्धी प्रश्न पण्डितोके सामने रक्खा- कोई भी सन्तोषजनक उत्तर न मिला। पण्डित लोग हताश और खिन्न होने लगे। तब माधवाचार्यजी आगे बढे और कोई दो पत्रे लाकर बीचमें रखते हुए कहा कि 'यहा पर लिखा है कि, यज्ञकी समाप्ति यजमान दसवे दिन पुराणोंका पाठ श्रवण करे, अब स्वामीजी बताइये कि 'पुराण' किसका विशेषण है''

स्वामीजी—'आप पाठ पढ कर सुनाइये'।

स्वामी विशुद्धानन्दजी ने पत्रे स्वामी दयानन्दजी के हाथ मे पकडा कर कहा कि, 'आप ही पढ लीजिये' उस समय साझ का अधेरा आकाशपर उतर आया था। स्वामी दयानन्द ने पत्रे लौटाते हुए, स्वामी विशुद्धानन्दसे कहा कि, 'आप ही पढ लीजिये'।

स्वामी विशुद्धानन्दजी बोले 'मै चश्मे के बिना नहीं पढ सकता, इस लिये आपही को पढना होगा' स्वामी दयानन्द ने पत्रे हाथ मे ले लिये। अन्धेरे के कारण ['दशमेऽहनि किञ्चित्पुराणमाचक्षीत' इस पाठ के पूर्वापर को। द प्र] पढना कठिन था। दीपक मगवाया लगा। लालटने की रोशनी भी बडी मद्धम थी। पत्रे पढने मे कुछ समय लगा [विशुद्धानन्दजी यह कहकर उठ खडे हुए, की अब सध्या का समय हो गया है। द प्र] उचित मौका समझ कर पण्डित मण्डली उठ खडी हुई। इस प्रकार धूर्तता होते देख कर स्वामी दयानन्द ने स्वामी विशुद्धानन्द का हाथ पकड कर कहा कि 'बैठ जाइये। निर्णय किये बिना बीच ही मे उठ खडे होना आप ऐसे विद्वानों को कदापि उचित नहीं' परन्तु स्वामी विशुद्धानन्दजी न बैठे और स्वामी दयानन्द की पीठ पर हाथ फेर कर कहने लगे कि, 'अब बैठिये, जो कुछ होना था, हो चुका।'

++ ++ ++

आश्रय-हीन अन्धकार का अन्तिम आश्रम बनारस ही दिखाई देता था। निर्भय वीर दयानदने गुफा मे पहुच कर शेर को ललकारने का निश्चय किया, और माधोबाग में जाकर धर्म का झण्डा गाड दिया।

++ ++ ++

र्गदि के गढ से दयानंद की टक्कर का जो भयंकर शब्द हुआ, उससे दिशाऐं गज उठी। गजसे आश्चर्यित देशनें देखा कि सदियोंके अधेर मे खडा किया हुआ कुरीतियो का मीनार ठोकर खाकर भीषणशब्द करता हुआ विश्वनाथ पुरी की तरह मे विलीन हो रहा है। स्वार्थ काप उठा, और सत्यका चेहरा चमकने लगा।

++ ++ ++

काशी शास्त्रार्थ ह्या नावाचे एक लहान चोपडे प्रसिद्ध झालेले आहे त्यातील हकीकत सर्वात अधिक व्यवस्थित असून वरील तुटक सवादातील मधले दुवे त्यात दिले आहेत पण त्याच्या लेखकाचे व प्रकाशकाचे नाव पुस्तकावर नसल्या मुळे हा निनावी प्रबधकर्ता कितपत अधिकृत आहे हे न समजल्यामुळे आम्ही मुद्दाम स्वामी श्रद्धानद याचे नजरेखाली तयार झालेल्या त्याच चिरजीव प्रो० इद्र विद्यावाचस्पति यान्याच इतिहासातून वरील अवतरण घेतले आहे तथापि ह्या एका महत्त्वाच्या शास्त्रार्थाबद्दल तरी अधिक सुसबद्ध माहिती असावी म्हणून सदर चोपड्याचे आधारे ह्याच संवादाचे वर्णन सारांशरूपाने पुन्हा देत आहों

स्वामी दयानंदानी आपला निश्चित सिद्धान्त असा प्रसिद्ध केला होता की, पाषाणादि मूर्तिपूजन, शैवादि संप्रदाय, रुद्राक्षत्रिपुड्रादिधारण याचे वेदात विधान नाही यास्तव त्याचे आचरण पापावह आहे काशीकर पडिताचे दयानदास म्हणणें असे होते की, तुम्ही मूर्तिपूजाखडन करता तर आम्ही त्याचे मडन करतो त्यानंतर उभयतास वेद प्रमाण आहेत असे ठरल्यावर वेदात मूर्तिपूजेचें प्रमाण असल्यास दाखवा किंवा नसल्यास नाहीं म्हणून सागा असा सवाल दयानंदांनीं टाकला. त्यावर वास्तविक एक वेदातील प्रमाण सागावयाचे किंवा सरळपणे वदांत प्रमाण नाहीं हे कबूल करावयाचें तसें न करतां काशीच्या दरबारचे पडित ताराचरण नैयायिक असे म्हणू लागले की, जे केवळ वेदालाच प्रमाण मानतात, अन्य प्रमाण मानीतच नाहींत त्याच्याजवळ काय बोलावें ! दयानद म्हणाले, " अगोदर वेदांचा विचार होऊ या कारण वेदोक्त कर्मच मुख्य आहे आणि मनुस्मृत्यादि तरी वेद मूलक आहेत, म्हणूनच प्रमाणभूत आहेत जें वेदांत नाही किवा वेदविरोधि आहे ते प्रमाण नव्हे. त्यावरून ताराचरणानी प्रश्न विचारला की, मनुस्मृतीचे प्रमाण तरी वेदांत कोठे आहे ? तेव्हा स्वामीनीं मनूचे वचन हे औषधांचेहो औषध आहे असे सामवेद ब्राह्मणांतील ( यद्वै किंच मनुरवदत्तद्भेषजम् । ) वचन सांगितलें येथे हे लक्षांत घेतले पाहिजे की, दयानंद फक्त मत्रभागासच वेद म्हणून मानीत असत, ब्राह्मण, आरण्यकें यांस ते मनुष्यकृत मानीत असत

त्यानंतर वेदात जें अप्रसिद्ध ते सच्छास्त्र नव्हे या सिद्धान्ताची छाननी करण्याकरितां " रचनानुपपत्ते " हे वेदान्तसूत्र वेदमूलक कसें तें दाखवा असा प्रश्न पंडितानीं केला तो प्रश्न अखेर तसाच राहून केवळ स्मरणशक्तीची परीक्षा सुरू झाली आणि स्वामींनी धर्माचें स्वरूप विचारले विशुद्धानंदानी " वेदप्रतिपाद्य फलसहित अर्थ " असें उत्तर दिले त्यावर दयानद म्हणतात की, हे स्वयपठित प्रमाण नको काही श्रुतिस्मृति सागा त्यावर " चोदना लक्षणोऽर्थो धर्मः " हे जैमिनीसूत्र विशुद्धानंदानी सागितले. तेव्हा स्वामी म्हणाले की, हे तर सूत्र आहे तुमच्या सर्व कठाग्र आहे मग श्रुतिस्मृति का सागत नाहीं ? प्रेरणेचे मूळ श्रुतिस्मृतिच आहेत यावर विशुद्धानद जेव्हा काहींच बोलतना तेव्हा स्वामी म्हणाले की, ठीक ! आपल्याला धर्माचे स्वरूप तर सागता येत नाही तर धर्माची लक्षणे तरी किती ते सागा. विशुद्धानद म्हणाले की, धर्माचें लक्षण एकच, पण तें कोणते ते विशुद्धानदाना सागता येईना ! तेव्हा स्वामी म्हणाले की, धर्माची दशलक्षणें असताना तुम्ही एकच कसें सागता ? विशुद्धानंदानी इतक्यातच समजावे. पण त्यानीं उलट दहा लक्षणे तीं कोणतीं असा प्रश्न विचारला पुढे बालशास्त्री (बालसरस्वति ?) वादास सरसावले असता त्यास अधर्माचें लक्षण विचारूनच स्वामींनीं निरुत्तर केलें ! हे सर्व आम्हास आश्चर्यकारकच वाटते.

असो ह्याप्रमाणे स्मरणशक्तीच्या परीक्षेत काशीकर पडित फजीत पावल्यावर त्यांनीं सर्वांनी चिडून जाऊन स्वामीवर एकदम गिल्ला केला आणि त्यास विचारलें कीं, वेदात प्रतिमा शब्द आला आहे कीं नाही ? स्वामींनी उत्तर दिले की, प्रतिमा शब्द सामवेदाच्या षड्विंश ब्राह्मणात आला आहे. परतु ज्या मत्रात तो शब्द आला आहे तो मत्र मृत्युलोकविषयक नसून ब्रह्मलोकविषयक आहे त्यानतरचीं बालशास्त्री व स्वामी याच्या दरम्यान झालेली प्रश्नोत्तरे सादिग्ध आहेत. पुढें विशुद्धानदानी ईश्वराचा व वेदाचा सबंध काय म्हणून काढल्यावर स्वामी उत्तरादाखल म्हणाले की, वेद सच्चिदानद लक्षण, ईश्वराने प्रकाशित असून त्याचा परस्पर कार्यकारणसंबध आहे. तेव्हा विशुद्धानद म्हणाले कीं, वेदास कार्यरूप मानाल तर ते नसल्याप्रमाणेच होत त्यावर स्वामी म्हणाले कीं, जर ईशतत्त्वात कशाचेंच अस्तित्व सभवत नसेल तर मग आकाशातही कोणत्याच वस्तूचा संबध किवा सभव असणार नाहीं. त्यावर विशुद्धानद म्हणाले की, आकाशही ईश्वरच होय यावर दयानद कुत्सितपणानें हसून म्हणतात " ठीक ! आकाशच ईश्वर

काय ! पण ते असो तो अप्रस्तुत भाग सोडून मूर्तिपूजेबद्दल कांही आधार असेल तर दाखवा" त्यावर विशुद्धानंद स्वामींच्या पाठीवरून हात फिरवीत त्यास म्हणतात "अहो जोगी, तुमचे शिक्षण कच्चे आहे. अजून शिका" पुढे विशुद्धानंद म्हणतात की, ज्याप्रमाणे मन किंवा सूर्य यांची ब्रह्मबुद्धीने उपासना सांगितली आहे त्याचप्रमाणे शालिग्रामादींची जाणावी त्यावर स्वामी म्हणाले कीं, "आदित्य ब्रह्मेत्युपासीत" असें सांगितलें आहे त्याप्रमाणे पाषाणादि ब्रह्मेत्युपासीत असें स्पष्ट वचन वेदांत का नाही ? याबद्दल कांहीच खुलासा न करता माधवाचार्य विचारतात की, "उद्बुध्यस्वाग्ने प्रतिजागृहित्वमिष्टापूर्ते सꣳ सृजेथामयञ्चेति" या मंत्रात पूर्त शब्द मूर्तिवाचक का समजू नये ? तेव्हा दयानंदानी 'पूर्त' शब्द 'पूर्ति'वाचक आहे, प्रतिमावाचक नाही असा निरुक्ताचा व ब्राह्मणाचा हवाला देऊन सांगितले मग "ब्राह्मणानीतिहासान् पुराणानीति" इत्यादि वचनात पुराण शब्दाचा अर्थ काय असा प्रश्न माधवाचार्यांनी काढला अर्थात माधवाचार्यांचे मताने पुराणे एकदा प्रमाणभूत ठरली की, मूर्तिपूजेचे प्रामाण्य सिद्ध करणे सोपे होईल हाच त्यांच्या प्रश्नातील हेतु दिसतो स्वामी म्हणाले, पुराण शब्द ब्राह्मण शब्दाचा विशेषण आहे त्यावर बालशास्त्री यानी अडविले की, ब्राह्मण काय नवीनही असतात काय ? स्वामी म्हणाले की, त्याबद्दल शंका राहू नये म्हणून पुराण शब्द योजला आहे पण पुन्हा शंका निघाली की, सदर वचनात मध्यंतरी इतिहास शब्द येतो तेव्हा विशेष्यविशेषणामध्ये असा शब्द कसा येईल ? त्याचा खुलासा करताना "अजो नित्यःशाश्वतोय पुराणो" ह्या गीतावचनांत पुराण या विशेषणाचा देही या दूरस्थ विशेष्याशी संबंध येतो असो असे स्वामीनी दाखविले आणि विशेष्य-विशेषण समीपच असले पाहिजे असा व्याकरणाचा कांही नियम नाही, असेंही सांगितले विशुद्धानंद म्हणाले की, येथे इतिहास शब्दाचा तर पुराण हा शब्द विशेषण नाही ना ? स्वामीनी प्रत्युत्तर केले की, इतिहासः पुराण पंचमो वेदानां वेदः। ह्या वचनात इतिहास ह्या शब्दालाही पुराण हें विशेषण लावलेलें आढळतें मध्येंच वामनाचार्य म्हणाले की, हे वचन वेदात कोठेही नाही. स्वामींनी निक्षून सांगितलें की, जर हे वचन वेदांत आढळलें तर तुमचा पराजय नाही, तर माझा पराजय, अशी प्रतिज्ञा लिहा तेव्हा सारे गप्प झाले. मग दयानंदांनी मध्येंच एक प्रश्न काढला की, कोणी व्याकरणशास्त्र जाणणारे असतील तर त्यानीं व्याकरणात कल्म संज्ञा केली आहे की नाही तें सांगावें. बालशास्त्र्यांनीं उत्तर दिलें कीं, संज्ञा तर केली नाहीं, पण

एके ठिकाणीं भाष्यकाराने उपहास मात्र केला आहे तो कोठें म्हणून स्वामींनीं विचारतां बाळशास्त्री निरुत्तर झाले अखेर माधवाचार्यांनी गृह्यसूत्राचे एक पृष्ठ दयानदांच्या हाती दिले ते हस्तलिखित पत्र इतके अस्पष्ट लिहिलेले होते की, ते चटकन् वाचतां येणे शक्यच नव्हते मुद्दाम जाणून बुजूनच असले पान दयानदाच्या हाती दिले. त्यावर ते पत्र कोणत्या प्रथांतील कोणत्या ठिकाणचे आहे त्याचा कांहींच उल्लेख नव्हता असे ते संदिग्ध आणि अस्पष्ट लिहिलेले पत्र वाढत चाललेल्या अंधारांत वाचण्यास स्वामींना पुरी पाच पळेही फुरसद पंडितांनी दिली नाहीं त्या पृष्ठावरील " दशमेऽहनि किंचित्पुराणमाचक्षीत " या वचनातील पुराण शब्दाचा अर्थ पुराणी विद्या म्हणजे ब्रह्मविद्या उपनिषद, असा करावा असे स्वामी दयानद सांगणार तो ' आतां उशीर झाला " अशी सबब काढून विशुद्धानद उठले त्याबरोबर काशीराज सर्व पडितासह उठून टाळ्या वाजवून पंडिताचा जयजयकार करूं लागले इतकेच नव्हे तर पुढे कांहीं दिवसांनी काशीराजांच्या छापखान्यात स्वामींच्या निंदापर एक चोपडेंही छापून प्रसिद्ध झाले !

वरील वादविवादात अखेर उतावळीने आणि खोडसाळपणाने काशीच्या पडितांचा जय झाला म्हणून टाळ्या पिटून सभा उधळण्यात काशीचे महाराजांनीही लोकास प्रोत्साहित केले, त्यावरून कोतवालाचा व त्याचा खटका उडाला, तेव्हां ते म्हणाले, 'तुम्ही आम्ही सारे मूर्तिपूजक, येनकेन प्रकारेण आपऱ्याला आपली बाजू राखली पाहिजे' हेच महाराज पुढे दयानदांचे चरणी पश्चात्तापपूर्वक लीन झाले ! असेंही वर्णन आहे.

ही हकीगत इतकी विस्तृत देण्याचे कारण असे की, दयानंदांनीं केलेल्या शास्त्रार्थांत ह्या काशीच्या शास्त्रार्थाचे महत्त्व फार आहे असें आर्यसमाजी मानतात हिंदु पेट्रियटनेही त्या वेळीं असे प्रसिद्ध केले की, " काशीचे पंडित आपल्या ज्ञानाचा अति गर्व करीत होते, त्यांचा दयानदांनी पुरा पाडाव केला " ख्रिश्चन इटेलिजेन्सरचे मत मात्र असें झाले आहे की, एकदरींत काशीत जाऊन स्वामींना विशेष काही साधता आले नाही. काशीचे फार मोठमोठे पंडित तर त्यांस भेटलेही नसावेत. उलट सामान्य लोकाचा विरोध वाढला. काशी क्षेत्रात त्याच्यावर बहिष्कारही पुकारण्यात आला कोणी त्यांस विड्यांत विष देण्याचा प्रयत्न केला. कित्येक गुडांनीं त्याच्यावर गिल्ला करण्याचा डाव रचला. याच्याही पुढचे काहीं प्रकार झाले एका कसायाला आणि काळणाला

कोणी तयार करून भर सभेंत त्याच्याकडून आपल्या बाकीबद्दल म्हणून पैशाचा तगादा करविला ! तसेंच एका वेश्येलाही स्वामींचा भर सभेंत इज्जत घेण्याकरिता तयार केलें ! आणि एकाने तर विषारी मिठाईही यांच्याकडे पाठविली ! हे सर्व प्रकार स्वामींनी शांतपणें सहन केले मुसलमानी धर्मावरही त्यांनीं टीका चालविल्यामुळें कांहीं मुसलमानांनीं तर त्यास उचलून नदींत फेकून देण्याचाही खटाटोप केला ! पण स्वामींनीं आपल्या सामर्थ्यानें हे सर्व प्रसंग निभावून नेले

या काशीच्या प्रसिद्ध शास्त्रार्थानंतर कांहीं दिवस तेथेंच राहून नंतर दयानंदाची स्वारी प्रयागला गेली, व तेथील कुंभमेळा पाहून इ. सन १८७३च्या आरंभी ते कलकत्त्याला गेले. तेथें हे आपल्याशीं सहमत होतील असे ब्राह्मास वाटलें असावें पण अखेर तें जमलें नाहीं महर्षि देवेंद्रनाथाकडे स्वामी गेले होते. श्रीरामकृष्ण परमहंसाच्या लतकाऱ्यामुळे त्यांस महर्षींकडे येण्याचा पूर्वी मज्जाव झाला होता, पण दयानंद जास्त व्यवहारी व धूर्त असल्यामुळे त्यांनी ब्राह्माच्या वाड्यात जाण्यापूर्वी कलकत्त्यास प्रथमच कपडे घालण्यास सुरुवात केली तसेंच केशवचंद्र प्रभृतींच्या सूचनेवरून त्यांनीं त्यापुढे हिंदीत बोलण्याचा क्रम सुरू केला. तथापि तेवढ्यानेही केशवचंद्राचे खरे समाधान झालें नाहीं ते म्हणाले, "स्वामी, तुम्हाला जर इंग्रजी येत असतें तर काय बहार झाली असती. माझ्या इंग्लंडच्या सफरींत तुम्ही मला ठीक जोडीदार झाला असता" पण स्वामींनी त्यास जरा झणझणीतच प्रत्युत्तर केले. ते म्हणाले, "आपले आर्यांचे धर्मरहस्य ज्यात साठवले आहे ती गीर्वाण भाषा तुम्हाला येत नसावी हें तर अधिक खेदजनक आहे तुम्हा इंग्रजी शिकलेल्या बाबूंना ज्यात कांहींच कळत नाही, तें धर्मरहस्य तुम्ही लोकांना शिकविण्याचा आव आणता याहून अधिक ढोंग तें कोणतें !" तथापि त्या ब्राह्माच्या मिलाफात भाषेचें माध्यम, व्याख्यात्याचा पेहराव, आणि समाजाची रचना अशी ब्राह्मांचीं बाह्यांगें स्वामींनीं उचलली आणि स्वामींच्या अंतर्दृष्टीची चुणूक केशवचंद्रांनी घेतली, अशी कांहीं देवघेव परस्परांत झाली तरी एकंदरींत कलकत्त्याच्या ब्राह्माचें व दयानंदाचें विशेष पटलें नाहीं, हेंच खरें कारण, दयानंदाची भिस्त ज्या वेदावर त्याची ब्राह्मास कवडीचीही किंमत वाटत नव्हती. त्यामुळें कलकत्त्यास पाठशाळा काढण्याचा स्वामींचा बेत तसाच विरजला.

तारीख १ एप्रिल सन १८७३ रोजी कलकत्ता सोडल्यावर स्वामी बहार

प्रांतांत निरनिराळ्या ठिकाणीं हिंडले. या प्रवासात कोणी ताराचरण पंडित अंतस्थ रीतीनें स्वामींचा सिद्धान्त मान्य करून वरकरणी व्यवहारापुरता विरोध दाखवीत होते, तर कोणी दुर्गादत्त पडित आपल्या दिग्विजय वृत्तान्तात स्वामींनी " आपण सर्वज्ञ लोकोत्तर पडित आहा मी य.कश्चित् मर्त्य जाव. आपणासारख्या ब्रह्मरूप पुरुषाशी काय वाद करणार !" असे आपल्याजवळ म्हटल्याचे प्रसिद्ध करणारे भेटले. कोणी जगन्नाथ पडित धड व्याकरणशुद्ध बोलता येईना म्हणून गप्प बसले. तर वृंदावनच्या सुप्रसिद्ध रगाचार्यांने आपली फजिती टाळण्याकरिता ऐन शास्त्रार्थाचे वेळी आजारीपणाची सबब सागून आपल्या आजीविकेच्या वृत्तीवरील आपत्ति टाळली ! कोठें साऱ्या देशात नाहक गोंधळ माजविल्याबद्दल स्वामीस रागारागानें जाब विचारणारे पं० काशीनाथशास्त्री आढळले, तर उलट अलाहाबादच्या नूर कॉलेजातील विद्यार्थ्यात त्याच्या भावी आर्यसमाजाचे आधारस्तभ त्यास सापडले व तेथेच त्यानी सत्यार्थप्रकाशाची पहिली आवृत्ति छापली.

ह्यानतर विशेषेकरून प्रार्थनासमाजी मडळींच्या निमत्रणावरून स्वामी मुंबई, अहमदाबाद, पुणें वगैरे ठिकाणी हिंडले ठिकठिकाणी त्याची अनेक व्याख्यानें झाली शास्त्रार्थाचे व्यर्थ खटाटोपही अनेक झाले मुंबईस ते प्रथम गेले तेव्हा त्याचें व्याख्यान मूर्तिपूजेवर फ्रामजी कावसजी वाचनालयात झाले त्या व्याख्यानाच्या विरुद्ध व्याख्यान मुंबईस लालबागेंत सुप्रसिद्ध पडित गट्टूलालजी यांचें झाले तेव्हा जिकडे तिकडे पौराणिक धर्माचा जयजयकार होऊन ब्राह्मणास आठ आठ आणे दक्षणाही वाटण्यात आली ! ही सारी खटपट गो स्वामी जीवनजीमहाराज यानीं केली असावी असें म्हणतात तेथे त्याचे दोन शास्त्रार्थही झाले, पैकी त्याचा वेदान्तावरील सवाद पडित जयकृष्णदास याच्याबरोबर झाला. तो वेदान्तभ्रान्तिनिवारण या नावाचे पुस्तकात छापला आहे त्यातील आशय ह्याच प्रथान पुढें वाचकास वाचावयास मिळेल अहमदाबादेस तेथील जज रा० ब० गोपाळराव हरि देशमुख याच्या विद्यमानेही शास्त्रार्थ झाला पण त्यात अखेर अपशब्दापर्यंत तेथील पंडितांनीं मजल नेल्यामुळें कांहींच निष्पन्न झाले नाही पुढें स्वामींस मुद्दाम शास्त्रार्थाकरिता मुंबईस बोलावून नेले. कोणी असेंही म्हणतात कीं, मुंबईच्या कांहीं पंथवाल्याचा पाडाव करण्याच्या अतस्थ हेतूंनीं कांहीं धूर्त मडळींनीं त्यास मुंबईस नेलें होतें. प्रथम शास्त्रार्थाचें अवडबर फारच मोठें घातलें होतें पण मागून मुंबईचे पडित शास्त्रार्थाकरिता पुढें येतना. तेव्हा त्याचे पुढारी पंडित कमलनयनाचार्य यांचेवर दया०

नदांनी शास्त्रार्थाला येण्यासाठी वकीलमार्फत नोटीस दिली ! आणि शास्त्रार्थाचा दिवस ता १२ जून सन १८७५ हा ठरला. त्या दिवशीं दुपारी दोन वाजता फ्रामजी कावसजी इंन्स्टिट्यूटमध्ये हजारों लोकांची गर्दी झाली दोन वाद्यांकरिता व्याख्यानभूमिकेवर मांडलेल्या खुर्च्यांमधील मेजावर शेदीडशे संस्कृत प्रमाणग्रंथांची रास येऊन पडली आठ वर्तमानपत्रांचे बातमीदार आपली साधनसामग्री घेऊन सिद्ध झाले सभेच्या उच्चासनावर मुंबई शहरचे, रावबहादूर बेचरदास, शेठ लक्ष्मीदास खिमजी, शेठ मथुरादास लवजी, रा. ब. दादोबा पांडुरंग, विष्णु परशुरामशास्त्री असे शेठ, शास्त्री, पंडित वगैरे सद्गृहस्थ झळकू लागले दयानंदांची स्वारी बरोबर तीन वाजता आली. पण प्रतिपक्षाचे कोणीच येईना तेव्हा दयानंद केसरी वादास सिद्ध झाले पण भागुबाई-प्रमाणे कमलनयना घरीच! अशा दयानंद पक्षांत कुचेष्टाही सुरू झाली. असे ऐकतों पुढें कित्येक बोलावणीं गेल्यावर आजारीपणाची वगैरे कोणतीच सबब चालत नाही असे पाहून मुंबईच्या रामानुज पंथाचे गुरु पंडित कमलनयनाचार्य आपल्या वीस-पंचवीस शिष्यांसह सभास्थानीं येऊन दाखल झाले तेव्हा शंकर नानाभाई यांनी उभय पक्षांपैकी ठाकुर जीवनदयाळ आणि शिवनारायण वेणीदास यांनी शास्त्रार्थाबद्दल केलेला करार वाचून दाखविला त्यांत, दयानंद विजयी झाले तर कमलनयनाचार्यांचे अनुयायी मारवाडी शिवनारायण यांनी दयानंदांचे शिष्यत्व पत्करावें आणि उलटपक्षीं ठाकुर जीवनदयाल यांनी कमलनयनाचार्य यांचे अनुयायी होऊन रामानंदी चिन्हें धारण करावीं. सभेची खरी हकीकत उभयतांच्या सहीनें प्रसिद्ध करावी आणि सभेसंबंधीं खर्चाची व पोलीसपार्टी हजर ठेवून शांतता राखण्याची जबाबदारी दोघांनी पत्करावी असे होतें. हा प्रास्ताविक कार्यक्रम झाल्यावर वादविवादास सुरुवात व्हावयाची, पण वादास मध्यस्थ कोण असावे हा एक प्राथमिक मुद्दा निघून त्यावरच वादाचा दावा कांहीं एक निष्पन्न न होता काढून टाकण्यात आला. स्वामी दयानंद व शेट मथुरादास लवजी यांनीं शास्त्रनिर्णयाच्या महत्त्वाबद्दल आचार्यांस पुष्कळ सांगून पाहिले पण मध्यस्थाचा प्रश्न आचार्यांच्या मताप्रमाणे न मिटल्यामुळे ते सभास्थान सोडून निघून गेले. तेव्हां अर्थातच एक तर्फीच दयानंदांचे मोठे जोरदार व उपहासपूर्ण असे व्याख्यान झाले त्यात त्यांनी मूर्तिपूजा लोकांनी ताबडतोब सोडावी अशाबद्दल फार आग्रह-पूर्वक सांगितले व्याख्यानानंतर कोणी एक हरगोविंददास बाबा नामक शेठ्यांनीं स्वामीस प्रश्न विचारला कीं, सत्ययुगांत मूर्तिपूजा होती काय? स्वामींनीं उत्तर केलें कीं.

सत्ययुगच काय पूर्वी कोणत्याच युगात मूर्तिपूजा नव्हती जेव्हा आद्य शंकराचार्यांनीं जैनमताचें खंडन करून जैनांचा पुरा पाडाव केला, तेव्हा त्यांनी आपल्या मूर्ति जमिनीत पुरून ठेवल्या त्याच पुढे कोठें कोठें खणताना लोकांना सापडल्या व त्याचेच पुन्हा पौराणिकानी देव्हारे माजविले अशा रीतीने एके बाजूस दयानंदांचा युक्तिवाद आणि दुसऱ्या बाजूने कमलनयनाचार्यांचा मुग्धपणा यामुळे कित्येकांवर दयानंदांची छाप पडून ते कमलनयनाचार्यांची उघड उघड निंदा करू लागले तात्पर्य, ह्या मुंबईच्या शास्त्रार्थांतही पोलीसच्या बंदोबस्तामुळे जरी इतर अत्याचार झाले नाहीत तरी एका पक्षाने आचार्यांस कमलनयना . इतकेच म्हणून डोळे मिचकावीत आवडा गिळावा आणि दुसऱ्या पक्षाने उपराधिकपणे "इतक्यात सरस्वती अवतरली ! " असे दयानंदास अनुलक्षून म्हणावे असें असभ्यपणाचे वाक्ताडन होतच होते असे दिसतें ! मागून श्रीमत्कमलनयनाचार्यांनी मूर्तिमंडनपर आपला एक निबंध प्रसिद्ध केला. त्याबद्दलचे विवेचन येथे न करता अखेर आर्यमतसमीक्षेत करू

पुढे इ० सन १८७४ साली जून-जुलै महिन्यात स्वामींचा मुक्काम महाराष्ट्राची राजधानी पुणे येथे झाला, त्या मुदतीत स्वामींचीं व्याख्यानें बुधवारात वेलबागेत भिडे यांच्या दिवाणखान्यांत रोज होत असत या कामी स्वामींची व्याख्यानांची व्यवस्था ठेवण्याचे काम न्या० माधवरावजी रानडे यांनी आपल्याकडे घेतलें होते व्याख्यानमाला संपल्यावर शेवटल्या दिवशी स्वामींची मिरवणूक काढण्याचे ठरले ही गोष्ट गावांत कळताच विरुद्ध बाजूच्या मंडळीत मोठीच खळबळ उडाली ! विरुद्ध पक्षांत शास्त्री-मंडळातील रामदीक्षित आपटे व दुसरे गावगुंड पुष्कळ होते. दयानंदाचा बुद्धया उपहास करण्याच्या बुद्धीने ह्या मंडळींनी मिरवणुकीच्या दिवशी गर्दभानंदाचार्य म्हणून एका गाढवाची बॅण्ड लावून मिरवणूक काढली ही मिरवणूक सकाळपासून सायंकाळपर्यंत एकसारखी प्रत्येक आळींतून चालली होती व "श्रीरामानंदस्वामी की जय " असाही जयघोष प्रत्येक चार पावलागणिक सुरू होता याप्रमाणे इकडे हा प्रकार सुरू असतां सायंकाळी चार-पांच वाजता भिड्यांच्या वाड्यांत दयानंदाचे शेवटले व्याख्यान सुरू झाले त्यांच्या मार्मिक आणि अलंकारिक भाषेनें श्रोतृसमाज तल्लीन झाला होता. त्यांनीं आपल्या समारोपाच्या भाषणांत सर्व श्रोतृसमुदायाचे मोठ्या आलंकारिक आणि विनोदी भाषेत आभार मानले इतके झाल्यावर हारतुरे, पानसुपारी होऊन मिरव-

णुकीला सुरुवात झाली. दयानंद हत्तीवर बसले असून त्यांचे ग्रंथ पालखींत ठेवले होते. अशा थाटात मिरवणूक निघाली तों विरुद्ध बाजूच्या कुटाळ मंडळींनीं मध्येंच शिरून बरेंचसें तोंडसुख घेतले आणि त्या भर पावसाळ्या दिवसातच शिमग्यातील धुळवड-शेणवडीचीही हौस पुरविली ! चिखलाचे गोळे स्वामींच्या व त्याच्याबरोबर असलेल्या न्या० रानडे यांच्या अंगावर येऊ लागले पोलीसपार्टी वरोबर होती पण दगड येईपर्यंत त्यानीं आपला अधिकार चालविण्यास त्यास मनाई केली होती. स्वामी दयानंद आणि न्यायमूर्ति हे दोघेही शांतीचेच पुतळे त्यानी हा सर्व छळ शांतपणें सहन केला न्यायमूर्ति घरी गेल्यावर घरच्या मंडळींनी विचारल्यावर ते म्हणाले, " पक्षाभिमानाची कामे म्हणजे अशींच असतात. दुसऱ्या पक्षातील माणूस लहान असो कीं मोठा असो त्याची परवा त्याना का वाटावी ? अशा वेळीं मानापमानाचा विचार आमच्या मनात तरी का यावा ? या गोष्टी अशाच चालावयाच्या " असो. याप्रमाणें पुण्यातील काही लोक जरी दयानंदाचे विरोधि होते तरी पुण्यातील सुधारकांपैकी कित्येकांची दयानंदाबद्दल सहानुभूति होती. असे होते, तरी पण एका बाजूचे विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि दुसऱ्या पक्षाचे डॉ० भांडारकर या दोघानींही दयानंदाच्या मताचा उपहासच केला न्या०माधवराव रानडे अधिक मुत्सद्दी होते त्यांनी त्याचा सलोखा प्रार्थनासमाजाशी जोडण्याचा प्रयत्न चालवला होता, पण तो साधला नाही महाराष्ट्रीयात कोणाचा विशेष पाठिंबा त्यांस मिळाला असला तर तो लोकहितवादी रा० ब० गोपाळराव हरि देशमुख यांचाच होय. पण रावबहादुरांचें एका सनातनी पक्षाशींच काय ते जमत नव्हतें. नाही तर ते प्रार्थनासमाजी मंडळींत प्रार्थनासमाजी, थिऑसफिस्टांत त्यातलेच एक किंवा आर्यसमाजी मंडळींत त्याचेही पुरस्कर्ते अशी त्यांची वृत्ति होती. शिवाय ते त्या वेळीं नोकरीच्या निमित्तानें अहमदाबादेस असल्यामुळे निमसहकारी आणि अर्धे गुजराथीच बनले होते या कारणाने त्यांच्या पुरस्कारामुळें आर्यसमाजाचे कार्य महाराष्ट्रात तरी सरसावले नाही. मुंबई आणि गुजराथ येथील स्वामींच्या संचारात वल्लभी पंथातील पुष्टिमार्ग आणि स्वामीनारायणपंथ हे स्वामींच्या टीकेचे नवीन विषय झाले होते. या संचारातही या विरोधामुळे वल्लभी आणि वैष्णवी पंथाभिमान्याकडून त्यांच्या जीवावरचे अनेक प्रसंग आलेले टळले. अहमदाबादेस ते प्रार्थनासमाजाच्या विनंतीवरूनच गेले होते. तेथील प्रार्थनासमाजाचे प्रमुख चालक रा. ब. भोलानाथ साराभाई आणि रा. सा. महिपतराम रूपराम यांस

त्यांनीं आपलें वेदमत स्वीकारण्यास सांगितलें. पण तें त्यांनीं नाकारले पुढें पश्चिम हिंदुस्थान सोडून स्वामींनीं आपला दौरा पुन्हा उत्तरेकडे वळविला. या दौऱ्यांत विशेषेकरून लखनौ आणि चाद्‌ूर येथे जे स्वामींनीं धर्मसवाद केले ते नमुन्याकरिता सारांशरूपानें पुढील प्रकरणात देत आहोत

---

## प्रकरण ६ वें

# धर्मसंवाद

**जन बिभ्रति बहुधा विवाचसं नाना धर्माणं पृथिवी यथौकसम्**
**सहस्रं धारा द्रविणस्य मे दुहां ध्रुवेव धेनुरनप स्फुरन्ती**

—अथर्व० १२।१।४५.

" अनेक प्रकारच्या भाषा बोलणाऱ्या व अनेक धर्मांचें पालन करणाऱ्या अशा विविध लोकाना आमची मातृभूमि एका घरात राहणाऱ्या कुटुंबाप्रमाणे धारण करते, ती आमची मातृभूमि दयाळ गाईप्रमाणें धनाचे अनेक प्रवाह मला देवो "

दयानदाच्या शास्त्रार्थाच्या धुमश्चक्रीत काही सुखसवादही झाले त्याचे काही काही नमुने ह्या प्रकरणात देण्याचें योजले आहे बाह्यतः त्याची वृत्ति जरी भाडखोर दिसत असली तरी त्याचे अतर्याम लोकसग्राहकच असावें अशा बुद्धीने झालेले त्याचे सवाद व प्रश्नोत्तरें साराशरूपाने पुढे देत आहोत

अशा सवादापैकी लखनौ येथील सवादातील दयानदाचे महत्त्वाचे मुद्दे असे होते कीं, [१] मूर्तिपूजा ही घातकी व पापरूप आहे, [२] सुखदुःखात्मक भावना ज्याप्रमाणे आकाराशिवाय आपण करू शकतों, त्याचप्रमाणे अमूर्त परमेश्वराची कल्पना करावी, वाटल्यास विश्वदर्शनातच त्यास पाहून आपली तहान भागवावी [३] नाम-जप आणि तात्रिक विधि हे व्यर्थ आहेत ईश्वरास ओळखून आपल्या आचरणात त्याचें अनुकरण झाले पाहिजे, [४] रामलीला आणि रासलीला पाहणे हे हजारो गुन्हे एकदमच करण्याप्रमाणे पापरूप आहे, [५] सस्कृत भाषा अनादि आहे, [६] वडिलानी मुलास आपलीच आज्ञा पाळण्याचा उपदेश करावा, त्याप्रमाणे ईश्वराने वेदात आपलीच स्तुति सागितली आहे. त्यात गैर काही नाही, [७] या वेदाची प्रथम स्फूर्ति अग्नि, वायु, अगिरा आणि आदित्य या ऋषींच्या ठिकाणी ईश्वराने उत्पन्न केली (८) आत्म्याचें स्वरूप एकच आहे पण व्यक्ति भिन्न आहेत. व्यक्तीच्या आकारमानाप्रमाणे आत्मा होतो.एरव्हीं मानवाचा कर्ता मानवास कसा दिसेल ? पण सृष्ट पदार्थांवरून त्याचें अनुमान होते. आणि तो जरी अव्यक्त रीतीने सर्वत्र आहे, तरी आपल्या अध्यात्म-

ज्ञानाच्या रूपानें तो व्यक्ती-व्यक्तींच्या ठिकाणीं कमी अधिक व्यक्त झालेला दिसतो बुद्धिमान आणि विद्वान् अशा ज्या व्यक्ति त्याच देवता होत.

लखनौ सोडून चादपूरला जाण्याच्या दरम्यान दिल्ली-दरबारच्या प्रसंगाचा फायदा घ्यावा म्हणून दयानद दिल्लीस गेले इंदूरच्या महाराजाच्या पुरस्काराने तेथें जमलेले राजे-महाराजे यांस एकत्र जमवून आपल्या मतप्रसारास राजाश्रय मिळविण्यास त्यानीं पुष्कळ प्रयत्न केला पण दिल्ली दरबारला आलेल्या राजे-रजवाड्यास धार्मिक शास्त्रार्थाकडे लक्ष देण्यास मुळीच सवड नव्हती तेव्हा राजे रजवाड्याचा नाद सोडून बगालचे ब्राह्म पुढारी केशवचद्र सेन, पजाबचे प्रागतिक मताचे कन्हयालाल अलकधारी, मुरादाबादचे हिंदुधर्माचे पुरस्कर्ते मुनशी इंद्रमणि तसेच सर सय्यद अहमद खान आणि बाबू हरिश्चद्र चितामणि अशा अनेक धर्मपथाभिमानी लोकाची एक सभा स्वामी दयानदानी दिल्लीस जमविली. पण मूळ तत्त्वातच मतैक्य न झाल्यामुळें सहकारितेने धर्म सुधारण्याचा स्वामींचा तोही प्रयत्न निष्फळ झाला

अशाच प्रकारचा एक प्रयत्न चादपुरचे मुन्शी प्यारीलाल यानी केला भारत वर्षात त्या वेळी प्रचलित असलेल्या हिंदु, महमदी, व ख्रिस्ती धर्मापैकी खरा धर्म कोणता याची शहानिशा व्हावी, म्हणून जिल्ह्याच्या कलेक्टरचे परवानगीने त्यानी १९ मार्च १८७७ पासून एक सभा भरविण्याचे ठरविले. सभेंतील वाद विवाद सात दिवस, निदान तीन दिवस तरी चालावा असे स्वामींच्या मनात फार होतें पण तेंही घडले नाही अखेर सभेत काहीच निर्णित न होता सभा मध्येच बरखास्त झाली. तरी पण दोन दिवस जें सभेचें काम झाले ते बरेंच व्यवस्थित झाले सनातनी पडिताशी शास्त्रार्थ असला की, त्या सभेत ज्याप्रमाणें हटकून शब्दच्छल, गोंधळ आणि शेवटी मारामारीपर्यत अतिरेक हा व्हावयाचाच, तसें ह्या सभेत काहीच झाले नाही, हा विशेष लक्षात येण्यासारखी गोष्ट आहे या सभेस ख्रिस्ती धर्माचे प्रतिनिधि म्हणून रे० टी जी स्कॉट, रे० नोयल वगैरे अनेक पाद्री आले होते इस्लामी धर्माच्या वतीने एका सुप्रसिद्ध आरबी शाळेचे मुख्याध्यापक मौलवी महमद कासीम आणि तुर्की सुलतानाकडून पदवी मिळालेले सय्यद अबुल मनसूर व दुसरे कित्येक गृहस्थ होते हिंदुधर्माचे प्रतिनिधि म्हणून स्वामी दयानद आणि मुन्शी इंद्रमणि हे दोनच पंच होते आर्यांनीं तिसरे लक्ष्मणशास्त्री यांस वादविवादाकरिता घ्यावें असा प्रतिपक्षीयाचा फार

आग्रह होता पण तें दयानदानुयायी आर्यांनीं ऐकले नाहीं तसेंच हिंदु-मुसलमानांनी अतस्थ सलोखा राखून ख्रिस्ती मतांचें खंडन करावे असाही कोणीं प्रयत्न केला पण तेंही दयानदांनी ऐकले नाहीं वादविवादाकरिता पांच मुद्दे ठरविले होते· [१] ईश्वराने सृष्टि, कां, कशातून व केव्हा निर्माण केली ? [२] ईश्वर सर्वव्यापक आहे की नाही ? [३] ईश्वर न्यायी आणि दयाळू कसा असू शकेल? [४] वेद, कुराण आणि बायबल हे ईशप्रणीत कशावरून ? [५] मुक्ति म्हणजे काय आणि ती कशी प्राप्त होते ? ह्या पाच प्रश्नांपैकीं वेळाच्या अभावी पहिला व पाचवा ह्या दोनच मुद्द्यावर वाद झाला त्यातही पाचव्या मुद्द्यावरील दयानदाचें भाषण अपुरे असतांना काम सपले, अशा गैरसमजानें श्रोते मडळी उठली व त्यामुळे सभेत गोंधळ होऊन सभेचे काम तेथेच थावले तथापि वरील दोन मुद्द्यावरील ह्या तिरगी सामन्याचा साराश असा—

## मुद्दा पहिला

रे० स्कॉट—ईश्वरानें जग कशातून निर्माण केले हे ज्या अर्थी आपणास कळत नाहीं, त्या अर्थी ते शून्यातच निर्माण झाले असें म्हणावे लागेल ते ईश्वराचे आज्ञेनेंच निर्माण झाले कधी ते ईश्वरासच ठाउक तें आपल्याला जरी सांगता न आले, तरी त्यास आरंभ असलाच पाहिजे तरी सृष्टीच्या वर्षांची गणना करण्याचा मानवी प्रयत्न अयुक्त आहे तसेंच तें ईश्वराने का निर्माण केले, हेंही आपल्याला बरोबर सागता येणार नाही तथापि इतके दिसते कीं, मर्त्य जीवांचें जीवन सुखात व्हावे म्हणून त्याने हे निर्माण केले.

मौलवी महमद कासीम—ईश्वराने हे जग आपल्याच शरिरांतून निर्माण केले. आपण जर त्याच्या सत्तेच्या बाहेर असू तर त्यास सर्वशक्तिमान् कसे म्हणता येईल ? ते कधी निर्माण झाले, याबद्दल कल्पना करणे व्यर्थ आहे. आपण खाण्यापिण्याचे धनी, भलताच विचार आपल्याला काय कामाचा ? सर्व सृष्ट पदार्थांत मनुष्य हा श्रेष्ठ आहे· ईश्वरोपासनेकरिताच तो निर्माण झाला आहे आणि त्याच्या सुखासाठींच सारे जग आहे.

स्वामी दयानद—या वादविवादात कोणींही निंदाव्यजक किंवा कठोर शब्दांचा उपयोग करू नये या धर्मसवादात जो धर्म अखेर सर्वांत श्रेष्ठ ठरेल तोच सर्वांनीं सत्य धर्म म्हणून मानावा. असो ईश्वरानें हे जग प्रकृतींतून निर्माण केले, तिलाच

अव्यक्त किंवा अव्याकृत असें म्हणतात. ती अनादि आहे प्रकृतीचे मूळ परमाणु वृद्धि-क्षयरहित आहेत. त्यांस ईश्वर निरनिराळे आकार देतो व प्रलयकाळीं ते आकार मूळच्या अव्यक्त रूपांत जातात. याप्रमाणे अव्यक्तांतून जग व्यक्तदशेला आजपर्यंत किती वेळा आलें तें सांगतां येणार नाहीं पण तें शून्यांतून किंवा केवळ ईशाज्ञेनें निर्माण झालेलें नाहीं ईश्वराला जगाचें घटाच्या मातीप्रमाणें उपादान-कारण मानतां येत नाहीं. कारण तसें मानलें तर जगांतील सर्व पापांस जबाबदार ईश्वरच होतो जगांतील कुत्रीं आणि मांजरें, चोर आणि जार हीं सारीं त्याचींच रूपें ठरतात तसेच तो चक्र, दड, देश, काल इ० घटसाधनांप्रमाणें जगाचे साधारण कारणही नव्हे तर तो ( कुभाराप्रमाणे ) निमित्त कारण आहे जगाचें उपादान कारण ईश्वराहून भिन्न पण ईश्वराप्रमाणेंच अनादि व अनत आहे तसेंच जीवात्मेही स्वभावतः ईश्वराप्रमाणेंच अनादि व अनंत आहेत आतां आजची सृष्टि कधीं निर्माण झाली, हे परधर्मीयाना सागता न आले तरी आम्ही आर्यधर्मी ते सागू शकतों रोजकीर्दीच्या मितीप्रमाणे आम्ही आपली भूतकालाची गणना रोज निश्चित करीत असतों आमच्या रोजच्या सकल्पांवरूनच असे दिसेल की, ही सृष्टि उत्पन्न झाल्याला आज (सन १८७७) १९६०८५२९७६ इतकीं वर्षे झाली असून २३३३२२७०२४ इतकी अद्याप जावयाची आहेत. याबद्दल आम्हा सर्व आर्यांचें एकमत आहे त्यास खगोल आणि भूगोल शास्त्रांचाही आधार आहे आता सृष्टि उत्पन्न होण्याचे कारण जे सृष्टपदार्थ व जीवात्मे ते अनादि व अनत असल्यामुळें, त्यांचें कर्मही तसेंच मानले पाहिजे. असे जे कर्मशेष प्रळयकाळीं अभुक्त राहतात, त्यांचीं योग्य तीं फळें जीवास मिळण्याकरिता ईश्वर पुन्हा सृष्टि निर्माण करतो सृष्ट्याची सृजनशक्ति मानल्यावर सृष्टिही ओघानेंच येते.

रे० स्कॉट—सोपाधिक वस्तु शाश्वत असणार नाही जगास आकाराची उपाधि आहे.

मौ०—जर सर्वच वस्तु अनादि असतील तर ईश्वर मानण्याचेंच कारण उरत नाहीं. तसेंच सृष्टीचा आरंभकाल सांगता येणें अशक्यच आहे.

स्वामी—घटाप्रमाणें आकारास आलेलें कार्य हें शाश्वत नाहीं. पण त्याचें मूळ उपादान कारण [ मातीचे परमाणु ] हें शाश्वत आहे. आणि संयोग पावणें व विभागणे हे त्या परमाणूंचे स्वभावधर्म आहेत. असें आहे तरी मातीला स्वातंत्र्या-

नें घटाचें रूप घेतां येत नाही. यामुळें मातीचे परमाणु जरी अनादि असले तरी घटाचा आकार उत्पन्न होण्यास कुभाराप्रमाणेच ईश्वराची गरज आहे. सृष्ट पदार्थाच्या रचनेप्रमाणें कर्माचीं फलेंही देणारा तोच आहे

नेटिव ख्रिस्ती—कारण आणि कार्य दोन्ही अनादि कशीं असतील ? तेव्हां ईश्वरानेंच आपल्या हुकमतीनें जग निर्माण केले हेच खरे

मौ०—अतर आणि बाह्य असे गुणाचे दोन प्रकार आहेत अतर्गुण स्वाभाविक असतात व बाह्य गुण आरोपित असतात. प्रतिबिब उपाधिभेदाने भिन्न झाले तरी ते बिबरूप होत नाही यात्रमाणे ईश्वरी इच्छेनें आपण निर्माण झालों आहोंत

दयानद—कार्य आणि कारण दोन्ही अनादि मानण्यास काय हरकत आहे ? उपादान कारण जे परमाणु ते व अनंत आत्मे हेही अनादीच आहेत. ईश्वराची हुकमत किवा शक्ति हा जर कांही पदार्थ असेल तर तोही ईश्वराप्रमाणे अनादीच असला पाहिजे ईश्वराचें नाम आणि गुण ईश्वराप्रमाणेच कालातीत आहेत. ईशेच्छेने जग निर्माण झाले, असे म्हणणारे इच्छेला द्रव्यरूप मानीत असतील तर तेच जगाचे अनादि कारण होय. आणि इच्छा हा केवळ गुण मानीत असतील तर केवळ गुणापासून जगाची उत्पत्ति होणे अशक्य आहे घट उत्पन्न होतो तो जसा घटाच्या इच्छेनें होत नाहीं, तसाच तो केवळ कुंभाराची इच्छा ह्या गुणाचाच बनत नाही त्याला वेगळें मातीचे उपादान कारण लागतें. केवळ प्रकाश (नूर) इच्छा किवा शून्य यातून जगाची उत्पत्ति होणार नाहीं कार्य जसें असेल त्यावरूनच कारणद्रव्याची कल्पना केली पाहिजे

नेटिव ख्रिस्ती—ईश्वर आणि जग ही दोन्ही तत्त्वतः अनादि असतील तर ईश्वरास अपूर्णता येते.

दयानंद—ईशतत्त्वात असलेलें विश्व अनादीच होय तेच प्रकृतीची उपाधि घेऊन जें व्यक्त झाले, ते समर्याद व सोपाधिक असले तरी ज्याने मूळ प्रकृतीच्या परिमाणूंस लाबी, रुदी व जाडी दिली तो ईश्वर अमर्याद व निरुपाधिकच आहे.

रेव्ह०—हें पहा मौलवी, आपल्यासारख्या हजार जणानीं जमून जरी स्वामीपुढें प्रश्नांची मालिका लावली, तरी ते साऱ्यांस पुरे पडतील. ह्यासाठीं ह्या मुद्द्यावरील वाद अधिक वाढविण्यांत अर्थ नाहीं.

## मुद्दा दुसरा–मुक्ति

दयानद—मुक्ति म्हणजे दुःखनिवृत्ति आणि चिदानदप्राप्ति जन्म-मरणापासून सुटका–मुक्ति प्राप्त करून घेण्याची [१] सदाचार म्हणजे ईशाज्ञेप्रमाणे (वेदाज्ञेप्रमाणे) व आपल्या विवेकवाणीप्रमाणे वर्तणे, [२] वेदाभ्यास, ज्ञानवृद्धि, सत्यप्रीति, [३] सत्सगति, [४] असत्यापासून मन, इद्रियें आणि आत्मा याचा निग्रह आणि त्याची योगाभ्यासाने सत्याकडे प्रवृत्ति, [५] ईश्वरी गुणाचे ध्यान किंवा स्तुति, [६] असतो मासद्गमय इ० प्रकारें प्रार्थना, धर्म, अर्थ, आणि काम, अशी सहा साधनें आहेत याचे योगाने मोक्ष मिळतो येथे अर्थ म्हणजे स्वार्थ नव्हे तसेंच धर्म आणि अर्थ याच्या अनुषगानें असणारी जी सुखेच्छा तोच काम हा पुरुषार्थ होय

रेव्ह०—मुक्ति म्हणजे दुःखनिवृत्ति नव्हे, मुक्ति म्हणजे पापनिवृत्ति व स्वर्गप्राप्ति होय मूळ पुरुष जो आदम त्याला सैतानाने पापाकडे प्रवृत्त केले त्याच्या अधःपातानें त्याच्या सर्व मानववशाचे अधःपतन झाले घड्याळजी ज्याप्रमाणे घड्याळाच्या गर्तात ढवाळाढवळ करीत नाही त्याप्रमाणें जीवाची कर्मगति स्वतत्र आहे जीवास जर मुक्ति पाहिजे तर येशुख्रिस्तावर श्रद्धा ठेवल्यावाचून ती मिळणे अशक्य आहे

मौ०—स्वामी सागतात तेवढे गुण मुक्त होण्यास पुरेसे नाहीत. मुक्ति ही ईश्वरी इच्छेवरच अवलबून आहे वाटेल त्यास तो मुक्त करील त्या ईश्वराचा अखेरचा प्रेषित महमद पैगबर आहे यासाठीं त्याच्यावर निष्ठा ठेवल्यानेंच मुक्ति मिळेल.

स्वामी—पापनिवृत्ति ही सदाचार या पहिल्याच साधनात आली ख्रिस्ती लोकाची सैतानाची कल्पना अप्रयोजक आहे. त्याने ईश्वराच्या सर्वशक्तिमत्त्वाला हरताळ लागतो. शिवाय एका आदमच्या चुकीचें प्रायश्चित्त सर्व मानवी वंशाला भोगण्यास लागावें हे असंबद्ध दिसते सैतान जर मोह घालतो तर सैतानाचा प्रेरक कोण ? आणि तो जर ईश्वर असेल, तर ईश्वरी प्रेरणेपुढे कोणाचाच तरणोपाय नाहींसा होईल. तसेच सैतान हा स्वतःचा स्वतःच प्रेरक असला तरी ईश्वर त्यास शासन करू शकत नाहीं, हेंही आश्चर्यच होय मानवी प्राण्याच्या उद्धारासाठीं ईश्वरानें आपला पुत्र बली द्यावा आणि आता सर्व ख्रिस्ती लोकास पापाचरणात निश्चित करावें, हेंही असभाव्यच होय. ख्रिस्ताची मध्यस्थी मुक्तीला अवश्य

लागावी, यांतही ईश्वराचें अज्ञान, असामर्थ्य व अन्यायच उघड होतो. त्याचप्रमाणें त्याच्या व्यापकत्वालाही बाध येतो. आर्यधर्माचा नीट अभ्यास न करणारे पाद्री कलियुगाबद्दल भलतीच कल्पना करतात. ऐतरेय ब्राह्मणात असें म्हटलें आहे कीं, 'कलिः शयानो भवति सञ्जिहानस्तु द्वापरः । उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं सम्पद्यते चरन् । भावार्थ—जे अधर्मी आहे तें कलियुग, जें अर्धे अधर्मी व धर्मी तें द्वापर, जे चतुर्थ अधर्मी व पाऊण धर्मी तें त्रेता आणि जें पूर्ण धर्मी तेच सत्ययुग होय धर्मात्म्यांच्या सगतीचा महिमा मोठा असला तरी ईश्वराला त्याच्या मध्यस्थीची जरूर असते, असें मुळींच नाहीं आमच्या आर्यांचा आज १९६०८५२९७६ इतक्या दीर्घ कालांनीं जो अधःपात झाला असेल त्या मानाने इस्लामी व ख्रिस्ती लोकाचे त्यांच्या धर्मसस्थापनेनतर अवघ्या दीड दोन हजार वर्षांत फारच धर्मपतन झाले आहे मौलवीसाहेब म्हणतात त्याप्रमाणे मुक्ति देणे न देणे ही गोष्ट ईश्वराच्या खुषीवर नसून जीवाच्या कर्मावर ती अवलबून आहे, असे मानणें अधिक न्यायाचे होईल जो पुण्य करतो तो नरजन्मात येतो जो पाप करतो तो तिर्यग्योनीत जातो. आणि जो फारच पुण्य करतो तो साधु अगर देवनाकोटीत जातो

इतकें बोलणे झाल्यावर मौलवीसाहेब निमाजाची वेळ झाली म्हणून निघून गेले आणि स्वामी व रेव्हरडसाहेब खाजगी सभाषणाकरिता जरा बाजूला गेले त्याबरोबर पीठावर उभे राहून कोणी मौलवी व्याख्याने देऊ लागले पाद्री लोकात वेगळ्याच गोष्टी सुरू झाल्या इतक्यांत कोणी सभा बरखास्त झाली असेही सांगितले यामुळे स्वामींचें भाषण अपूर्ण राहूनच हा वाद संपला

अशा रीतीने हा संवाद जरी शेवटी अपुराच राहिला तरी ह्या संवादाची जी सुसगत हकीगत आर्यांच्या वाङ्मयांत उपलब्ध आहे, तशी हिंदु पडितांशीं दयानंदांनीं केलेल्या शेंकडो शास्त्रार्थांपैकीं एकाही प्रसगींच्या संवादाची तपशिलवार हकीगत प्रसिद्ध नाही, ह्याचे मोठें नवल वाटते नाही म्हणायला एकदां कांहीं पौराणिक पंडितानीं स्वामी दयानंदांकडे पंचवीस प्रश्न पाठविले त्याचीं उत्तरे दयानंदांनीं देऊन तीं प्रसिद्ध केली. हे प्रश्न विशेष मुद्देसूद आहेत म्हणून नव्हे तर पौराणिक आणि दयानद यांच्यांत झालेली ही एवढीच प्रश्नोत्तरमाला उपलब्ध झाल्यामुळें क्वचित् द्विरुक्तीचा दोष घेऊनही तीं साराशरूपानें खालीं दिली आहे.

प्रश्न—वेदादि शास्त्रांत संन्याशांचे धर्म काय आहेत ? संन्याशांनीं वाहनात बसणे हुक्का पिणें उक्त आहे काय ?

उत्तर—संन्याशानें ज्ञानपूर्वक, वेदानुकूल व शास्त्रोक्त रीतीने वर्तावें. पक्षपात, शोक,वैर,हठ किंवा दुराग्रह, तसेच स्वार्थसाधन,निंदास्तुति, मानापमान इत्यादिबद्दल ईषणा हे दोष सोडावे. जेणेंकरून लोक असत्य आणि दुराचार सोडतील, आपली शारीरिक, आत्मिक व सामाजिक उन्नति करून घेतील आणि पुरुषार्थ करून आपले व्यावहारिक आणि पारमार्थिक सुख साधतील, अशासाठी त्यास समर्थ करण्या-करितां त्यांनीं सत्यासत्यविवेक करीत सर्वत्र विचरावें त्यांनी हर्षशोकरहित होत्साते वाहनात प्रवास केला किवा रोगनिवृत्तीकरता धूम्रपान केलें तरी हरकत नाहीं.

प्रश्न—पापाची क्षमा होत नसेल तर मनूनें प्रायश्चित्तें सागितली त्यांचें फळ काय ? ईश्वराच्या दयालुतेचे प्रयोजन काय ? आगतुक पापापासून मुक्त होण्यास जर मनुष्य स्वतत्र असेल, तर ईश्वराच्या क्षमाशीलतेचा उपयोग काय ?

उत्तर—पापाची क्षमा ही वेदविहित किवा युक्तिसगतही नाही. क्षमा आणि प्रायश्चित्त याचा काहींच सबध नाही. अपराध्यास कारागृहवासाप्रमाणें प्रायश्चित्तांत पापफलभोग होत असतो नास्तिक आणि दुःखपीडित लोक ईश्वराची निंदा करितात, ती त्यानी सहन करून आपली कृपादृष्टि न सोडणें हीच ईश्वराची क्षमाशीलता.

प्रश्न—जर आपल्या मतानें तत्त्वाचे परमाणु नित्य आहेत आणि कारणाचा गुण कार्यात असतो तर सूक्ष्म परमाणूची ही स्थूल सृष्टि कशी झाली ?

उत्तर—परम सूक्ष्म परमाणूलाच अव्याकृत म्हणतात हे परमाणु नित्य आणि सत्य आहेत जे गुण समवायसबंधाने कारणात असतात ते कारणात व कार्यात नित्य असतात. संयोग वियोग, गुरुत्व-लघुत्व हे गुण परमाणूत नित्य आहेत. यामुळे सृष्ट पदार्थाच्या स्वरूपात अनित्यता येत नाही. गुण-गुणींचा समवायसबंध आहे.

प्रश्न—जीवेश्वराचा परस्पर सबध कसा आहे ? ज्ञानाने जीव ईश्वर बनेल काय ? जीवात्मा व परमात्मा दोन्ही नित्य आहेत काय ?

उत्तर—स्वामीसेवक (पितापुत्र), व्याप्य-व्यापक असा जीवेश्वर सबध आहे. जीव अल्पज्ञ असल्यामुळे कधींच ईश्वररूप होणार नाही, तो सदा ईश्वराधीन आहे. ईश्वराचें ज्ञान सदा एकरस आहे. त्यात भूत-भविष्यकालाचा सबध नाहीं. ईश्वर आपल्या ज्ञानासबंधी जसा स्वतत्र आहे, तसा जीव कर्म करण्यास स्वतंत्र व फल भोगण्यांत परतत्र आहे

प्रश्न—सृष्टीच्या उत्पत्ति-प्रलयासंबधीं आपले काय विचार आहेत ?

उत्तर—सृष्टीची उत्पत्ति प्रलय आम्ही मानतों. ईश्वराचे गुणकर्म व स्वभाव अनादि आहेत त्याचप्रमाणे जीवादि सृष्टिप्रवाहही अनादि आहे

प्रश्न—मोक्ष म्हणजे काय ?

उत्तर—सर्व अशुभ कर्मांचा त्याग करून केवळ शुभकर्मच करीत राहणे ही जीवन्मुक्ति होय आणि दुःखमुक्त होऊन [ सृष्टीची उत्पत्ति व प्रळय छत्तीस हजार वेळा होईपर्यंत ] परमात्म स्वरूपात आनंदपूर्वक असणे हा मोक्ष होय

प्रश्न—धनवृद्धि करणे, कलाकौशल्यद्वारा लोकांना सुखी करणे आणि रोगग्रस्त पापी लोकाना औषध देणे, हा धर्म आहे काय ?

उत्तर—होय आहे

प्रश्न—मास खाणे पाप असेल तर यज्ञांत त्याचा विधि कसा ?

उत्तर—मास खाणे पाप आहे सच्छास्त्रात त्याचा विधि नाहीं तत्संबंधीं मनुस्मृतील वचन प्रक्षिप्त आहे

प्रश्न—जीवाचे लक्षण काय ?

उत्तर—इच्छा, द्वेष, प्रयत्न, सुखदुःख आणि ज्ञान असे न्यायघटित लक्षण आहे

प्रश्न—बहुपत्नीनिषेध शास्त्रात कोठें आहे ? तसे असेल तर एकपत्नी पुत्रवती झाल्यास सर्व पुत्रवती झाल्या असा शास्त्रात खुलासा कसा येतो ?

उत्तर—वेदात बहुविवाहाचा निषेध आहे. असे असूनही कोणी अनेक स्त्रिया केल्यास सवती मत्सराने सापत्न अपत्याचा वध होऊ नये म्हणून एकीच्या पुत्रानें सर्व पुत्रवती होतात असा शास्त्रार्थ आहे

प्रश्न—ज्योतिषशास्त्राचा फलितभाग, व भृगुसंहिता आपणांस मान्य आहे काय ?

उत्तर—फलितभाग आम्ही मानीत नाही, गणितभाग मान्य आहे. भृगुसंहितेत गणित असल्यामुळे ती मान्य आहे ज्योतिषशास्त्रांत जे ग्रंथ वेदानुकूल आहेत ते सर्व आम्ही आप्तग्रंथ मानतो

प्रश्न—पृथ्वीवर सुखदुःख, विद्याधर्म आणि मनुष्यसंख्या यांच्या न्यूनाधिकते-बद्दल आपले काय म्हणणें आहे ?

उत्तर—सुखादिकांची वृद्धि सापेक्ष असल्यामुळे आम्ही अनित्य मानतों आणि मध्यमावस्थेंत ती सारखींच मानतों.

प्रश्न—धर्माचे लक्षण काय ? ईश्वरकृत सनातन की मनुष्यकृत ?

उत्तर--पक्षपातरहित न्याय्य सत्याचें ग्रहण आणि असत्याचा त्याग म्हणजे धर्म तो वेदप्रतिपादित म्हणजे ईश्वरकृत सनातन आहे

प्रश्न---जर कोणी खिस्ती किंवा मुसलमान आपली मते मान्य करू लागला, तर त्यास आपले अनुयायी आपल्यामध्ये घेऊन त्याच्या हातचें खातील काय ?

उत्तर---वेद हेंच आमचें मत खान-पान, शौच स्नान, कपडे लत्ते आणि उठणे-बसणे इत्यादि देशोदेशींचे रिवाज आहेत त्यासच लोक धर्म मानून राहिले आहेत. हे केवढे अज्ञान आहे !

प्रश्न---आपल्या मताप्रमाणे ज्ञानावाचून मुक्ति मिळेल काय ?

उत्तर---नाही ईश्वरीय ज्ञानावाचून मुक्ति नाही धर्माने तें ज्ञान होईल.

प्रश्न --श्राद्ध करणे शास्त्रानुसार आहे काय ?

उत्तर---जीवित पितराना तृप्त करणे याचे नाव श्राद्ध वेदांत हेंच विहित आहे मनुस्मृतीत जे वेदानुकूल असेल तेवढेच मानणे योग्य होईल

प्रश्न---आपली पापापासून सुटका होणे कठीण असें जाणून आत्मघात करणें योग्य होईल काय ?

उत्तर---ते पाप होईल, फलभोगावाचून पापाची निष्कृति नाही

प्रश्न---जीवात्मे असंख्य आहेत काय ? मनुष्यास पशु-वृक्षादि हीन कोटीत जावे लागतें काय ?

उत्तर---ईश्वरदृष्टीनें नसले तरी जीवाचे दृष्टीने जीवात्मे असंख्य आहेत पाप अधिक झाल्यास जीवास हीन कोटींत जावे लागते

प्रश्न---विवाह करणे योग्य आहे काय ? प्रजोत्पादन पापावह आहे काय ?

उत्तर---जो विद्वान् व जितेंद्रिय पुरुष लोकोपकार करण्याची इच्छा करतो, त्यानें विवाह करणे योग्य नाही इतरानी विवाह करून ऋतुगामी होत्सातें प्रजोत्पादन करणे दोषावह नाहीं

प्रश्न---सगोत्र विवाह सदोष आहे काय ? सृष्टीच्या आदिकालांत असेच विवाह झाले नाहींत का ?

उत्तर---सगोत्र विवाहांत शरीर व आत्मा याची उन्नति होत नाहीं व प्रेमही वाढत नाहीं. सृष्टीच्या आदिकालांत गोत्रच नव्हतें तेव्हां तत्कालीन सगोत्र विवाहाचा प्रश्नच व्यर्थ आहे.

प्रश्न---गायत्रि-जपाचें फल काय ?

उत्तर—वेदांत गायत्रीच्या अर्थानुसार आचरणाचा विधि सांगितला आहे. वैदिक विधीप्रमाणें गायत्रि-जप केल्यास त्यापासून उत्तम फल प्राप्त होईल. कोणतेंही बरेंवाईट कर्म निष्फळ होत नाहीं

प्रश्न—धर्माधर्माचा संबध अतरंगाशीं आहे किंवा बाह्य परिणामाशीं आहे ? बुडत्या मनुष्यास काढताना काढणाराच बुडून मेला तर तो आत्मघातकी ठरेल काय ?

उत्तर—धर्माधर्माचा सबध अंतर्बाह्य आहे परोपकार करीत असता प्राणान्त झाल्यास त्यांत दोष नाहीं

हीं प्रश्नोत्तरें फर्रुखाबादच्या आर्यसमाजात वाचून दाखविल्यावर तीं 'भारत सुदशा प्रवर्तक' पत्रांत प्रसिद्ध झालीं

सन १८८० सालीं स्वामी दयानद सातव्यादा काशीस गेले. त्या वेळींही त्यांनीं शास्त्रार्थासाठी आव्हान दिले पण या खेपेच्या वर्णनात दयानद-चरित्रकार सत्यानंद असें लिहितात कीं, कर्दळीवनाचा फडशा उडविणारे गजराज केसरीची गर्जना ऐकून ज्याप्रमाणे भेदरून चीची करू लागतात, त्याप्रमाणे ह्या वेदकेसरीच्या आगमनानें काशींतील पंडिताची गाळण उडाली ! त्याच्यापुढें शास्त्रार्थ करण्यास तर कोणी धजलेंच नाही, पण उलट दयानदांच्या व्याख्यानानें शाततेचा भग होईल असा कलेक्टरकडे अर्ज करून त्यानी दयानदाचे व्याख्यानास काही काल तरी मनाईहुकूम मिळविला ! परंतु पुढे लवकरच कलेक्टरसाहेब यास आपली चूक कळून येऊन त्यानी मनाईहुकूम मागे घेतला मग काय, काशीच्या लक्ष्मीकुडावर स्वामीजींनीं आपल्या व्याख्यानाचा नुसता पाऊस पाडला ! आणि अखेर व्याख्यानमालासमाप्तीच्या दिवशीं (चैत्र शुद्ध ६) तेथें आर्यसमाजाची स्थापनाही केली.

तात्पर्य, स्वामी सात वेळां काशीस जाऊनही काशीच्या सुप्रसिद्ध पंडिताचा स्वामी दयानदाशीं काय संवाद झाला याबद्दल समाधानकारक आणि तपशीलवार माहिती देता येणें अशक्यच झाले आहे. मौजेची गोष्ट अशी कीं, लाला लजपतराय यांनी आपल्या इतिहासात काशीच्या पहिल्या शास्त्रार्थाची जी हकीगत दिली आहे, त्यास आधार ख्रिश्चन इंटेलिजेन्सर ह्या ख्रिस्ती धर्मप्रचारक पत्राचाच घेतला आहे. अशा पंडिताच्या शास्त्रार्थासबधी सर्वांत विश्वसनीय अशी माहिती मिळविण्याकरितां ख्रिश्चन इंटेलिजेन्सर ह्या ख्रिस्ती पत्रांतील उताऱ्याच्या उर्दू भाषांतरावर आर्यइतिहासकारांनाही भिस्त ठेवावी लागावी ही सखेदाश्चर्याची गोष्ट आहे. अथवा

आश्चर्य तरी कसलें ! त्या वेळीं ह्या देशांत परदेशांप्रमाणें वर्तमानपत्र चालविण्याचें शास्त्र रूढ झालेलें नव्हते, असेंच उघड दिसतें.

अशा स्थितींत खिस्ती लेखकाच्या आस्थेवाईकपणावरच आपल्याला आपल्या देशासंबंधी अनेक वाङ्मयात्मक आणि ऐतिहासिक गोष्टींच्या निर्णयासाठीं अवलंबावें लागत आहे ! ही त्याची आस्था एकपरी प्रशंसनीय नाहीं असें कोण म्हणेल ! स्वामी दयानंदांचा स्कॉट, जोन्स वगैरे खिस्ती धर्मप्रचारकाशी वादविवाद होण्याचे अनेक प्रसंग आले आणि ते सर्व संवाद व्यवस्थित रीतीनें प्रसिद्ध झालेले आढळतात. ह्या संवादात पुनर्जन्म, पापविमोचन, अवतारवाद, मूर्तिपूजा, सहभोजन इत्यादि वादांचे मुद्दे होते. या मुद्दयासंबधी स्वामींचीं मते त्यांच्या ग्रंथात इतरत्र अनेकवार यावयाचीं असल्यामुळें त्याचा येथें विस्तार करीत नाहीं. जोन्ससाहेबाजवळ हिंदूच्या मूर्तिपूजेबद्दल खुलासा करताना स्वामी म्हणाले कीं, मृत महापुरुषाचीं स्मारक-चिन्हें म्हणून मूर्ति करून घरांत ठेवण्याची पूर्वी पद्धत होती. त्यांतूनच पुढें ही प्रतिमापूजा निर्माण झाली. ती शास्त्रविहित नाही सहभोजनासंबधीं त्यानीं असें उत्तर दिलें कीं, विचारी मनुष्य तितक्याच आवश्यकतेवाचून आपल्या देशाचे व जातीचे रिवाज सोडीत नाहींत. दयानंदांच्या अशा ह्या वादविवादाचा तत्कालीन खिस्ती अंमलदार आणि पाद्री याच्यावर काहींतरी अनुकूल परिणाम होत असावासें दिसतें. किंवा कदाचित् तो काळच त्याच्या बाजूने जुळतें घेण्याचा असेल. तथापि तें काहीं असलें तरी त्याची जिज्ञासा व परमतसहिष्णुता हे दोन्हीही गुण प्रत्येकाचे ठिकाणीं केवळ दिखाऊच असतील असें म्हणवत नाहीं यास प्रत्यंतरादाखल एकच उदाहरण पुरे. दयानंदाच्या ऋग्वेदादि भाष्यभूमिकेच्या प्रथमावृत्तीच्या प्रकाशनाचा सारा खर्च लुधियानाचे ज्युडिशल कमिशनर मि० कारास्टिफन ह्यानीं आपण होऊन केला, हेच ते उदाहरण होय पाश्चात्यांची विद्याभिरुचि आणि त्याचा सारसग्राहक गुण ह्यांची दयानंदांस चांगलीच जाणीव होती ते म्हणत कीं, पौराणिकांच्या मतानें वेद शंखासुरानें नेले पण मी ते जर्मनींतून सारे शोधून आणले !

अशा रीतीनें कित्येक साहेबांबद्दल जरी दयानंदाना सहानुभूति असे, तरी व्याख्यानाला उभे राहिले कीं, ते हिंदु पुराणाबरोबर खिस्ती पुराणांचाही खरपूस समाचार घेत. त्याची वृत्ति अत्यंत निर्भीड व निर्भय असे. ते एकदां अवधूत स्थितींतच प्रवास करीत असतांना कोणी मडम—साहेबांनीं टीका केली. तेव्हां त्यांनीं

तुमच्या आदम ईव्हनीं कधीं कपडे घातले होते ? असा रोकडा जबाब विचारला. उलटपक्षीं ते एकदा त्याच्या चर्चमध्यें गेले असतां त्यांनी इतरांप्रमाणे शिरस्त्राण काढण्याचें नाकारलें. ते म्हणत, शिरस्त्राण काढणें हा आमचा शिष्टाचार नाहीं. दुसऱ्याचा आचार आम्हास काय कामाचा !

कोणीं त्यास म्हटले कीं, तुमच्या ह्या नेहमींच्या खडाजंगीमुळें कसलीच जोड न होता जिकडे तिकडे बिघाड मात्र वाढतो आहे; तर त्यास ते उत्तर देत कीं, "माझ्या मनात बिघाड करावयाचा नसून मिलाफ करावयाचा आहे. भिल्ल कोळ्यापासून तो ब्राह्मणापर्यंत सर्वांत एकच सामाजिक जागृति उत्पन्न करावी, हा माझा उद्देश आहे. परंतु सुधारणेवांचून हा मिलाफ व्हावा कसा ? म्हणून माझे हे खंडन केवळ लोकहितबुद्धीनेच आहे." ह्या महत्कार्यांत आपल्याला पं० बाळशास्त्री व स्वामी विशुद्धानंद यांची जोड मिळती तर काय बहार होती ! असेंही ते म्हणून दाखवीत. ह्या दोघा विद्वान् पुरुषांप्रमाणें स्त्रीजातीच्या उन्नतीसाठीं पंडिता रमाबाई ह्यांनीं अविवाहित राहून आपलें आयुष्य खर्चावें असेंही त्यांच्या फार मनांत होतें. व त्यासाठीं त्यांनी त्यांना अनेक वेळां सांगूनही पाहिलें. परंतु संन्यासापेक्षा गृहस्थाश्रमच जास्त उपकारक होतो हें तत्त्व अंगिकारणेंच रमाबाईंना अधिक सोईचें वाटलें. व त्यामुळे स्वामींची बरीच निराशा झाली. कारण कुशिक्षित पौराणिकांप्रमाणे अशिक्षित स्त्रियाही समाजाच्या अपकर्षास कारण होत आहेत असे त्यांचे मत होते. असो.

अशा रीतीनें इ० सन १८६४पासून १८९४पर्यंतच्या तीस वर्षांच्या दीर्घ कालांत धर्मरक्षा, गोरक्षा, आणि आर्यभाषा ह्यांसाठीं त्यांनी आपल्या मताप्रमाणे अविश्रांत परिश्रम केले. ह्या बाबतींत त्यांची असंख्य व्याख्यानें व संवाद झाले असतील. व्याख्यानाच्या आरंभीं पद्मासन घालून नेत्र मिटून ते प्रार्थना करीत. त्या वेळीं ते प्रणवाचा जो दीर्घ उच्चार करीत तो फारच गंभीर व कर्णमधुर असे. कोणत्याहि विवाद-प्रसंगीं एखादा कठीण प्रश्न अडल्यास ते ध्यानावस्थित होऊन तो सोडवीत. अशी त्यांची नेहमींची रीत सांगतात. विशेषकरून उत्तर हिंदुस्थानांत निरनिराळ्या पंथाभिमानी हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, जैन अशा अनेक वर्गांशीं दयानंदाचे छोटेमोठे कांहीं नाहीं तरी हजार शास्त्रार्थ झाले, असें म्हणतात. गंगोत्रीपासून रामेश्वरापर्यंत त्यांनीं पायीं प्रवास केला. त्यांच्या अवधूतदशेंत रोज ४० कोस त्यांची चाल होत असे. याप्रमाणें साऱ्या आयुष्यांत सुमारें दहा हजार मैल त्यांचा पायीं प्रवास

झाला असेल ! याशिवाय रेल्वेनें प्रवास झाला तो वेगळाच. ह्याप्रमाणें प्रवासांत नसता कधी खदिरागाराप्रमाणें तापलेल्या तर कधीं बर्फाप्रमाणें गारठलेल्या वाळूवर पडून त्यांनीं दिवसचे दिवस काढले ! मतामतांतरातील अज्ञान दूर करण्यासाठीं आणि वैदिक धर्माच्या प्रचारासाठीं त्यांनी हा जो दीर्घोद्योग केला तो "दयानद महाराजकी जय" अशा जयजयकाराच्या घोषणेत केला नसून लोकांचे शिव्याश्राप व दगडांचे वर्षाव हे सारे सहन करूनच त्यांनी केला निदान वीस एकवीस वेळा तरी त्याचा साक्षात् जीव घेण्याचाही प्रयत्न निरनिराळ्या लोकानी निरनिराळ्या तऱ्हानी केला ! पण ते त्या सर्व प्रसगातून निभावले त्या अत्याचाराबद्दल स्वामींनीं कोणावरही उलट कोर्ट-दरबार वगैरे तजविजी केल्याचे ऐकिवात नाहीं. ते म्हणत की, मी आर्यसमाजरूपी उद्यान तयार करणारा माळी आहे ह्या उद्यानांतील झाडांना खत घालीत असताना केव्हा केव्हा शेण राख धूळ आंगावरही पडणें अपरिहार्य आहे ! असा अदाज आहे की, त्यानी आपल्या धर्म-प्रचाराच्या प्रचड चळवळीत आपल्या विशिष्ट मतांचा ध्वनि पाच सहा कोट लोकांच्या कानावर घातला असेल इतकेच करून ते थांबले नाहीत तर अशा रीतीने त्यांनी जे विस्तृत आर्यजगत् निर्माण केले त्यातूनच त्यानी पुढें आर्यसमाज ही सघटनाही घडवून आणली त्यासबंधींचा विचार पुढील प्रकरणा करू

---

## प्रकरण सातवें

# आर्यसमाज

**समानो मन्त्रः समितिः समानी समानं मनः सहचित्तमेषाम् ॥**
**समानं मन्त्रमभिमन्त्रये वः समावेन वो हविषा जुहोमि ॥ २ ॥**

—ऋ० १०।१९१।३.

**समानी व आकूतिः समाना हृदयानि वः। समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥ ३ ॥**

—ऋ० १०।१९१।४ *

पेरणीनंतर लावणी, देश जिंकल्यानंतर प्रातरचना, सैन्यभरतीनतर संघटना' त्याचप्रमाणे दिग्विजयानंतर मठस्थापना ही क्रमप्राप्तच येते फक्त दक्षिण हिंदुस्थानाशिवाय सर्व हिंदुस्थानांत स्वामींनीं आपले शास्त्रार्थाचे दौरे काढून चोहोंकडे खळबळ उडवून दिली मागें लिहिल्याप्रमाणे हिंदुसमाजांत श्रेष्ठ गणलेल्या पंडित, पुराणिक, पुरोहित प्रभृति ब्राह्मण वर्गावरच त्याचा विशेष जोराचा मारा झाल्यामुळे, त्याचें गुरुत्व कमी होऊन आपत्कालीही त्याच्या आबदाबात असलेले हिंदु-समाजांतील खालचे वर्ग उसळून वर येऊ लागले दुर्लभ असलेला वेदोराशि आपल्या हातीं येणार ह्या भ्रामक लालसेनें हा नवीन उत्साह प्राप्त झाला. तिकडे बंगाल्यांत गळ्यात असलेलीं जानवीं तोडण्याची अहमहमिका सुरू असता इकडे उत्तर भारतवर्षात कर्मलोप झालेले शेकडों क्षत्रिय आणि वैश्य वगैरे नव-उपनीत मंडळी ठिकठिकाणी द्विजत्वाचा आनद उपभोगीत असल्याचा देखावा दिसूं लागला. रोजच्या पूजेचे देवच नदीस अर्पण झाल्यामुळें नित्य देवपूजेच्या आचाराच्या अभावी शून्यहृदय झालेल्या आर्यांस काहीं तरी धार्मिक आचार लावून द्यावयास पाहिजे होता. तो नसल्यामुळें कोठें कोठे खळबळ, अनवस्था व

---

***भावार्थ**—एकजुटीनें चला, एकमतानें बोला, तुमचीं मनें एकरूप असू द्या. हेतु समान, समाज समान, मन समान, त्याचप्रमाणें विचारही समान असोत. समान हेतूने व समान हवनाने पूजा करा, असें मी तुम्हांला सांगतो. तुमच्या मनांत सलोखा असावा, आणि तुमचे निर्णय एकमतानें व्हावेत. सर्वांच्या विचारांचें एकीकरण होऊ द्या. तेणेंकरून तुमच्यामध्यें सुखावह असा सलोखा नांदेल.

औदासीन्य हीं उत्पन्न झालीं असतां सर्वांना सुसंघटित करून त्यांचीं मनें सुस्थित करणें अत्यावश्यक झालें ज्याप्रमाणे उस्तरलेलें पाखें वर्षाकाळाच्या आंतच निस्तरावें लागतें, त्याप्रमाणें उच्छन्न केलेलें धर्मछत्र कोणत्या तरी तऱ्हेनें पुन्हा उभारावे लागलें. ह्या कामी त्यांना जुन्या धर्माभिमानी लोकांचे साहाय्य मिळणें शक्य नव्हतें ठिकठिकाणचे शास्त्री आणि पंडित हे त्याचे उघड वैरी होते. यामुळें जेथील लोक कट्टर धर्माभिमानी नाहीत, जेथें धर्माच्या बाबतीत विद्वत्ते पेक्षा औदार्य, कर्मठपणापेक्षां भावना, अभिमानापेक्षा सहिष्णुता अधिक आहे; अशींच स्थळे त्यानीं आपल्या कार्यक्षेत्रांकरितां निवडलीं त्या वेळी मुंबईसारखें साऱ्या हिंदुस्थानात दुसरें असें एकही शहर नव्हतें कीं, ज्यास धार्मिक इतिहासच नाही त्याचप्रमाणें पंजाबसारखा हिंदुस्थानात एकही प्रात नव्हता कीं, जेथें सस्कृतिसंकराच्या अनेक आवृत्त्या होऊन वैदिकधर्माची शुद्ध निष्ठा अगदींच लुप्त झाली होती हिंदभूचा हा फटफटीत भालप्रदेशच हिंदभूपतींचा अनेक परचक्रांनी झालेला नाश सूचित करीत होता त्या भालप्रदेशीं वैदिक निष्ठेचा तिलक लावावा आणि पूर्व व पश्चिम हिदुस्थानाकडे भूमातेच्या पसरलेल्या हातात (यज्ञ) कंकणें घालावी आणि अशा रीतीने फेनिक्स पक्ष्याप्रमाणें पुन्हा जीवमान होणाऱ्या स्वराज्य-सूर्यानें माळ घालण्यास तिला सन्मुख करावी, असा ऋषि दयानंद यांचा प्रयत्न होता या व अशा उद्देशानें जी पुढे घटना झाली त्याचा थोडा बारकाईनें विचार करू

ता. २९ जानेवारी सन १८७५ रोजी स्वामी पुन्हा दुसऱ्या खेपेस मुंबईस गेले. तेथें सुमारें साठ इसम दयानंदाच्या आर्यसमाजांत दाखल होण्यास तयार होते. कोणीएक पानाचन्द आनंदजी यास भावी सस्थेच्या नियमावलीचा मसुदा तयार करण्यास सांगितलें होतें. त्यावर तेथे दोन महिने भवति न भवति होऊन ता. १० एप्रिल १८७५ रोजीं गिरगांवांत डॉ० माणिकचदजींच्या बागेंत गिरधरलाल दयाळदास कोठारी, बी. ए, एलएल्. बी. यांच्या अध्यक्षतेखालीं पहिला समाज स्थापन होऊन त्यास 'आर्यसमाज' असे दयानंदानी पूर्वींच ठरविलेलें श्रेष्ठतावाचक शुभ नांव दिलें गेले. यासबधीं स्वामी लोकहितवादींस लिहिलेल्या पत्रांत लिहितातः—"आगे मुम्बईमें चैत्र शु॥ ५ (सवत १९३१) शनिवारके दिन संध्याके साडे पांच बजते आर्यसमाजका आनंदपूर्वक आरंभ हुआ। ईश्वरानुग्रहसे बहुत अच्छा हुआ।"

ह्या पहिल्याच सभेंत आर्यसमाजाची खालीलप्रमाणें नियमावली मंजूर झाली.

[१] लोकहितास्तव आर्यसमाज स्थापणें अत्यावश्यक आहे. [२] आर्यसमाज वेदास मात्र स्वतःप्रमाण मानील चार ब्राह्मणें, सहा वेदांगे, चार उपवेद, सहा दर्शनें आणि अकराशे सत्तावीस शाखा वेदाशीं अविरोधि असतील तर दुय्यम प्रमाण होत [३] प्रत्येक प्रांतानिहाय एक मुख्य आर्यसमाज आणि बाकीच्या त्यास जोडलेल्या शाखा समजाव्या [४] त्या शाखानी मुख्य समाजाप्रमाणें वर्तावे. [५] मुख्य समाजात संस्कृत आणि हिंदी भाषेंतील वैदिक साहित्य संग्रहित करावे. तसेच त्याने आर्यप्रकाश नामक एक साप्ताहिक चालवावे व त्यास इतर समाजानीं मदत करावी. [६] प्रत्येक समाजास एक प्रधान, एक मंत्री आणि बाकीचे स्त्री पुरुष सभासद असावेत [७] प्रधानानें समाजाची इभ्रत व मंत्र्याने दप्तर संभाळावे [८] समाजाचे सभासद सत्यप्रतिज्ञ, प्रामाणिक, शुद्धाचरणी आणि परोपकारी असले पाहिजेत. [९] प्रापंचिक सभासदाने सवडीनुसार प्रपंचापेक्षाही समाजाची काळजी अधिक घ्यावी ज्यास प्रपंच नाही त्यानी तर सर्वकाळ समाजाच्याच उत्कर्षासाठीं झटावें याहून अन्य तऱ्हेने त्यानीं वागू नये. [१०] प्रत्येक आठवे दिवशीं सभासदांनी नियमित रीतीनें समाज मंदिरात जमावें. [११] तेथें जमल्यावर शांतपणें विचारविनिमय करावा. नंतर सामवेदांतील ऋचा व दुसरी उद्बोधक पद्यें किंवा वैदिक प्रवचन असें आलटून पालटून करावे, [१२] प्रत्येक सभासदानें आपल्या प्रामाणिक आणि स्वकष्टार्जित प्राप्तीचा शंभरावा हिस्सा समाजास द्यावा. ज्यास्त दिल्यास उत्तमच. त्याचा विनियोग आर्यसमाज, आर्यविद्यालय, आर्यप्रकाश पत्र याशिवाय कोठे करू नये [१३] समाजनिधीकरिता व समाजधर्म प्रसाराकरिता जेवढा कोणी ज्यास्त झटेल तितका त्यास अधिक मान मिळेल. [१४] समाजानें वेदानुसार एक्या अशरीर ईश्वराची स्तुति (गुणवर्णन) प्रार्थना (सत्कर्मास मदत मागणें) आणि उपासना (ध्यान) करावी. [१५] समाजानें वैदिकसंस्कार करावेत. [१६] वेद आणि प्राचीन आर्षग्रंथाचें अध्ययन व अध्यापन करावें आणि स्त्री-पुरुषाची उन्नति होईल असें योग्य व सत्यज्ञान वेदानुसार द्यावे. [१७] स्वदेशहिताच्या दृष्टीनें प्रापंचिक व आध्यात्मिक ह्या दोन्ही सुधारणाकडे पूर्ण लक्ष ठेवावें. सर्व मानवी समाजाचें कल्याण होईल, अशा सुधारणा समाजानें हातीं घ्याव्या. [१८] समाजाची निष्ठा खऱ्या आणि न्याय्य अशा वैदिक धर्मावरच राहावी. ती निष्ठा पक्षपाती नसून प्रत्यक्षादि प्रमाणांच्या निर्णायक कसोटीस उतरेल

अशी असावी. याशिवाय शक्यतों दुसऱ्या कशावरही समाजाची निष्ठा असू नये. [१९] विद्वान् आणि सन्मान्य असे प्रचारक सत्याच्या प्रचाराकरिता समाजानें चोहोंकडे पाठवावे [२०] मुला मुलींच्या शिक्षणाकरिता वेगवेगळ्या शाळा काढाव्या व या शाळातून शिक्षक व सेवक ठेवावयाचे ते मुलाकरिता पुरुष व मुलीं करिता सर्व स्त्रियाच असाव्या [२१] शाळा अध्यक्षाच्या हुकमतीत राहाव्या. [२२] समाजाच्या सर्व सभासदानीं शुद्ध अतःकरणाने एकमेकावर आत्मवत् प्रेम करावे. [२३] कोणत्याही गोष्टींचा सत्य, न्याय, सर्वोपकार इत्यादि दृष्टीनी पुरा विचार करून जें ठरेल तेंच समाजाच्या सर्व सभासदानी मानावें [२४] जे या तत्त्वाप्रमाणे वागतील आणि जे सद्गुणी व पुण्यशील असतील, त्याचा समाजाच्या श्रेष्ठवर्गात अंतर्भाव व्हावा. इतराचा कनिष्ठवर्गात समावेश करावा. त्यांत जे पापी व दुर्वृत्त असतील त्यांस वरिष्ठाच्या विचाराने समाजातून काढून टाकावें. [२५] सभासदानीं आर्यसमाज, आर्यविद्यालय आणि आर्यप्रकाश याच्या उत्कर्षासाठीं झटावे. [२६] आर्यसमाजाने नोकर ठेवणे तो शक्यतों आर्य-समाजीच ठेवावा. [२७] दानधर्म करण्याच्या हरएक प्रसगी समाजाला देणगी द्यावी [२८] या नियमात दुरुस्ती करणे ती समाजातील श्रेष्ठानीं सर्व सभासदास अगोदर कळवून मग करावी ही तत्त्वे ज्या अनुक्रमानें आर्यांच्या इतिहासात आहेत त्याच अनुक्रमानें येथे दिली आहेत

याप्रमाणें मुबईचा आर्यसमाज दयानदानी नियमबद्ध केला. त्याचप्रमाणें पुण्यासही एक आर्यसमाज स्थापून त्याचे माधवरावजी रानडे हे प्रधान, केशव-राव गोडबोले मत्री, प्रार्थना समाजी सर्व, तसेंच "बाबा गोखले," "काशिनाथ गाडगीळ" गगाराऊ भाऊ, "वगैरे लष्करची ६०।७० मडळी समासद, ह्याप्रमाणें योजना केली सातारचे कल्याणराव खजाची आणि कृ णराव विंचुरकर जज्ज, तसेंच अहमदाबादचे गोपाळराव हरि, भोलानाथ साराभाई, महिपतराम वगैरे मंडळीच्या मागेंही अनुक्रमें सातारा व अहमदाबाद येथें आर्यसमाज स्थापन करण्याचा स्वामींचा लकडा होताच स्वामी वसईसही गेले होते. पुढें ते लाहोरास गेले. तेथें दोन महिन्याच्या अवधींत त्यानीं पंजाबी लोकावर जो परिणाम केला, तो वायव्यप्रातांत बारा वर्षें खटपट करूनही झाला नव्हता. पंजाबाची भूमिका अगोदरच नरम आणि त्यात पूर्वी नानकानें व त्यानंतर अलीकडे ख्रिश्चन मिशनरी आणि शिवनारायण अग्निहोत्रि प्रभृति ब्राह्मांनीं बरीच

पूर्व तयारी केली होती. दयानंदांचें धर्मसुधारणेचें कार्य पंजाबी लोकांनीं मुंबई-करांपेक्षांही फार जलद अंगीकृत केलें, याबद्दल त्यांस फार अभिमान वाटतो. लाहोरला दुसरी कोठेंच जागा मिळेना म्हणून डॉ० रहिमखान याच्या कोठींत स्वामींचा मुक्काम होता. स्वामींचा मूर्तिपूजाविरोध सनातनी लोकास मानवत नव्हता आणि त्यांचें वेदाचें अपौरुषेयत्व आणि पुनर्जन्मवाद हीं ब्राह्मास पटणें शक्य नव्हतें. यामुळें पंजाबच्या ज्या पुढाऱ्यानीं प्रथम त्यांचें सन्मानपूर्वक स्वागत केलें, त्यानाच पुढें हे पाहुणे अप्रिय होऊन सोडून द्यावे लागले तेव्हां योगायोग असा कीं, एका मुसलमान डॉक्टराच्या घरीं या वैदिक-समाजाची स्थापना ता २४ जून सन १८७७ रोजी झाली. मुंबईच्या आर्यसमाजाची प्राणप्रतिष्ठा माणिकचंद डॉक्टरांकडेच झाली आणि मुंबई–प्रार्थनासमाजाचा जन्मही-डॉ० आत्मारामदादाकडेच झाला डॉ० विश्राम रामजी हे जोतिबा फुल्यांचे आणि डॉ० भाऊ दाजी हे आद्यधर्मसुधारकाचे पुरस्कर्ते होते यावरून डॉक्टर म्हणजे भवरोगचिकित्सक विद्वान् असाही त्याचा द्व्यर्थी प्रयोग होतो त्याची सार्थकता दिसते ह्या कामीं लाला साईदास आणि लाला जीवनदास हे दोघे सरकारी ट्रॅन्स्लेटर आणि लाला मुलराज हे एक जिल्हा न्यायाधिकारी ह्यांनीं पुढाकार घेतला होता. ब्राह्म आणि इंग्रज याच्या विचाराशीं विशेष रुळलेल्या ह्या विद्वांनाना मुंबईच्या आर्यसमाजानें केलेले नियम फारसे पसंत पडले नाहींत. त्यांनीं नवीन सुटसुटीत दहाच नियम तयार केले व तेच आजपर्यंत मुंबईसुद्धां सर्व आर्यसमाजांत रूढ आहेत. ते नियम असेः—

[१] सर्व सत्यविद्या आणि सत्यविद्येनें जे पदार्थ जाणले जातात, त्या सर्वांचा आदिमूल परमेश्वर आहे.

[२] परमेश्वर सच्चिदानंदस्वरूप, निराकार, सर्वशक्तिमान्, न्यायी, दयाळु, अजन्मा, अनन्त, निर्विकार, अनादि, अनुपम, सर्वाधार, सर्वेश्वर, सर्वव्यापक, सर्वान्तर्यामी, अजर, अमर, अभय, नित्य, पवित्र आणि सृष्टिकर्ता आहे त्याचीच उपासना करणें योग्य आहे.

[३] वेद हा सत्यविद्यांचा ग्रंथ आहे. वेदाचें अध्ययन, अध्यापन, वेदाचें श्रवण आणि कीर्तन हा सर्व आर्यांचा परमधर्म आहे.

[४] सत्याचें ग्रहण आणि असत्याचा त्याग करण्यांत मनुष्यानें सर्वदा तत्पर असले पाहिजे.

[५] सर्व कर्मे सत्यासत्याचा विचार करून धर्मानुसारच केलीं पाहिजेत.

[६] जगावर उपकार करणें म्हणजे प्रत्येक व्यक्तीची शारीरिक, आत्मिक व सामाजिक उन्नति करणें हा आर्यसमाजाचा मुख्य उद्देश आहे.

[७] सर्वांबरोबर प्रीतिपूर्वक धर्मानुसार यथायोग्य वर्तन ठेवावें.

[८] अविद्यानाश आणि विद्याभिवृद्धि केली पाहिजे.

[९] प्रत्येकानें आपल्याच उन्नतींत सतुष्ट न राहता सर्वाच्या उन्नतीतच आपली उन्नति समजली पाहिजे.

[१०] सामाजिक सर्व हितकारी नियम पाळण्यात सर्व (बहुमताला) परतंत्र आहेत आणि व्यक्तिहिताचे नियम पाळण्यात सर्व स्वतत्र आहेत

मुबईला जी मूळ आर्यसंघटना झाली व जिची शुद्ध केलेली आवृत्ति लाहोरास निघाली, त्या सघटनेच्या कर्तृत्वाचे वाटेकरी कोण कोण होते, ही गोष्ट आज तरी पडद्याआडची होऊन पूर्णपणें समजणे अशक्यच झाले आहे दयानद–प्रकाश-कार म्हणतात, की मुबईची नियमावली दयानदाची नसून मुबईकर पारख यांनीं तयार केली होती. तसेंच दुसऱ्या नियमावलीचा कर्ता करविता कोणी असो; पण त्या नियमातील नियम तिसरा गाळल्यास आपण आर्यसमाजांत दाखल होऊं असें ब्राह्माचें म्हणणे होतें. आणि सत्यविद्या या शब्दांपैकीं सत्य शब्द गाळावा व नियम अधिक व्यापक करावा असा मूळराज याचा विशेष आग्रह होता पण दोन्ही सूचना स्वामींनीं मानल्या नाहींत तथापि दयानंदांनीं आपल्या सत्यार्थ-प्रकाशांत आदर्शभूत मानलेल्या दशावर-परिषद्, त्र्यवरा-परिषद्, धर्मसभा, विद्यासभा, राजसभा इत्यादि सस्थांच्या रचनेशीं आर्यसघटनेचा असावा तसाही मेळ दिसत नाहीं यावरून कांहीं विशिष्ट उद्दिष्टाचे सिद्ध्यर्थ आपल्या सभोंवारच्या लोकांच्या प्रभावळीस दयानदास वश व्हावें लागले असावे असें दिसतें, हिंवतापाच्या प्रांतांत ज्याप्रमाणें डॉक्टर लोक येनकेनप्रकारेण क्विनाईन चेपतात, त्याप्रमाणें वेदविद्येचा खडखडाट झालेल्या मुंबई, लाहोर वगैरे शहरांतील बहात्तर रोगांवरील ही वैदिक निष्ठेची मात्रा एवढी तुम्ही संभाळा, मग त्यास अनुपान आणि पथ्य हें तुमच्या रुचीप्रमाणें आणि परिस्थितीप्रमाणे तुम्ही वाटेल तें ठरवा; असेंच दया-नंदांनीं सागितलेलें दिसतें. मात्र ही त्याची वैदिक निष्ठा कांहीं ब्राह्म लेखकांच्या म्हणण्याप्रमाणे त्यांनीं कामापुरती अंगिकारलेली युक्ति नसून वेदांवर त्यांची खरी

खरी भक्ति होती, याबद्दल आम्हांला तरी शंका वाटत नाहीं. आणि म्हणूनच ही अमृतोपम वेदविद्या सर्वांना सारखीच सुलभ व्हावी, हीच एक महत्त्वाकांक्षा त्यानीं बाळगली. यात वेदाबद्दल असाधारण आदर आणि मनुष्यमात्राविषयीं अनुकपा या दोन्हीही गोष्टी आढळून येतात, पण त्यातही शक्य तर सारे जग वेदानुयायी व्हावे व एकछत्राखाली नादावे अशी त्याची इच्छा अधिक प्रबल दिसते त्यानी असे पाहिले की, हिंदुस्थानातील बहुतेक सर्व पथाच्या बुडाशीं वैदिक निष्ठा ही आधारभूत आहेच व्युत्पत्तिशास्त्राच्या खोल दृष्टीने त्यास असें आढळून आले की, आधुनिक काळातील भौतिक आणि आध्यात्मिक ज्ञान विज्ञानाच्या सर्व कल्पना वेदात बीजरूपाने आहेत इतकेच नव्हे तर, परकीय भाषातील शब्दांचे मूल धातुही वेदातच आहेत ह्यावरून जगातील सर्व धर्म व भाषा अथवा अखिल मानवी ज्ञान वेदमूलक आहे, हे सप्रमाण सिद्ध करता येईल, त्याच वेळीं भूगर्भातील पुराणवस्तुसशोधकानी असे सिद्ध करीत आणले होतें की, जगाची प्रगति अज्ञानातून ज्ञानाकडे होत आहे ही उत्क्रान्तीची कल्पना अगदीच चुकीची आहे उलटपक्षी अनेक देशात अपक्रान्तीच झाली, असे पुराणवस्तुसशोधनावरून दिसू लागले अशा अनेक कारणास्तव इतिहासपूर्वकालचे जगाचे आद्य-वाङ्मय असे जे वेद ते सर्वमान्य होतील, अशा भरवशाने वेदनिष्ठा ह्या एकाच गोष्टीस त्यानी विशेष महत्त्व देऊन जेणकरून अधिकात अधिक लोक वेदनिष्ठ बनतील अशी समाजरचना करण्यास समति दिली, असें दिसते त्या वेळी दयानदाच्या सभोवार लाला मूळराज एम ए प्रभृति आग्लविद्याविशारद मडळी होती मिल्ल आदिकरून पाश्चात्य तत्त्वज्ञाच्या त्या भक्ताची भिस्त सत्य, परोपकार आणि स्वातत्र्य अशा ठळक, नीति–तत्त्वावरच होती त्या तत्त्वास धरूनच त्यानीं रचना केली ती बुद्ध्या इतकी साधी केली की, त्यात साऱ्या हिंदूसच काय पण अहिंदूसही समाविष्ट होण्यास हरकत वाटू नये. या धोरणास अनुसरून त्यानीं मुबईच्या नियमातली कित्येक तपशिलाचीं कलमें तर गाळलीच;पण नवीन नियमातील पहिलाच नियम असा व्यापक आणि सग्राहक केला की, त्याबद्दल कोणाचा वादच नसावा. दुसऱ्या नियमाने ईश्वर हा परमपुरुष आहे, ही ईश्वरवादी जगाची कल्पना घेऊन एका अद्वैती वेदान्त्याशिवाय बाकी सर्वांचे समाधान केलें. वेदान्तीही ईश्वर हा सगुणच मानीत असल्यामुळें त्याचाही वरील नियमास विरोध येण्याचा संभव नव्हता. तिसरा नियम हाच काय तो साप्रदायिक आहे.

पण ह्याही मुबईच्या नियमापेक्षा बराच साधा केला आहे. शिवाय वेदांस जरी साप्रदायिक ग्रथ ठरविलें तरी त्याबरोबर वेदावर दयानंदांनीं केलेले भाष्य किंवा त्याचा सत्यार्थप्रकाश हे ग्रथ प्रत्येक आर्यानें प्रमाणभूत मानले पाहिजेत, असा त्यात आग्रह ठेवला नाही चवथा व पाचवा हे नियम जरी साधेच आहेत, तरी सत्यासत्याचा निर्णय वेदानुसार केला पाहिजे असे सागण्यात विवेकवाणी अथवा तर्क यांच्या स्वतंत्र महत्त्वास वेदानुकूलतेची मर्यादा घातली आहे आणि दहाव्या नियमात 'महाजनो येन गतःस पथा' ह्या सिद्धान्ताचा अनुवाद आधुनिक लोकशाही (Democracy) आणि व्यक्तिस्वातन्त्र्य या दोन्ही तत्त्वास सभाळून करण्याचा प्रयत्न केला आहे तो असा की, सामाजिक आचार-धर्माच्या बाबतीत समाजाचे नियंत्रण पत्करावें पण व्यक्तीच्या आचरणाच्या बाबतीत ज्याने त्याने आपले हिताहित ठरविण्यात पूर्णपणे स्वातन्त्र्य घेण्यास हरकत नसावी अशा समयी बहुमताने बाधले न राहता वाटल्यास स्वतःच्या वेदानुकूल तर्काने वागावें. तात्पर्य, कोणत्याही जातीचा, धर्माचा अगर अधिकाराचा मनुष्य असो, त्यास पटतील आणि मानवतील असेच साधे नियम करून, प्रत्येकाला आपल्यापुरते मतविश्वासात आणि आचार-धर्मात बरेच स्वातन्त्र्य ठेविले पण अशा रीतीने नियमात जितका जितका मोकळेपणा आणि साधेपणा ठेवावा तितका तितका त्याचा सप्रदाय वाढविणे अधिक कठीण जातें हिंदुधर्माची तत्त्वे अत्यत व्यापक व उदात्त आहेत, यामुळेच या धर्मात इतर धर्माप्रमाणे साप्रदायिक किंवा राष्ट्रीय अभिमान व जूट उत्पन्न होत नाही, असे इग्रज ग्रथकार म्हणतात त्याचा प्रत्यय आर्यसमाजींना लवकरच आला तेव्हा वरील दहा नियमानींच न भागता, दयानदाची मते तीच आर्यांचा धर्म असे साप्रदायिक धर्म प्रचारार्थ त्यास म्हणणे भाग पडू लागले त्याचप्रमाणे वरील नियमापैकी बहुमताच्या दहाव्या नियमाने दुसरी एक आपत्ति त्याच्यावर आली ती अशी कीं, वरील नियमात अधिकारवाद समूळ नाहीसा झाल्यामुळें समाजाचे नियत्रण धर्मशास्त्रज्ञ अशा विद्वान् गृहस्थाच्या हातीं न राहता बहुसख्याक अशा अजाण व बेजबाबदार लोकाच्या हातीं जाऊ लागले ह्या आपत्तींतून ते अजूनही पार पडले नाहीत, पण धर्मनिर्णय बहुमताने होणे ही आपत्तिच नव्हे तर ती इष्टापत्तिच आहे असेही कित्येक आर्य आज मानीत आहेत.

असो. ह्याप्रमाणे लाहोरच्या नियमाची थोडक्यात मीमासा आहे. उदार-मनस्क पंजाबी लोकाबद्दल कोणीं काहीं म्हटले तरी तेथेंही आर्यसमाजाची

स्थापना होणें ही गोष्ट अगदींच सोपी नव्हती त्या गोष्टीनें लाहोरच्या समाजांत मोठीच खळबळ उडवून दिली. डॉ० खानाच्या कोठींत ह्या नूतन आर्यसमाजाची सभा होणें अप्रशस्त वाटून दुसरीच साप्ताहिक बैठक सत्सभेच्या आवारात झाली. परतु मुसलमानाच्या कोठींत बसून इस्लामी धर्माविरुद्ध टीका करण्यास जसे स्वामी कचरले नाहींत, त्याचप्रमाणें सत्सभेच्या आवारांत पौराणिक धर्मावर कडक टीका करतांना त्यांनीं मागेपुढे कांहीं विचार केला नाहीं. त्याचा परिणाम म्हणून त्यास ती जागा तावडतोब सोडावी लागली अशा रीतीने विरोधाचा जोर जरी कमी नव्हता, तरी सुरुवातीस तीनएकशे सभासद त्यानी मिळविले त्यांपैकीं सुमारे वीसबावीस इसमाचे कार्यकारी मडळ होतें त्यात लाला मूलराज हे समाजाचे प्रधान व लाला साईदास हे समाजाचे मत्री होते समाजाचे सरक्षक पद स्वामींनीं स्वीकारावें असा नूतन साप्रदायी मडळींचा स्वाभाविकच आग्रह होता पण स्वामींनी तें नाकारले ते म्हणाले “ मी समाजाचा एक प्रमुख होणे म्हणजे एक तऱ्हेनें गुरुपदच स्वीकारणें आहे पण हें मला नापसंत आहे. हें गुरूचे बड मोडण्याचा तर माझा प्रयत्न आहे ” आर्यसमाजाचे परमसाहाय्यक ही पदवीही त्यांनीं अशाच कारणास्तव नाकारली. ते म्हणाले, “ मला तुम्ही परमसाहाय्यक ठरविले, मग परमेश्वराला काय म्हणाल ? ” तात्पर्य, स्वामी दयानदानीं लाहोर सोडल्यावर अमृतसर, गुरुदासपूर, जालन्धर, फीरोजपूर छावनी, रावळपिंडी, गुजरात, वजीराबाद, गुजराणवाला, मुलतान छावणी, अशा अनेक ठिकाणीं सचार करून आर्यसमाज स्थापन केले, पण स्वत:च्या महतीची आकाक्षा कोठेही ठेविली नाहीं इतकेंच काय, पण त्यांनीं मरणापूर्वी कविराज श्यामलदास याच्याजवळ असें बजावून सागून ठेविले होतें की, माझ्या निर्याणानतर माझ्या अस्थि एखाद्या शेतामध्यें पुरून टाका समाधि-वृंदावनादि कोणतेंच स्मारक करू नका हीं स्मारकें म्हणजे मूर्तिपूजाच होय असले मूर्तीचे देव्हारे मला मुळीच पसत नाहीत

स्वतांच्या व्यक्तिमाहात्म्याबद्दल स्वामी दयानंदाचे जरी असे विचार होते, तरी वास्तविक त्याच्या व्यक्तिमाहात्म्याचीच छाप लोकांवर अधिक पडत होती. त्यामुळें त्यांना पूज्य मानणारा अनुयायीवर्ग आर्यसमाजाच्या खास सप्रदाया-बाहेरही वाढत होता. मॅडम ब्लॅव्हाटस्की व कर्नल आल्कॉट हे थिऑसफी सस्थेचे सस्थापक, ब्रह्मानंद केशवचंद्र सेन हे नवविधान पंथाचे उत्पादक, रा० ब० माधव-

रावजी रानडे, गोपाळराव हरि देशमुख व शेठ भोलानाथ साराभाई हे प्रार्थना-समाजाचे अध्वर्यु, पंडिता रमाबाई ही शारदासदनाची जननी, रेव्ह० स्कॉट हे सुप्रसिद्ध पाद्री, इटाव्याचे भीमसेन शर्मासारखे पंडित, सर सय्यद अहमद व ईश्वरचंद्र विद्यासागर असे सुधारक, अशा बऱ्या वजनदार आणि विद्वान् मंडळी-वर दयानंदांची छाप बसत होती

उत्तर हिंदुस्थानातील कित्येक लोक तर स्वामी दयानंद हे एक मोठे गरिबाचे वालीच ईश्वरानें निर्माण केले, असे मानीत होते त्या वेळी ख्रिस्ती पाद्री आणि मुसलमान मौलवी यांचा हिंदूंना वाटाविण्याचा क्रम जोराने सुरू होता त्यांच्या जाळयातून दयानंदांनी पुष्कळांना सोडविले वैदिक धर्माचे महत्त्व लोकांच्या नजरेत आणून त्यांचे डोळे त्यांनी उघडले आर्यसमाजी लोक मोठ्या अभिमानाने म्हणतात का, " ऋषि दयानंदाने जहा एक ओर आर्यजाति कि पीठ परसे पत्थर और पोथी का उठाकर उसकी कमर सीधी करदी वहा दूसरी ओर पादरियो और मौलवियो के तीरो के रोकने के लिये तर्क की ढाल खडी करदी." अशा रीतीने एकीकडे मूर्तिपूजा व व्रतवैकल्ये यांच्या दडपणातून हिंदुसमाजास मोकळे करीत असता दुसरीकडे हिंदुधर्मावर परधर्मीयांकडून होत असलेल्या आक्रमणाला हिंदुधर्माच्या तटाआड उभे राहून त्यांनी रोखून धरले व उलट त्या तटाचे दरवाजे आपणच खोलून प्रतिपक्षीयांवर प्रत्याक्रमण करण्यासाठी दयानंदांनीच प्रथम शिंग फुंकले ! ह्या चढाईच्या लढाईत ते एका हाताने परधर्मीयांच्या मर्मस्थळांवर बेधडक घाव घालीत होते आणि त्याजबरोबर तर्काची ढाल हाती घेऊन वेदांत भौतिक विज्ञान, राजनीति, इत्यादि आधुनिक पाश्चात्य जगातील नव शिक्षितांचे डोळे दीपावणाऱ्या गोष्टीही बीजरूपाने कशा खचून भरलेल्या आहेत, हेंही दाखवून प्रतिपक्षीयांचे निंदाव्यंजक वार ते चुकवीत होते असे हे क्षत्रियवृत्ति अंगात मुरलेले स्वामी क्षात्रतेजाचे आगर म्हणून प्रसिद्ध असलेल्या राजस्थानात गेले तेव्हा, पूर्वी जे लोक वीर, मानधन आणि स्वावलंबी म्हणून गाजलेले होते, तेच आता व्यसनाधीन आणि विलासी होऊन इंग्रजांचे बगलबच्चे झाले आहेत, अशी दुःस्थिति पाहून, ज्या दयानंदांच्या डोळयांना मातापिता यांच्या निधनवार्तेनेंही पाणी आले नाही, त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहू लागल्या ! व त्या दुःखावेगात त्यांनीं स्वामी आत्मानंद यांचेजवळ अशी प्रतिज्ञा केली की, ब्रह्मचर्याच्या नाशानेंच भारतवर्षाचा नाश झाला आहे. अर्थात् ब्रह्मचर्याच्या उद्धारानेच देशोद्धार होणार आहे. यास्तव चितोडगडचे गुरुकुल बनविण्याची माझी महत्त्वाकांक्षा आहे.

हे कार्य करताना 'राजा कालस्य कारणम्' हें तत्त्व दयानदांना पटलें असल्या-मुळे त्यानी मुद्दाम प्रयत्नाने उत्तर हिंदुस्थानातील राजे राजवाडे यांवर आपली छाप टाकण्याचा विशेष प्रयत्न केला आणि त्यात थोडेंफार यशही आलें चितोड किंवा उदेपुर हे राजस्थानचें शिरोभूषण आहे शौर्य आणि स्वाभिमान या कसोटीस राजस्थानापैकी ते एकच संस्थान शेवटपर्यंत टिकले इस्लामी दिल्ली-पतीशी सोयरिक जोडण्याचा मोह त्या एकट्याच संस्थानाने झिडकारला होता, पण या त्याच्या स्वाभिमानाचे केंद्र म्हणजे मेवाडच्या रियासतीचे कुलदैवत श्रीएक-लिगजी हेंच होते बाप्पा रावळ हे श्रीएकलिंगजीचे कट्टे उपासक होते मराठी राज्याचे संस्थापक श्रीमन्छत्रपति शिवाजीमहाराज यांची जशी देवी भवानी त्याच-प्रमाणे मेवाडच्या राज्याच्या संस्थापकाचें कुलदैवत श्रीएकलिंगजी हें होय. संस्थानचे मालकच श्रीएकलिंगजी राजा हा केवळ त्या संस्थानचा सेवक. अशी पूर्वपरपरा असल्यामुळे, त्या संस्थानचे महाराणा सज्जनसिंह हे जरी स्वामींचे चेले झाले तरी त्यांनाही आपल्या कुलपरंपरेशीं विरोध करणे जिवावर आले त्यानी स्वामींस हात जोडून प्रार्थना केली कीं, "आपला बाकी उपदेश ठीक आहे. पण देशकालानुसार मूर्तिपूजाखंडन सोडून आपण श्रीएकलिंगेश्वराचे महंत होण्याचें स्वीकाराल, तर लाखों रुपयाच्या उत्पन्नाचे आपण अधिकारी व्हाल आणि मलाही पडलेला पेंच दूर होईल" महाराण्याच्या ह्या विनंतीचा स्वामींना अतिशय संताप आला आणि ते रागाने म्हणाले कीं, "असल्या लहान-शा रियासतीच्या मोहानें मी ईश्वराच्या आणि वेदाच्या आज्ञाचें उल्लंघन कधींच करणार नाही" तेव्हा महाराण्याचा निरुपाय होऊन त्यानी स्वामींची क्षमा मागितली आणि अखेर श्रीएकलिंगजी आणि नाथद्वार या प्राचीन आणि सुप्रसिद्ध अशा देवस्थानाच्या धार्मिक सत्तेतील मेवाडप्रांताच्या राजधानीतच मूर्तिपूजा-भंजक दयानदाच्या अवतारकार्याची पूर्णता त्याचे पश्चात् कशी व कोणीं करावी त्याबद्दलचें त्याचे अखेरचें व्यवस्थापत्र तयार झालें ! या व्यवस्थापत्रात सर्व आर्यसमाजाचें संगठन व्हावे, वैदिकधर्माचा प्रचार स्वदेशात व स्वदेशाबाहेर व्हावा, त्याचप्रमाणें दयानदांच्या ग्रंथाचा प्रसार अधिक जारीनें व्हावा आणि आर्यावर्तातील अनाथास आणि गरिबास विद्या आणि आश्रय मिळावा, अशा अनेक हेतूंनीं 'परोपकारिणी सभा' या नांवाची आणखी एक संघटना त्यांनीं निर्माण केली स्वामींनीं आपला छापखाना, पुस्तकें, पैसा व वस्त्र-पात्रादि सर्व

जिंदगी वरील कार्याकरितां त्या सभेचे स्वाधीन केली. या परोपकारिणी संस्थेचे तेवीस सभासद स्वामींनीं नेमले. त्यांत ठिकठिकाणचीं वजनदार माणसें होतीं. सभेचे अध्यक्ष मेवाडचे महाराणा श्रीसज्जनसिंग हे होते उपाध्यक्ष लाला मूलराज हे एक बडे सरकारी अमलदार आणि लाहोरच्या आर्यसमाजाचे अध्यक्ष, हे होते इतर सभासदांत कित्येक रावराणे, कवि आणि महाराज, लाला आणि बाबू यांच्याबरोबर मराठी वाचकांचे परिचित असे मुंबईच्या आर्यसमाजाचे अध्यक्ष रा० ब० गोपाळराव हरि देशमुख तसेच न्या० रानडे आणि पंडित शामजी कृष्णवर्मा हे होते.

अशा रीतीने उदयपुरात आपल्या पश्चात्‌ही आपल्या अंगीकृत कार्याची नीट संगति स्वामींनी लावून दिली जी उदेपूरची राजसत्ता दिल्लीपतीसही अखेरपर्यंत नमली नाही ती स्वामींच्या पायाशी नम्र झाली उलट स्वामींनींही महाराण्याचा योग्य तो मान ठेवला अशी ही शिवाजी आणि रामदासाची सज्जनगडावरील जोडी सज्जनसिंहाच्या चितोडगडावर दिसू लागली, पण धर्मसंस्थापनेचें कार्य अपुरेंच टाकून जसे त्या महाराष्ट्रीय जोडीस जावें लागलें, तोच प्रकार येथेंही झाला फक्त अनुक्रमात व्युत्क्रम झाला तो इतकाच की, या वेळी शिष्यराजाच्या अगोदर स्वामी गेले!

स्वामी मोठ्या संतोषानें ता १ मार्च १८८३ रोजीं उदेपुराहून निघाले ते जोधपुरास गेले उदयपुरास जी संघटना बनली तिची विघटना करण्याचें पाप जवळ जवळ तितक्याच दर्जाचे जोधपुराच्या माथीं आले एका अर्थी ही इतिहासाची पुनरावृत्तिच झाली मागें एकदा उदयपुरच्या लाखा राण्याच्या कारकीर्दीत श्रीरघुवीर हे अत्यंत साधुवृत्तीचे राजपुत्र जोधपुरास गेले असता त्यास कपटानें विषारी पोषाख घालण्यास देऊन त्याचा जोधपुरानें अमानुषरीतीनें बळी घेतला होता! तोच दुःखद प्रकार पुन्हा घडून आला! लोक नको नको सांगत असतां स्वामी जोधपुरास गेले जोधपुरचे त्या वेळचे महाराजे इतर कित्येक संस्थानिकांप्रमाणें व्यसनाधीन व विषयासक्त होते त्यांची स्वामींवर निष्ठा बसली खरी; पण तेवढ्यानें त्याची विषयासक्ति सुटली नाहीं एक दिवस महाराजांच्या भेटीसाठीं स्वामी त्याच्या वाड्यांत गेले. त्या वेळीं महाराजांची स्वारी 'नन्ही जान' नामक एका विधर्मी रखेलीशीं क्रीडा करीत बसली होती स्वामी आले असें कळतांच त्या रखेलीस मेण्यांतून घालून दृष्टिआड करण्याची त्यांची मोठीच तारांबळ उडाली!

त्या अंतःपुरांत आयत्या वेळीं चौघे भोई तयार कोठचे ? मग महाराजांनींच त्या वेश्येचा मेणा खांद्यावर घेतला इतक्यांत स्वामी आंत आलेच. तो लज्जास्पद प्रकार पाहताच स्वामी संतापानें लाल झाले आणि क्रोधाविष्ट होऊन म्हणाले की, "तू राजसिंह बेशरमपणानें ह्या बाजारच्या कुत्रीशीं शृंगारचेष्टा करून कोणती प्रजा निर्माण करणार आहेस ! !" अशा अर्थांचे धिक्काराचे उद्गार काढून ते तेथून तडक निघून गेले. परंतु त्या एकलहरी आणि चढेल अशा नागिणीच्या विषयलालसेच्या शेपटीवर हा जो शब्दाघात झाला. त्यांनी अखेर परिणाम केल्यावांचून सोडला नाहीं असे सांगतात की, त्या कुलटेनें पैसे चारून स्वामींचे तैनातींतील आचारी आणि वैद्य यास आपल्या क्रूणकारस्थानास वश करून घेतलें. आणि एका रात्री स्वामींना विषारी दूध पाजण्यात आलें * त्याचा घोर परिणाम लवकरच जाणवूं लागल्यामुळे स्वामीस शंका आली त्यांनी आपल्या जगन्नाथ आचार्यास त्यावरून दरडावून विचारलें स्वामींच्या तेजस्वी मूर्तीपुढे आपलें घोर पाप झाकणे त्यास अशक्य होऊन स्वामीस आपण विष पाजलें असें तोच ओकला ! स्वामी दयानंदच ते ! त्यांनी पाहिलें की, त्या मोठ्या जगन्नाथाचीच ही इच्छा या खोट्या जगन्नाथाने पुरी केली ! त्यांनी त्या घोर अपराध्यास क्षमा केली इतकेंच नव्हे, तर प्रवास खर्चाला पदरचे पैसे देऊन बचावासाठीं ताबडतोब दूर नेपाळांत लावून दिलें या विषारामुळे स्वामींना अत्यंत घोर शरीरयातना भोगाव्या लागल्या ! त्यांच्या सर्व अंगभर ते भयंकर विष उतून निघालें ! याशिवाय त्यास अतिसारादिही निरनिराळे विकार उद्भवले अनेक इलाज केले स्थानांतर करावें म्हणून प्रथम अबूला आणि मग अजमेराला स्वामी गेले. पण यत्किंचित्‌ही उतार पडेना शरीराला असह्य पीडा होत असताही त्यांची छटा त्यांच्या चेहऱ्यावर यत्किंचित्‌ही दिसत नव्हती ! त्यांची ती अढळ शांति पाहून पाहणारास अत्यंत आश्चर्य वाटे !

---

* गेल्या शताब्दीच्या उत्सवांत मेवाडचे शाहापुराधीश ह्यांनी दयानंदाच्या समागमाबद्दल स्वतांची माहिती सांगत असतां आपल्या भाषणांत असें सांगितलें की, ही एक निराधार दंतकथा [ स्वामीजी को विष दिया गया यह बात गलत है । ] असून स्वामींना मरण स्वाभाविकच आलें. पण आर्यवाङ्मयांत विषबाधेचीच हकीगत सर्वत्र प्रसिद्ध आहे.

या अखेरच्या प्रसंगीं लाहोराहून लाला जीवनदास आणि पंडित गुरुदत्त हे स्वामींच्या भेटीस गेले होते. अखेरच्या दिवशीं लाला जीवनदासजीनीं स्वामींच्या पुढें उभे राहून प्रश्न केला " महाराज इस समय कहां है ? " स्वामींनीं उत्तर केलें " ईश्वरेच्छामें ! " थोड्या वेळानें पुन्हा विचारले " कहिये, अब आपकी तबीयत का क्या हाल है ? " स्वामींनी उत्तर दिले " अच्छा है, तेज और अन्धकार का भाव है." या उत्तराचा खरा अर्थ कोणालाच काही समजला नाही नंतर त्यांनीं जवळ उभ्या असलेल्या प्रत्येकाच्या मस्तकावर वरहदस्त ठेवून " सुखशांतीत रहा " असा आशीर्वाद दिला स्वामी आत्मानद आणि पडित भीमसेन यास प्रत्येकीं शभर रुपये व एक शाल असे दान देण्यास सागितले, पण ते त्यानीं नम्रपणें घेण्याचें नाकारले. सायकाळीं पाच वाजण्याचा वेळ आला, तेव्हा त्यानी आपल्या भेटीस आलेल्या सर्व मडळीस आपल्या समोर बोलावलें सर्वांना अखेरचे दर्शन झाल्यावर त्यानीं त्यास मागे उभें राहण्याची खूण केली एक पडित गुरुदत्त सन्मुख उभे होते, असें सागतात. मग सर्व दरवाजे, खिडक्या तक्तपोशींतील उजेड्या उघडा असे स्वामीनीं सागितले वरती आकाशाकडे व आजूबाजूस पाहून तिथिवार कोण त्याची त्यानीं चवकशी केली कृष्णपक्ष व शुक्लपक्षाचा साधिदिन असा दिवाळीतील मंगळवार आहे असे कोणी सागितलें इतकी चवकशी झाल्यावर अत्यत शात व प्रसन्न चित्तानें स्वामीनीं वेदमत्र म्हटले. सस्कृत-प्राकृतांत ईशस्तुति केली ध्यान मग्न होत्साते गायात्रिमत्राचा जप केला शेवटी डोळे उघडून स्वामी म्हणाले " हे दयामय, हे सर्वशक्तिमान् ईश्वर ! तेरी यह इच्छा है ! तेरी यही इच्छा है ! तेरी इच्छा पूर्ण हो ! अहा तैने अच्छी लीला की ! " [ हे दयामय सर्वशक्तिमान् ईश्वरा ! तुझी अशी इच्छा आहे तुझी अशी इच्छा आहे तर तीच पुरी होवो वाहवा ! चागली लीला केलीस ! ] असे म्हणून लगेच स्वामी आपणच बिछान्यावर किंचित् वळले आणि एका उच्छ्वासावरोबर त्यानीं आपले प्राणोत्क्रमण केले !

याप्रमाणे आर्यावर्तातील एक बडे आधुनिक धर्मसुधारक आपल्या वयाच्या ५९ व्या वर्षी—ता ३० आक्टोबर १८८३ मगळवार रोजीं सायंकाळीं सहा वाजतां परलोकवासी झाले ! तेव्हा त्याच्या आत्म्यास जणु काय स्वर्गाची वाट दाखविण्याकरिताच जिकडे तिकडे दीपावलीचा लखलखाट झाला ! एक दिव्यज्योति अंतर्धान पावतांना लक्षावधि अनुयायाच्या आत्मज्योति कशा पेटवून गेली ह्याचेंच

हे एक उत्कृष्ट रूपक झालें. त्यांचें प्राणोत्क्रमण झाल्यानंतर चतुर्थाश्रमाला योग्य असें त्यांचें और्ध्वदेहिक करण्यासाठीं दोघां संन्याशांनीं त्यांचें शव मागितले. पण त्यांच्या अनुयायानीं तें न ऐकतां वेदघोष म्हणत त्यांचे प्रेत समारभानें स्मशानांत नेलें. तेथे रायबहादूर भगतराम यांचें प्रसंगोचित भाषण झाल्यावर दोन मण चंदन आणि पाच मण पिंपळकाष्ठ यांची चिता रचून चार मण तूप, पांच शेर कापूर, एक शेर केशर, दोन तोळे कस्तुरी इत्यादि वेदोक्त वस्तूंसह त्याचें दहन केलें! दयानदाच्या मृत्यूनें, विशेषेकरून उत्तर भारतवासीयांस फार दुःख झाले!

व्यक्ति कितीही थोर असली तरी ती व्यक्ति नाश पावते, पण तिने उत्पन्न केलेले सस्कार नाश पावत नाहींत ते मूळच्या अगर पालटत गेलेल्या स्वरूपात वृद्धि पावतच असतात त्याप्रमाणे स्वामी दयानद ही व्यक्ति नाहींशी झाली, पण त्यांचे विचार, त्याचे अनुयायी आणि त्या अनुयायांनी चालविलेल्या सस्था व चळवळी याचा फैलाव सारखा वाढतच राहिला त्याची माहिती यापुढे यथानुक्रम देत आहों

---

प्रकरण आठवें

# आर्यावर्तांतील मतमतांतरें

**नयसीद्वति द्विषः कृणोष्युक्थशंसिनः । नृभिः सुवीर उच्यसे ।**

—ऋग्वेद, ६।४५।६

**भावार्थ**—तूंच उत्तम वीर खरा. कारण, तू विरोधकाना कुमार्गावरून पिटाळून लावून त्यास योग्य वेदमार्गारूढ करतोस.

आर्यांच्या मतें स्वामी दयानदानीं जुनाच वैदिक मार्ग जो नव्याने शोधून काढला, तो काढण्यापूर्वी किंवा काढण्याकरिताच त्यानीं मतमतातराचें जें रान अगोदर तोडले त्याची माहिती वाचकास अगोदर दिलेली बरी त्यांच्या आर्य-धर्माचीच इमारत आपल्याला पहावयाची आहे खरी, पण त्या इमारतीसाठीं अगोदर प्रशस्त जागा करण्यासाठीं त्यांनी जुने इमले कोणकोणते खणून काढावयास घेतले तेही पाहिले पाहिजे त्याशिवाय नव्या–जुन्याच्या महत्त्वातील तरतमभाव लक्षांत येणार नाही कोणताच धर्म पूर्णपणे सत्य नाही यास्तव प्रत्येक धर्मातील जो सत्यांश तो ग्रहण करावा असें ब्राह्मसमाजानें ठरविलें. तर उलटपक्षी ईशप्रणीत वैदिकधर्म हा एकच पूर्णपणें सत्य व प्रमादरहित धर्म आहे; इतर धर्मांत जर काहीं सत्याश असला तर तो मूळच्या वैदिक धर्मांतीलच होय. असे दयानदाचे मत झालें. त्याच्या मताप्रमाणे पाच हजार वर्षांपूर्वी जगांत वैदिक धर्माशिवाय दुसरा कोणताही धर्म नव्हता. वेदाकडे लोकाची अप्रवृत्ति झाल्यामुळेंच स्वार्थ माजून महाभारताचा घनघोर सग्राम झाला व पुढें अज्ञानामुळें आणि बुद्धि भ्रष्ट झाल्या-मुळें पौराणिक, जैन, बुद्ध, ख्रिस्ती व इस्लामी या अनुक्रमानें वेदबाह्य मतमतां-तरें जगात प्रसृत झालीं अशा या मिथ्या मतमतांतराचा समूळ नाश होऊन एका सत्य वैदिक मताचा सर्वत्र प्रचार होणार नाहीं, तोंपर्यंत मनुष्यां-मध्ये भेदभाव राहून खरा आनंद कधींही प्राप्त होणार नाही, असें दयानंदांचें निश्चित मत असल्यामुळें विशेषेंकरून आर्यावर्तांतील मतमतान्तरांबद्दल त्यांचे काय विचार होते, त्यांचें दिग्दर्शन या प्रकरणांत करण्याचें योजलें आहे.

ज्याप्रमाणें वैदिक धर्माबद्दल त्याचप्रमाणें स्वदेशाबद्दलही दयानदांची अनन्य-

साधारण बुद्धि आहे. ते म्हणतात कीं, "आर्यावर्त देशासारखा उत्तम देश सर्व भूमडळावर दुसरा कोणताही नाहीं आर्यावर्त हाच खरा परीस आहे, या देशाला जे जे लोखडमय दरिद्री देश स्पर्श करतात, ते ते सुवर्णमय होतात त्याचप्रमाणे विद्याधनही याच देशाकडून सर्वास मिळावे अशी या देशाची पूर्वपीठिका आहे.* सृष्टीच्या प्रारभापासून तों पाच हजार वर्षांच्यापूर्वीपर्यंत सर्व भूमडळावर आर्यांचेच सार्वभौम चक्रवर्ति राज्य होतें मनुस्मृति ही सृष्टीच्या प्रारभी झालेली आहे म्हणून तीवरून तत्कालीन वस्तुस्थिति समजते भारतीय युद्ध सपेपर्यंत येथील राजाच्या आधीनच इतर देशांतील राजे होते. चीन देशाचा भगदत्त, अमेरिका (पाताळ) देशाचा बभ्रुवाहन, युरोपचा बिडालाक्ष, यवन व इराण देशाचा शल्य, हे सारे राजे भारतीय महायुद्धात व राजसूय यज्ञात सार्वभौमाच्या आज्ञेने आले होते रहुगण राज्याचा रावण हा एक लहानसा माडलिक होता. त्याचा रामचद्राने पराभव करून बिभीषणाला राज्य दिले तात्पर्य, स्वायभुव राजापासून तों पाडवापर्यंत आर्यांचे चक्रवर्ति राज्य या भूमडलावर होते. सुद्युम्न, भूरिद्युम्न, इद्रद्युम्न, कुवलयाश्व, वध्यश्व, अश्वपति, शशबिन्दु, हरिश्चद्र, अम्बरीष, ननक्तु, सर्याति, ययाति, अनरण्य, अक्षसेन, मरुत्त, भरत, हे या भूमडळावर प्रसिद्ध चक्रवर्ति राजे होऊन गेले [मैत्र्युपनिषद १।४] पण या श्रेष्ठ आर्यावर्तात कालातराने काही कारणामुळे अवनत दशा प्राप्त झाली आर्यावर्तातील या धार्मिक अवनतीच्या कारणाची मीमासा दयानदानी आपल्या मताप्रमाणे केली आहे दयानद म्हणतात की, भारतीय युद्धामध्यें मोठमोठे विद्वान् पुरुष मारले गेले, राजेमहाराजे, ऋषिमहर्षि याचा नाश झाला त्यामुळे विद्या व वैदिक धर्म याच्या जागृतीचें काम बद पडलें वेदादिशास्त्राची अर्थासहित पठण करण्याची परपरा बद होऊन केवळ चरितार्थासाठीं ब्राह्मण लोक वेदाची घोकपट्टी करू लागले अशा रीतीने वास्तविक गुरु असणाऱ्या ब्राह्मणामध्ये अविद्या वाढल्यामुळे ते छल, कपट व अधर्म यानीं युक्त झाले व आपले दोष लोकाना समजू नयेत म्हणून त्यानीं क्षत्रियादिकाना वेदादिशास्त्राचा निव्वळ पाठही शिकविण्याचे बद केले त्यानी सर्वाला आपल्या भ्रमजालामध्यें

*एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ॥ स्व स्व चरित्र शिक्षेरन् पृथिव्या सर्व मानवाः ॥–मनु० २।२०. [ या कुरुक्षेत्रादि देशांत उत्पन्न झालेल्या ब्राह्मणापासून पृथ्वींतील सर्व मनुष्यांनीं आपण आपला आचार शिकावा. —बापटशास्त्री.]

फसवून वश करून घेण्यासाठीं 'ब्रह्मवाक्यं जनार्दन' [पाण्डवगीता] अशा सिद्धान्ताचा प्रचार केला तेव्हां अज्ञानी व श्रीमान् क्षत्रियादि लोक या कपटी उपदेशाच्या पाशांत सांपडून त्यांचे शिष्य बनले आणि त्या योगानें भिक्षुकांना विषयांचें उपवनच मिळाल्यासारखें झाले! पृथ्वीमध्यें जें कांहीं उत्तम आहे, तें ब्राह्मणांसाठी आहे, असा त्यांनीं डांगोरा पिटविला! व आपले अज्ञान झाकण्यासाठीं गुणकर्म-स्वभावानें समजावयाची वर्णव्यवस्था मोडून, जन्मानेंच ब्राह्मणादि वर्ण समजावे, अशी अव्यवस्था माजविली. अन्त्येष्टि संस्कारामध्येही दानें उपटण्यास सुरवात केली! जसे याच्या मनाला वाटले, तसा हे उपदेश करू लागले 'आम्ही भूदेव आहों आमची सेवा केल्याशिवाय कोणालाही कोणताच देवलोक मिळणार नाहीं.' असे म्हणणाऱ्या ब्राह्मणाचीं कामे पाहिलीं तर तीं घोर नरकात पोंचविणारीं आहेत! हे ब्राह्मण नव्हत हे भिक्षेकरी आहेत जसे युरोपात पोप तसे हे येथें अधर्म माजविणारे स्वार्थी लोक आहेत आर्यावर्तातील धर्मगुरूंची ही पोपलीलाच चाललेली आहे येथील ब्राह्मण थोडीशी दक्षणा दिली असता प्रायश्चित्त देऊन शुद्ध करण्याचा आव घालतात! पण हें त्याचें गौडबंगाल किती दिवस चालणार? ब्राह्मणाला चार आणे दिल्याने जर केलेली दुराचरणे नाश पावू लागतील, तर या पृथ्वीवर, सर्व आनंदीआनंद पसरून, रोगराई नाहीशी होऊन सर्व लोक मुक्त होतील या स्वार्थसाधु लोकानी पाहिजे तसे ग्रथ लिहून शेवटीं व्यासाचे नांव किंवा दुसऱ्या कोण्यातरी ऋषिमुनीचे नाव घालून आपल्या मतलबाचा प्रचार केलेला आहे यानीं मोठ्या कुशलतेने अशी व्यवस्था केलेली आहे की, निजणें, उठणें, बसणे, खाणे, पिणें, हीं कर्मेंसुद्धा या 'पोपा'च्या संबधाशिवाय होऊं नयेत काय हें धर्माच्या नावाखालीं थोतांड! या बिघडलेल्या स्थितीचा मूल प्रचार महाभारत युद्धाच्या पूर्वी सरासरी एक हजार वर्षांपासून चालू झाला होता या ब्राह्मणाच्या अज्ञानामुळें या आर्यावर्ताची अवनति झाली आहे व त्यांतूनच एक वाममार्ग सुरू झाला आहे याकरिता जेव्हा ब्राह्मण पूर्ण विद्वान्, धार्मिक व कर्तव्यदक्ष बनून इतर वर्णाना आपापलीं कर्तव्यें करण्यास प्रोत्साहन देतील, तेव्हा या देशाची सर्व देशात थोरवी होईल, यात शका नाहीं. उत्तम उपदेशकाच्या अभावीं अधपरंपरा चालू होते. 'उपदेश्योपदेष्टृत्वात् तत्सिद्धिः। इतरथान्धपरम्परा ॥' सांख्य ३।७९

वरीलप्रमाणें दयानंदांनीं ब्राह्मणवर्गावर जे ठिकठिकाणीं सणसणीत कोरडे

ओढले आहेत, ते " जया अंगीं मोठेपण। तया यातना कठीण॥ " या न्यायानें व दृष्टीनें योग्यच आहेत असें कांहीं आर्यइतिहासकार समर्थन करतात तर कित्येक आर्यलेखक इतकीही सहानुभूति न दाखविता ब्राह्मणांना यथेच्छ शिव्या देण्यांतच पुरुषार्थ आहे असें मानतात. त्यास वरील अवतरणातील शेवटचे वाक्यही कितपत रुचेल व पटेल याची शंकाच आहे ब्राह्मण कर्तव्यनिष्ठ झाल्याने देशोद्धार होईल असे न म्हणता देशातील कोणत्याही कर्तव्यनिष्ठ पुरुषासच लोक जेव्हा ब्राह्मण म्हणूं लागतील तेव्हा देशाचा उद्धार होईल असें म्हणणें त्यास कदाचित् जास्त मानवण्याचा संभव आहे कदाचित् इतक्याचसाठीं कोणास वाटेल कीं, अशा असंतुष्ट लोकांच्या विचारें आजकाल दैवदुर्विलासानें ब्राह्मण ही एक शिवीच झाली असल्यामुळे त्यात भूषणभूत कांहींच राहिले नाही ! असो

दयानंदाच्या मताप्रमाणे भारतीय युद्धानंतर धर्माचा जो अपकर्ष झाला, त्याचें पहिलें दृश्य म्हणजे शाक्तमत होय. शिवउवाच। पार्वत्युवाच। भैरव उवाच। अशा तऱ्हेनें प्रारंभ करून हे शाक्त आपआपली मते प्रस्थापित करू लागले. वैदिक धर्मग्रंथामध्येही शाक्तांनी आपल्या कुविचाराची घुसडाघुसड केली व तींच शुद्ध वैदिक मतें, असे पुढील लोक मानू लागले तेव्हा अनाचार व हिंसामय कृत्ये राजरोसपणें धर्माच्या नावाखालीं होऊ लागलीं ते पाहून कांहीं स्वतंत्र विचाराच्या माणसाना वाटू लागलें कीं, जर वैदिकधर्म खरोखरच हिंसा व अनाचारमय आहे, तर तो मानवी उन्नतीस कसा उपयोगी पडेल ? उदाहरणार्थ, यजुर्वेदावरील महीधराचे भाष्यात पशुहिंसा, यजमानपत्नीचा घोड्याशीं संग, अध्वर्यूचे व यजमानपत्नीचे अश्लील भाषण इत्यादि विषय आलेले पाहून कित्येकास तत्कालीन प्रचलित वैदिक धर्माबद्दल अत्यंत वीट आला बौद्ध, जैन, चार्वाक, आभरणक अशीं नास्तिक मतें निर्माण झाली वैदिक मतांचा किंवा दयानंदाच्या मताप्रमाणे वैदिक म्हणून गणलेल्या मताचा लोक उपहास करू लागले चार्वाकवादी म्हणत कीं " यजमान जर यज्ञ-पशूच्या हवनानें स्वर्गास जातो, तर तो आपल्या बापाला मारून त्यालाच कां स्वर्गाला पोंचवीत नाहीं ! तसेंच जर मेलेल्या प्राण्यालाही श्राद्धानें तृप्ति मिळते, तर प्रवासाला जाणाऱ्या बरोबर फराळाचे कशाला देतात ! दयानंद म्हणतात कीं, " जेव्हा अशा चार्वाकादि मताचा स्वीकार राजेमहाराजे व श्रीमान् लोक करू लागले, तेव्हा ही भिक्षुक मंडळीही त्या बाजूला झुकली, कारण याना जेथे स्वार्थ साधेल तेथे जावयाचें,

एवढेंच काय तें काम असतें. अशा रीतीनें हे जैन किंवा बुद्ध बनूं लागले. वेदाचें अध्ययनाध्यापन बंद पडत चाललें यज्ञोपवीतधारणादि संस्कार नामशेष होऊं लागले ! ब्रह्मचर्यादि नियम मोडत चालले ऋषभदेवापासून तों महावीरापर्यंत होऊन गेलेल्या तीर्थकराच्या मोठमोठ्या मूर्ति करून त्यांची पूजा करण्याचा क्रम सुरू झाला शाक्तमताचा प्रसार झाल्यामुळें हिंसा ही ज्याप्रमाणे यज्ञाचे अग होऊन बसली त्याचप्रमाणे जैन आणि बौद्ध धर्मातील मूर्तीच्या प्रसारामुळे त्यातील मूर्तिपूजाही वैदिक धर्मात येऊन बसली अशी स्थिति आर्यावर्तामध्ये तीनश वर्षेपर्यंत होती या मुदतीत प्रायः वेदाचा अर्थ लुप्त झाला आणि शुद्ध वैदिक धर्माचा मागमूस नाहीसारखा होत चालला ह्यास सुमारें अडीच हजार वर्षे झाली त्यानतर द्रविड देशात शकराचार्याचा उदय झाला. त्यानी जैनमताचा पाडाव करून उज्जनीच्या सुधन्वा राजाच्या साह्यानें वैदिक धर्माचा पुन्हा प्रचार सुरू केला त्या वेळी जैन पंडिताशीं आचार्यानी जो शास्त्रार्थ केला, त्यातील जैनाचा पूर्वपक्ष असा होता की, [१] सृष्टीचा कर्ता अनादि ईश्वर असा कोणीही नाही, [२] जगत् व जीव अनादि आहेत व [३] त्याची उत्पत्ति किंवा विनाश होत नाहीत. ह्याच्याविरुद्ध श्रीशकराचार्यानी असे मत माडले की [१] अनादि सिद्ध परमात्मा, हाच सृष्टीचा कर्ता आहे, [२] जगत् व जीव मिथ्या आहेत. [३] परमेश्वर आपल्या मायेने जगत् उत्पन्न करून त्याचा विनाशही करतो व हा सर्व प्रपच स्वप्नवत् असून परमेश्वरच आपण जगत्‌रूप होतो व ही सर्व लीला करतो. ह्याप्रमाणे जैन मताचे खडन होत असता ब्रह्मसत्य जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव ना परः हे मत पुढे येऊन त्या मताचा आचार्याच्या शिष्यवर्गाने बराच प्रचार केला दयानद असें समजतात की, श्रीशकराचार्यानीं जैनमताच्या खडनासाठी हे मत पुढे आणले इतकेंच देशकालवस्तुस्थितींच्या अनुरूप आपल्याला असम्मत अशा मताचा स्वीकार करूनही विद्वान् लोक प्रतिपक्षाचे खडन करीत असतात. जर श्रीशकराचार्याच्या मताप्रमाणें खरोखरच जगतातील सर्व व्यवहार मिथ्याच असेल तर त्याचे हे म्हणणे म्हणजे जगतातीलच एक व्यवहार असल्यामुळें तेंही मिथ्या ठरेल. शकराचार्याच्या पूर्वी व वाममार्गी लोकानतर शैवादि सप्रदाय बरेच उत्पन्न झाले त्या सर्वाचे शकराचार्यानीं खडन केलें. पण विक्रमादित्यापासून शैवमताचा पुन्हा प्रसार होऊ लागला. शकराचार्यांना त्यांनीं शिवाचा अवतार बनविलें. इतकेंच

नव्हे तर त्याचे अनुयायी शैवपंथी व शाक्तही बनू लागले तथापि शाक्त जसे वेदमताविरुद्ध व अघोरी असतात तसे शैव नाहींत. शैव व शाक्त याच दोन मताच्या लोकानीं लिगपूजा सुरू केली. लिंगाची पूजा सुरू करण्यात त्यांना निर्लज्जपणा मुळीच वाटला नाही व आपण हें किती नीचपण करीत आहो, याचाही त्याना विचार झाला नाही

विक्रमादित्यानतर पाचशें वर्षांनी भोजराजाच्या कारकीर्दीत थोडेसे व्याकरण, काव्य व अलंकार शास्त्रांचा इतका प्रसार झाला की, कालिदासासारखा बकरीं चरविणाराही त्या विद्येच्या योगानें रघुवशाचा प्रणेता झाला भोजराजाच्या नतर दीडशे वर्षानी वैष्णव मताला प्रारभ झाला शठकोप नामक एक कजर सूप विकून योगी होऊन सचार करीत असे. तो या वैष्णव मताचा उत्पादक होय. तो जातीचा कजर म्हणून ब्राह्मणानीं त्यास शास्त्रे शिकण्यास मना केले त्याचा तिरस्कार केला त्या सतापाने त्याने हा ब्राह्मणाच्या विरुद्ध सप्रदाय सुरू केला. व वेदशास्त्र विरुद्ध अशी तिलकचक्रादि साप्रदायिक चिन्हे बनविलीं याचा चेला चाण्डालकुलोत्पन्न मुनिवाहन व त्याचा शिष्य यवनकुलोत्पन्न यावनाचार्य ऊर्फ यामुनाचार्य झाला त्याचा शिष्य रामानुज हा ब्राह्मण कुलात उत्पन्न होऊन चक्रांकित-सप्रदायप्रवर्तक बनला त्यानें श्रीशकराचार्यांच्या मताविरुद्ध टीका केली व त्याची यथेच्छ निंदा केली शकराचार्यांच्या मते जीव-ब्रह्मैक्य व जगत्-प्रपंचमिथ्यात्व होते, त्याविरुद्ध रामानुजाचे मत जीव, ब्रह्म व माया हे तीन पदार्थ अनादि व नित्य आहेत, असें होते हीं दोनही मते अवैदिक आहेत पण त्यात शकराचार्यांचे मत इतराइतके दोषी नाही रामानुजाच्या विशिष्टाद्वैतांत जीव सर्वथा परतत्र आहे, कठी, माला, तिलक धारण करण्यानें व मूर्तिपूजा करण्यानें ईशप्राप्ति होते वगैरे अवैदिक मतें या पथात असल्यामुळें हा पथ जास्त भ्रष्ट आहे आत शाक्त, बाहेर शैव व सभास्थानीं वैष्णव असे नानारूपे धरणारे हे वाममार्गी असत. कानफाटे, नाथ, गिरी, पुरी, वन, अरण्य, पर्वत सागर इत्यादि नामधारी यातच मोडतात, रामानदी गोपीचदन लावून त्यात काळी रेषा काढतात. नीमावत दोन बाजूला बारीक रेषा काढून मध्ये लाल बिंदु लावतात, माधव फक्त काळी रेषाच लावतात, गौडबगाली कट्यारीप्रमाणे रेषा काढतात, आणि राम-प्रसादी चद्राकार गध लावून मध्यें एक टिकला देतात अशीं कपाळें रगविणे हें ते मोक्षसाधन समजतात. याप्रमाणे हे सर्व लोक शुद्ध धर्माला विसरून भ्रमजालांत

फसत आहेत. "पठितव्यं तदपि मर्तव्यं दंतकटाकटेति किंकर्तव्यम्" संतांनीं विद्या कां म्हणून शिकावी ? कारण विद्याध्ययन केलें तरी मरण चुकत नाहीं, मग दांतांना व्यर्थ शीण कां ? साधूंनीं चार घरें फिरून यावें. संतांची सेवा करावी, रामाचें भजन करावें म्हणजे झालें." अशा ह्यांच्या मतानें आत्मोन्नति कशी होणार ? ह्या प्रत्यक्ष अज्ञानाच्या मूर्तिच होत. याना खाकी साधु असें म्हणतात. याच प्रकारचे आणखी रूखड, सूखड, गोदडिये, जमाती, सुरतेसाई, अकाली, जोगी, औघडी इत्यादि आहेत. ते सर्व एका माळेचेच मणि होत. अशा तऱ्हेच्या अक्षर-शत्रूंजवळ अविद्येनें घर केलेलें असून आश्चर्य हें कीं, हे सध्यांचे गुरु व हेच साधु होत !

कबीरपथही वर लिहिल्याप्रमाणेंच आहे ते मूर्ति पूजीत नसतील, पण पलंग गादी, तक्के, खडावा, दिवा वगैरेंचें पूजन करतात. हें काय मूर्तिपूजन नव्हे ? काय कबीरसाहेब भुगा होता, कीं जो फुलांतून बाहेर पडला ! हा कबीरही संस्कृत शिकण्यासाठीं एका पंडिताजवळ गेला ब्राह्मणेतरांना आपण शिकवीत नाहीं, असें त्यास पंडिताकडून उत्तर मिळाले. तेव्हां पुढें तो आपल्या उपदेशामध्यें पडितांची व शास्त्र्यांची फार निंदा करीत असे कान बंद केल्यावर जो शब्द होतो, त्याला कबीरपंथी अनाहत शब्द मानू लागले, मनोवृत्तिला सुरती म्हणूं लागले. तो ध्वनि ऐकणें हेंच यांचें परम ध्यान आणि बर्चीप्रमाणें तिलक लावणें हाच त्याचा पुरुषार्थ !

पंजाबात गुरु नानक होऊन गेला त्यानें मूर्तिपूजेचें खंडन केलें मुसलमान होण्यापासून पुष्कळांना वाचविलें. त्यानें गृहस्थाश्रमातच राहून उपदेशाचे काम केलें उदाहरणार्थ, त्याचा एक मत्र* आहे. त्याचा भावार्थ असाः— "ज्याचें ओंकार नाम सत्य आहे तो जगत्कर्ता पुरुष भय व वैररहित आहे तो काल व योनि यांच्या बधात येत नाहीं. तो स्वयंप्रकाश आहे त्याचा जप गुरुकृपेनें कर तो परमात्मा आदीमध्यें सत्य होता, युगादिकाच्या वेळीं सत्य होता, सध्यांही सत्य आहे व पुढेंही सत्यच राहणार" हा नानकाचा उपदेश ठीक आहे, पण त्याला जशी असावी तशी विद्वत्ता नव्हती तेव्हा त्यानीं आपल्याच ग्राम्य भाषेंत आपला सर्व उपदेश करावयाचा होता मध्यें हा अशुद्ध

*ओंसत्यनाम कर्ता पुरुष निर्भो निर्वैर अकालमूर्त अजोनि सहभंगुरु प्रसाद जप आदि सच जुगादि सच है भी सच नानक होसी भी सच॥ जपजी चौडी१॥

संस्कृताचा घोंटाळा कशाला केला? कोठें त्यानें वेदांला चांगलें म्हटलें आहे, कोठें त्यांची निंदाही केली आहे.* उदाहरणार्थ, एके ठिकाणीं— वेद पठण करता करता ब्रह्मादिक मेले, तेव्हां तो कशाला पाठ करता? असें नानकाने म्हटले आहे वेदाध्ययन सोडल्यामुळे स्वतः नानक तरी कोठें अमर झाला आहे? वेद हे सर्व विद्यांचें भांडार असता त्याला कहाणी म्हणणाऱ्या नानकाचा सारा उपदेशही कहाणीसारखाच असला पाहिजे जे मूर्ख असता आपणांस साधु व ब्रह्मज्ञानी समजतात, त्याना वेदाचे महत्त्व काय समजणार? शिवाय वेदाचा गौरव त्यानें केला असता तर त्याला कोणीं गुरु मानले नसतें म्हणून वेदाची योग्यता कमी आहे असें प्रसिद्ध करणे त्याला भाग पडले नानकाच्या मागून त्याच्या गादीवर जे जे बसले, त्यानी त्यानी आपल्या मनाला वाटेल तें लिहून नानकाच्या मूळच्या ग्रंथात भर घालून त्याचा आता "ग्रंथसाहेब" बनविला पुराणातील कल्पित गोष्टीप्रमाणे या ग्रंथात पुष्कळ गप्पा मारलेल्या आहेत. नानकाने ईश्वराच्या भक्तीवर विशेष जोर दिलेला होता जर त्याच्या म्हणण्याप्रमाणेच पुढील गुरूनी आपला उपदेश चालविला असता तर फारसे बिघडले नसते. पण पुढील गुरूनी मन मानेल तसा उपदेश केला आणि आपणां-सच परमेश्वर बनविले त्यामुळे फारच बिघाड झाला ह्या पंथात उदासीन, निर्मल, अकाली व सूतर हसाई असे निरनिराळे भेद असून सारेच आपणास महात्मे समजतात त्यामुळें त्याचे आपसात बरेच झगडे आहेत वाममार्ग्यांच्या पाच मकाराप्रमाणे याचे पाच ककार गुरु गोविंदसिंहाने सुरु केले ते केस, कंकण, कच्छ, कंगवा व कर्द हे होत त्याचा लढाईचे वेळीं त्यास फार उपयोग झाला. पण सध्याची परिस्थिति निराळी असल्यामुळे तो तसाच सरजाम ठेवणे आज निरुपयोगी आहे. पण ही पाच चिन्हे धारण करणे हाच त्याचा धर्म झाला आहे त्याची ग्रंथपूजा म्हणजे मूर्तिपूजाच होय.

याचप्रमाणे दादूपंथी लोकांची स्थिति आहे वेदादि शास्त्रे शिकण्याचें सोडून 'दादूराम' म्हणण्यातच मुक्ति आहे असें ते मानतात त्याच्यांत रामसनेही नामक पंथ आहे त्यानींही वैदिकधर्म, ध्यान, कर्म, उपासना वगैरे सर्व सोडून एका

---

* वेद पढत ब्रह्मा मरे चारों वेद कहानि ॥ साधकी महिमा वेद न जाने ॥ [ सुख मनी पौडी ७, चौ. ८ ] नानक ब्रह्मज्ञानी आप परमेश्वर ॥ [ सु० पौडी ८, चौ. ६.]

रामनामाच्या जपानें सर्व कांही होते,असें मत धरले आहे यांना स्त्रियाच्या संगतीनें राहण्याची फार हौस असते स्त्रियांना हे रामकी म्हणतात अशा तऱ्हेच्या धर्माच्या नावावर हे लोक काय काय अनर्थ करीत असतात, ते मनात आणले म्हणजे अगावर शहारे येतात! रामचरण साधूच्या सतदासप्रणीत ग्रथात म्हटले आहे की, 'भस्मरोग तबही मिट्या, रट्यानिरजनराइ ॥ तब जमका कागज फट्या, कट्या करम तब जाई ॥६॥ साखी ॥ अशा तऱ्हेने नुसत्या राम शब्दोच्चाराने आपण निष्पाप होऊ असें म्हणणे हे निव्वळ अज्ञान आहे हा शुद्ध भ्रम आहे या मताचा प्रसार करणे म्हणजे आपला व दुसऱ्याचा जन्म फुकट घालविण्यासारखे आहे राम-नामाच्या जपानें राजपुरुष, चोर, डाकू, व्याघ्र, सिह, सर्प, विचू वगैरेंचे भय चुकत नाही, तर त्यापासून यमाचे भय चुकेल असे सभवनीय नाही साखर, साखर म्हटल्याने तोंड गोड होत नाही तद्वतच सत्यभाषणादि धर्मांचे स्वतः आचरण केल्यावाचून नुसते राम राम म्हणण्याने कांही एक होणार नाही राम जर सर्वत्र आहे तर एकदां राम असे म्हटल्याबरोबर त्याला ऐकू जाईल व जर त्याला ऐकू जात नसेल, तर जन्मभर म्हटले तरी त्यापासून काय होणार ! पण याचा उपदेश वेगळाच आहे ते रामनामाला सुच्छम वेद म्हणतात ! ते म्हणतातः—पडिताई पाने पडी, ओ पुरब लो पाप ॥ रामराम सुमरया विना, रहग्यो रीतो आप ॥ वेद पुराण पढे पढ गीता । रामभजन बिन रह गये रीता ॥ " ह्या पथातील एका शाखेचा उत्पादक रामदास नामक धेड होता. दुसऱ्या शाखेचा उत्पादक रामचरण हा बनिया होता या पथात ब्राह्मणापासून अत्यजापर्यंत सर्व सारख्याच योग्यतेचे समजतात कुडापथी लोकामध्ये सर्व मिळून एका कुडातील अन्न खातात, उच्छिष्ट खातात, वैदिक धर्मापासून लोकास पराङ्मुख करतात, व्यव-हाराला निरुपयोगी करतात, आईबापापासून मुलाना अलग करतात अशा तऱ्हेचे हे कुकर्मा आहेत

गोकुळिये म्हणून गोसाव्यामध्ये एक पथ आहे या पथातील लोक ऐश्वर्य-संपन्न असून त्याच्यात अतोनात अनाचार व चैनबाजी असते या गोसाव्याची लीला अगावर रोमाच उभे करणारी आहे हे लोक गोलोकात आपली मुक्ति आहे असे समजतात ब्रजदेश अज्ञानी लोकाचें माहेरघर असल्याचें प्रसिद्धच आहे. तेथेच या पंथाच्या सस्थापकाने असे प्रसिद्ध केले कीं, 'मला श्रीकृष्ण भगवान् भेटले व त्यांनीं मला सांगितलें कीं, गोलोकांतून मर्त्यलोकांत आलेल्या जीवांस ब्रह्म-

ज्ञानानें पवित्र करून गोलोकांत पाठवून दे." या बाबतींत त्यांनीं एक मंत्र सांगितला त्यालाच लोक वेद समजूं लागले. तो मंत्र असाः—

"श्रीकृष्णःशरणमम ॥ सहस्रपरिवत्सरमितकालजात कृष्णवियोगजनिततापक्लेशानन्ततिरोभावोऽहं भगवते कृष्णाय देहेन्द्रियप्राणांतःकरणतद्धर्माश्च दारागारपुत्रातवित्तेहपराण्यात्मनासह समर्पयामि, दासोऽहं कृष्ण तवास्मि ॥"

या मन्त्राचा उच्चार करून शिष्याचे व शिष्यिणींचे अर्पण करतात. हे वल्लभमत वाममार्गांतीलच एक भेद आहे, असे म्हणण्यास हरकत नाहीं. जर असे नसतें तर या मताच्या अनुयायात गोसाव्याना किंवा त्याच्या गुरूला आपल्या स्त्रिया समर्पण करण्याची चाल कधींच आली नसती. ह्यांच्या सिद्धान्त रहस्यादि प्रथातून "अन्यथा सर्वदोषाणा न निवृत्तिः कथचन ॥ असमर्पितवस्तूना तस्माद्वर्ज्जनमाचरेत् ॥" अशी वचने आहेत अन्य कोणताही उपाय दोषनिवृत्तीला नाहीं. यास्तव चेल्याने गुरूला ( स्वस्त्रीसुद्धां ) सर्वस्व अर्पण करावे आणि तेही आधी करावे. कारण भोगानतर समर्पण होऊ शकत नाहीं. अशा रीतीनें धर्माच्या नावाखालीं हे दुराचरण करीत असतात ! ! ह्यालाच पुष्टिमार्ग म्हणतात हा खरा नरकाचा मार्ग आहे याच्या गोलोकात श्रीकृष्ण हा एकच पुरुष व अन्य सर्व जीव स्त्रिया आहेत, त्याच्या विलासाचा आनद, जे पुरुष यांचे शिष्य होणार नाहींत, त्यास मिळणार नाहीं, असें याचें मत आहे याच्या या गोलोकाला स्वर्गलोक म्हणण्यापेक्षा व्यभिचारलोक म्हणणेंच ज्यास्त शोभेल. ज्यांनीं परमेश्वरालाही व्यभिचारी बनविले त्याच्या नीचपणाची कमालच झाली ! "हे यजमानजी लाओ भेट गोसाईजी की, बहूजी की, लालजी की, बेटीजी की, मुखियाजी की, बाहरियाजी की, गवैयाजी की, और ठाकूरजी की, असें म्हणून या सात नावावर हे यथेच्छ स्वार्थ साधतात. गुरुजींच्या कासोट्याचे पाणी हेच तीर्थ व थुकलेला विडा हाच महाप्रसाद हे मानतात ! होळीच्या सणातील रगपचमीची याची रासक्रीडा म्हणजे निव्वळ शिमगाच तो ! याप्रमाणे स्वतः पातकामध्ये बुडून दुसऱ्यास बुडविणारे हे लोक आहेत. ह्या वल्लभमताप्रमाणेंच नारायणमतही अधार्मिकच आहे स्वामी नारायणाचे मतही असेंच आहे केव्हा केव्हा यातील साधु पुरुष प्रसिद्धपणें स्त्रियाचे तोंड पहात नाहीत, पण गुप्त रीतीनें काय काय लीला करतात तें लिहिणे फार कठीण आहे. कित्येक वेळां याचे साधु मेल्यानतर त्यास एका गुप्त विहिरीमध्यें

फेंकून देतात व असें उठवितात कीं साधुमहाराज सदेह स्वर्गाला गेले; त्यांना नेण्यासाठीं सहजानंदजीची स्वारी स्वतः आलेली होती इत्यादि. अशा प्रकारचे अनर्थ करणारे लोक या गोकुलया गोसाव्यामध्यें आहेत.

मध्वमतही इतर पंथाप्रमाणेच त्याज्य आहे आपल्या कपाळावर काळी रेषा व टिळा लावला, कीं आपण वैकुंठाला जाऊन पोहोंचूं असे ह्यास वाटतें. मग सारें तोंड काळे केले तर हे वैकुंठापलीकडे कोठे जातील कोणास ठाऊक ! लिंगाकित मतही शैवमताप्रमाणेच त्याज्य आहे. हे लोक दगडाच्या लिंगाला इतकें पूज्य समजतात कीं, त्याला दाखविल्यावाचून पाणीही पीत नाहींत.

ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज यात काहीं गोष्टी चांगल्या व पुष्कळशा वाईट आहेत. कित्येकाना वाटतें की, हे समाज नवीन स्थापलेले असल्यामुळें सर्वांशीं हे उत्तम आहेत. पण वास्तविक गोष्ट तशी नाहीं उघडच आहे कीं, ज्याना वेदज्ञान नसते त्याच्याकडून धर्माचें प्रतिपादन निर्दोष रीतीने कसें होऊ शकेल ? या समाजानीं लोकांना ख्रिस्तीय मतापासून निवृत्त केलें, मूर्तिपूजेपासून मागें हटविलें व अन्य भ्रमजालापासून लोकास दूर केलें पण यान्यात पुढें लिहिल्याप्रमाणें दोष आहेत [१] स्वदेशभक्ति वरीच कमी असून खाणेंपिणें, विवाह इत्यादि बाबतीत ख्रिस्ती लोकाप्रमाणें वागतात [२] पूर्वजाबद्दल प्रशंसा तर नाहींच, पण यथेच्छ निंदा मात्र करतात [३] वेदाची निंदा हवी तशी करतात. याच्या पुस्तकात उद्धृत केलेलीं वाक्यें प्रायः ईसा, मूसा, महमद, नानक, चैतन्य वगैरेंचीं असतात. हे लोक आर्यावर्तात उत्पन्न झाले आहेत व त्यानीं याच देशाचें अन्न खाल्लें आहे, असे असता आपल्या मातापित्यानीं अवलंबिलेल्या उन्नत वैदिक धर्माचा त्याग करून विदेशी मतावर याचा विश्वास का बरें अधिक बसावा ? हे लोक प्रायः संस्कृतानभिज्ञ असतात इंग्रजीतून मिळविलेलेच ज्ञान अत्युत्तम असा त्यास अभिमान उत्पन्न होतो अशा लोकांकडून मानवी उन्नतीचें कोणतें कार्य होणार ? [४] इंग्रज, यवन व अत्यज याच्याबरोबरही हे खातात व पितात. अशाने व जातिभेद तोडल्यानेंच देश वर येईल असा याचा व्यर्थ समज असतो. अशानीं सुधारणा होण्याची तर लांबच गोष्ट. पण उलट बिघाड मात्र होत आहे [५] पशुपक्षी, वृक्ष यांमध्यें जशा ईश्वरकृत जाति आहेत. तशा मनुष्यामध्यें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अत्यज या सर्व गुणकर्मस्वभावानुसार ईश्वरकृत जाति आहेत तसाच हिंस्र प्राणी व गाय-ढोराप्रमाणें शाकाहारी आणि मासाहारी हा भोजनभेदही ईश्वरकृत आहे.

मनुष्यकृत जातिभेद आणि ईश्वरकृत जातिभेद यांपैकी दुसरा ईश्वरकृतही जातिभेद ब्राह्म मानीत नाहीत युरोपियनांची उन्नति खानापानाच्या अत्याचारामुळें झाली नसून ती त्यांच्यांत बालविवाहपद्धति नाहीं, मुलामुलींना ते सुशिक्षित करतात, ते स्वयंवर करतात, भोंद लोकास जुमानीत नाहीत, जे करावयाचें तें संघशक्तीने करतात, तनमनधनपूर्वक आळस सोडून उद्योग करतात, वरिष्ठांची आज्ञा पाळतात, स्वदेशाच्या व्यापाराला उत्तेजन देतात इत्यादि त्यांच्या गुणामुळें झाली आहे पण या त्यांच्या गुणाचे अनुकरण न करता ब्राह्म त्यांच्या बूटपाटलोणीचें मात्र तेवढे अनुकरण करतात पण त्यास हे कळत नाहीं की, इतकीं वर्षे झाली तरी साहेबानी आपले रीतिरिवाज, आचरण, कपडे लत्ते सोडले नाहीत. त्याना आपल्या जुत्याचा मानही जोड्यापेक्षा अधिक वाटतो त्यांच्यामध्येही जातिभेद आहे ब्राह्म नाही समजतात ती त्यांची चूक आहे ब्राह्म जातिभेद नकोत म्हणून म्हणतात मात्र, पण ते कधीही अज्ञानी लोकात मिसळत नाहीत. आपल्याच ढंगात हवे तसे आचरण करतात असे ते महान अपराधी आहेत [६] ब्राह्म वेद वगैरे विशिष्ट ग्रंथ प्रमाणभूत मानीत नाहीत. कारण, कोणाही मनुष्याची बुद्धि निर्भ्रांत असू शकत नाही, असे त्याना वाटते मग ते जे अखेर सत्य म्हणून मानतात ते तरी निर्भ्रम कसे मानता येईल ? अशा रीतीनें त्यांच्याच मताप्रमाणे त्यांचें मत संशयात्मक ठरते कारण, स्वतःची बुद्धि ही काहीं उत्तम कसोटी नव्हे. सत्यासत्यनिर्णयासाठी परमेश्वराचे वचनच काय ते साह्यकारी होऊ शकतें पण वेदप्रामाण्य न मानल्यामुळे 'इतोभ्रष्टस्ततो भ्रष्टः' अशी त्यांची अवस्था आहे यामुळे आर्यावर्ताची उन्नति त्यांच्याने होणार नाही विदेशीय लोकही त्यांची पर्वा करीत नसल्यामुळें तेही त्यांची मतें मानणार नाहीत [७] मुसलमान व खिस्ती लोकाप्रमाणे ब्राह्म समजतात की जीव साक्षी आहेत व जगत् उपादान कारणाशिवाय उत्पन्न झाले, पण ही चूक आहे तसेंच ते समजतात की, पश्चात्ताप व प्रार्थना यानी पापाची निवृत्ति होते ह्या घातकी समजुतीने जगात पुष्कळच पापे वाढली आहेत पौराणिक लोक तीर्थयात्रेने, जैनलोक नवकार मंत्रजप व तीर्थ याच्या योगानें, खिस्ती लोक खिस्तावर विश्वास ठेवल्याने, मुसलमान लोक तोबा करण्याने पापे नाश पावतात असें मानतात, त्यांच्याचप्रमाणे ब्राह्म प्रार्थनासमाजी याचेही मत भ्रममूलक आहे. त्यानी वेदाध्ययन केले असते तर अशी चूक होतीना [८] ब्राह्म जीवाची अनंत उन्नति मानतात, तेही होणे अशक्य आहे.

अल्प व समर्याद जीवाचे गुणकर्मस्वभावही ससीम व अल्पच होणार अल्पकर्मांचें फळ अनंत मिळाल्यास देवाचे घरीं न्याय नाहीं असे होईल [९] ब्राह्मांच्या मतें निसर्गप्राप्त स्वाभाविक ज्ञान हे वेदाहूनही श्रेष्ठ आहे. पण ही चूक आहे सहजज्ञान हेच स्वाभाविक, ते वाढू शकत नाहीं. नैमित्तिक ज्ञानच वाढू शकते. मुलाचे ज्ञान स्वाभाविक विद्वानांचे नैमित्तिक अर्थात् तेच श्रेष्ठ होय. [१०] ब्राह्मानीं पुनर्जन्म न मानणे हे निव्वळ खिस्ती व मुसलमानी लोकांचें अनुकरण होय जीव शाश्वत आहे व त्याची कर्मे प्रवाहरूपाने नित्य आहेत कर्म व कर्मवान् याचा नित्यसबध असतो [११] ईश्वरामध्ये जसे दिव्य गुण आहेत तसेच विद्वानांमध्ये व इतर पदार्थामध्येही आहेत म्हणून त्यानाही देव असे मानले पाहिजे ब्राह्म परमेश्वर मानतात पण देव मानीत नाहींत ही चूक आहे [१२] ऋषिमहर्षींचे उपकार न स्मरतां ब्राह्मानीं येशूचे पाय धरणे व युरोपियन लोकाची स्तुति व हांजी हाजी करणे चागले नव्हे. [१४] मूळकारण वेदरूपी विद्येशिवाय अन्यकार्यरूपी विद्या झाल्या असे मानणे हे अज्ञान आहे. [१५] यज्ञोपवीते व शिखा ही विद्येची चिन्हे आहेत ती सोडणे योग्य नव्हे जे कोटपाटलोण घालतात त्याना जानव्याचा जास्त भार वाटतो काय ? [१६] जड चेतनाच्या सयोगाने जीव उत्पन्न झाला, पूर्वी नव्हता, व उत्पत्तीनतर तो चिरस्थायी आहे, ही ब्राह्ममते असबद्ध आहेत असे दयानद म्हणतात.

थिऑसफीबद्दल दयानदानी आपल्या वाङमयात काहीच लिहिले नाही कोणी थिऑसफिस्ट या मतांची मीमासा अशी करतात की [१] थिऑसफीस स्वतत्र अस्तित्व नाही [२] त्याचे स्वतत्र सिद्धान्त नाहीत [३] थिऑसफीची श्रेष्ठ तत्त्वे सारी हिंदुधर्मातीलच आहेत [४] अन्य साप्रदायिक मताचे खडन वेगळें केलेच आहे [५] थिऑसफीचा परिणाम अशिक्षित किंवा अर्धशिक्षित लोकावर मुळीच होत नसून त्याचे महत्त्व सुशिक्षित समाजातच आहे त्याना अधिक सागण्याचे कारण नाही [६] थिऑसफिस्टाची मतें भारतीय उन्नतीला बाधक नाहीत [७] आर्यसमाजाशी साक्षात् तिचा विरोध नाही. [८] पुढेमागे थिऑसफी आर्यसमाजात जमा होईल असा त्यास भरवसा असेल आम्हास असे वाटतें कीं, थिऑसफिकल सोसायटीच्या संस्थापकाशीं दयानदाचा सबध येण्यापूर्वीच त्यांचा मुख्य टीकात्मक ग्रथ जो सत्यार्थप्रकाश तो छापून प्रसिद्ध झाला होता. त्यानंतर थिऑसफीबद्दल मुद्दाम एखाद्या ग्रंथात टीका करण्याचा त्यास प्रसगच आला नाहीं. त्याच्या पत्रव्यवहारावरून त्याचें विरुद्ध-मत स्पष्ट दिसून येतें.

इ० सन १८७८ साली थिऑसफिकल सोसायटी आणि स्वामी दयानंद याचा फारच विलक्षण योगायोग जुळून आला. हरिश्चंद्र चिंतामणी यांच्या मार्फत पूर्वी पत्रव्यवहार होऊन ता. २२ मे १८७८ रोजीं अमेरिकेंतील न्यूयॉर्क शहरीं थिऑसफिकल समाजाच्या भरलेल्या सभेंत स्वामी दयानद यास थिऑसफिकल सोसायटीचे मुख्य मार्गदर्शक म्हणून मानण्यात आले इतकेंच नव्हे, तर हा अगागिभाव स्पष्ट होण्यासाठीं अमेरिकेच्या ह्या सस्थेने आपलें मूळचें नांवही बदलून "हिंदुस्थानातील आर्यसमाजातर्गत थिऑसफिकल संघ" अशा अर्थाचें नाव धारण केले हा योगायोग जुळून येण्यात जी उतावळी दिसते तीच हा संबध लगेच तुटण्यातही दिसून येते. ह्या भिन्न वृत्तीच्या सस्थाचा योग जितका आश्चर्यकारक तितकाच त्याचा बेबनाव वादग्रस्त झाला आहे. यास्तव आम्ही येथें केवळ आर्यसमाजी लेखकाचे आधारेंच ह्या गगाजमनी सगमाचा त्रोटक वृत्तान्त देणार आहोत

इ. सन १८७९ चे आरंभी थिऑसफिकल सोसायटीचे सस्थापक (मॅडम ब्लॅवेटस्की आणि कर्नल अल्कॉट) मुबईस आले पुढें सहारणपूर येथे स्वामींची व त्याची समक्ष गाठ पडून काही काल त्याचा सहवासही घडला पण त्याचबरोबर थिऑसफिकल सोसायटी सस्थापकानी हिंदुस्तानात थोडाफार प्रवास करून येथील सुशिक्षित वर्गाची मनोभूमिकाही अजमावली ती त्यास फारच नरम व सुपीक आढळली तेव्हा त्यास असे वाटले की, दयानदासारख्या एका जबरदस्त गुरूचे कायमचें शिष्यत्व पत्करणे सोपे आणि सोयीचे नसून त्यापेक्षां आपणच आपल्याला स्वतंत्र अनुयायी मिळविणे फारच सोपे आणि सोयीचे आहे. तेव्हा तोच मार्ग त्यानी हळुहळू स्वीकारला आणि आर्यसमाजातील सभासदासही थिऑसफिकल सोसायटीत दाखल करण्याचा उपक्रम त्यानीं सुरू केला याप्रमाणें दयानदाच्या खाद्यावर बसून उंच होण्याची आरभींची महत्त्वाकाक्षा सोडून ते जेव्हा त्याच्या पायाखालची भूमिच पोकळ करू लागले, तेव्हा दयानदाचा आणि त्यांचा खटका उडून दोघाचाही संबध तुटण्याची वेळ आली. त्यांत आणखी पुढील विरोधि गोष्टीची भर पडत चालली. थिऑसफीचे आधारस्तभ हिमालयांतील महात्मे दयानंदास मान्य नव्हते. त्यांचे योगसिद्धीचे चमत्कार आणि संदेशही दयानदास विश्वसनीय वाटत नव्हते. दोघांची ईश्वरविषयक बुद्धि भिन्न होती. दयानदांची हिंदुधर्मावरील अनन्य निष्ठा त्यांच्या ठिकाणी मुळींच नव्हती.

उलट त्यांच्या मनाचा कल बौद्धधर्माकडे जास्त होता. सामान्यतः सर्व धर्मांचा व धर्मीयांचा संग्रह करण्याचा थिऑसाफिस्टांचा प्रयत्न दयानंदांस मुळींच पटण्यासारखा नव्हता अशा अनेक कारणांमुळें या दोन महत्त्वाकांक्षी पक्षांचा बेबनाव होऊन इ. स १८८२ साली त्यांचा सबध काममचा तुटला. आरंभीं दयानदाबद्दल जसा थिऑसफिकल सोसायटीच्या सस्थापकाना आदर वाटत होता, त्याचप्रमाणें त्याचा जडू पाहणारा सबध स्वामीनाही फार कौतुकास्पद व स्पृहणीय वाटत होता. या सबधाने आपल्या अगीकृत कार्यास जास्त उत्साह आणि बळकटी येईल, असें दोन्हीही पक्ष समजत होते. पण अवघ्या तीन वर्षातच हें मनोराज्य फोल ठरले !

ह्याप्रमाणे आर्यावर्तातील मतमतातराचे पर्यालोचन करून शेवटीं दयानद जिज्ञासूने कोणाकडे जावे या प्रश्नाला उत्तर म्हणून १३ मुण्डकातील १।२ मत्र देतात. ते असेः—“तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् ॥ समित्पाणिः श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठम् ॥१२॥ तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक् प्रशान्त चित्ताय शमान्विताय ॥ येनाक्षर पुरुष वेद सत्य प्रोवाच ता तत्त्वतो ब्रह्मविद्याम् ॥ तात्पर्य, वेदविद्व व ब्रह्मनिष्ठ गुरूजवळ जावे कारण या सहस्र मतामध्ये जे काही सामान्य चांगले तत्त्व आहे, उदाहरणार्थ, विद्याध्ययन, ब्रह्मचर्य, प्रौढविवाह, सत्संग, पुरुषार्थ, सत्यपालन–ते सारे वेदमतच सर्वात श्रेष्ठ आहे

## प्रकरण नववें

# धार्मिक थोतांडें

**अन्धतमः प्रविशन्ति येऽसम्भूतिमुपासते।**
**ततो भूय इव तो तमो य उ सम्भूत्या ँरताः॥**

—यजु० ४०।९

**भावार्थ**—जे अनादि मूलप्रकृतीची परमेश्वराच्या ठिकाणी उपासना करतात ते अंधकारात प्रवेश करतात जे पृथिव्यादि भूताना [ वृक्ष, पाषाण, मनुष्यें इत्यादि ] परमेश्वर मानून भजतात, ते जास्त अधकारात प्रवेश करतात.

आर्यावर्तातील मतमतातराचा दयानदानी जो विचार केला तो साररूपाने मागील प्रकरणात सागितला आता या बहुतेक सर्व मतांत सामान्य अशी जी धार्मिक थोतांडे म्हणून दयानदानी तिरस्कृत केली, त्याचा विचार ह्या प्रकरणात करावयाचा आहे मत्र, तत्र, रुद्राक्ष, भस्ममुद्रादिधारण, तीर्थविधि, आणि देवतार्चन असे हे थोताडपचक आहे त्यासबधी दयानद काय म्हणतात ते पाहू.

**मंत्र**—मत्रशास्त्र हे एक अलौकिक शास्त्र असल्याचा पुष्कळाचा समज आहे असे काही विवक्षित मत्र मानले आहेत की, ते परिणामकारक झाल्यास त्यांचे दृष्ट व अदृष्ट अशी उभयविध फळे मिळू शकतात मत्रानें कोणतेंही द्रव्य उत्पन्न होते मत्राने विष उतरते, मत्रात्मक अस्त्रे अघटित कार्ये करतात, मत्राने देवता प्रकट होतात, नवग्रह शात होतात, रोग दूर होतात, इतकेंच काय पण नाममत्राने मुक्तिही मिळते इत्यादि ज्या लौकिक समजुती आहेत,त्या सर्व अशास्त्रीय व साफ खोट्या आहेत असें दयानद म्हणतात त्याच्या मते मत्र या शब्दाचा अर्थ विचार किवा मनन असा आहे मत्री म्हणजे विचारी पुरुष अर्थात् ज्या शब्दाला किवा शब्दसमूहाला मत्र असे म्हणतात त्याच्या अर्थाचे मनन करावयाचे असते नुसत्या जपानें काहीं होत नाही जर कोणी म्हणेल की, अमुक मत्र जपला असता अग्नि उत्पन्न होतो तर त्यास विचारावे की, तो अग्नि त्या मत्र उच्चारणाऱ्याचेच तोंड कसें जाळीत नाही? वस्तुस्थिति अशी सागतात की, द्रव्याच्या सघटित अणूना आघात केल्यावर जोंपर्यंत त्याची स्थितिस्थापकता कायम राहते, तोंपर्यंतच त्यांच्या ठिकाणी शब्दगुण असतो, त्याच्यापलीकडे अणूंची स्थिति जाऊन ते जेव्हा सुटे होतात, त्या वेळीं

त्यांना अग्नीची स्थिति प्राप्त होऊन ते नेत्राचे विषय होतात म्हणून कोणत्याही प्रकाराने शब्दांची जुळणी झाली, तरी तेथे नेत्राचा विषय उत्पन्न होऊंच शकत नाहीं. असो, हे सारे भौतिकशास्त्राचे प्रयोग होत. उदाहरणार्थ, बांबगोळे हेच आग्नेयास्त्र, विद्युत्पात हेच पाशुपतास्त्र, विषारी धूर सोडणें हेच मोहनास्त्र असे समजावें, आतां नवग्रहाचे जे मत्र आहेत, ते वास्तविक त्या ग्रहांचा कोणत्याही तऱ्हेनें सबध दाखवीत नाहीत. उदाहरणार्थ, सूर्याचे मत्रात (आकृष्णेन रजसा) गुरुत्वाकर्षण, चद्राचे मत्रात राजगुण, मगळाचे मत्रात अग्नीचे वर्णन, गुरूच्या मत्रात विद्वानाची स्तुति, शुक्राचे मत्रात वीर्य, आणि अग्नि, तसेच शनीच्या मंत्रांत (शन्नो देवी रभिष्टय) जल, प्राण, परमेश्वर याचे गुणवर्णन आहे त्याचप्रमाणे राहु आणि केतु हे मुळी ग्रहच नसता तन्निमित्त [" कयानश्चित्र आभुवदूती " " केतुं कृण्वन्न केतवे०"] जे मत्र म्हणतात त्यातही मित्रविषयक व ज्ञानविषयक वर्णन आहे शिवाय ज्योतिषातील गणितविद्या खरी आहे, पण फलज्योतिष खरे नाहीं जर ग्रहाचा सबध खरोखर मनुष्याच्या सुखःदुखाशीं असून तो जोशीबुवाना समजण्यासारखा असता, तर त्याच्या घरात दुःखी विधवा व कष्टी लोक दिसले नसते जोशी लोक जातक पाहूनच लग्ने लावतात मग नवरा बायकोत तटे आणि मृत्यूने त्याची ताटातूट कशी होते ? ग्रह सुखदुःखादि फले भोगण्यास लावतात असे जर मानावयाचे तर पूर्वजन्मीं केलेल्या कर्माची काय वाट ? एकाच क्षणी जन्मास आलेल्या जीवापैकी एक चक्रवर्ति होतो, दुसरे का होत नाहीत ? दुसरे असे कीं, सूर्य अनुकूल झाला म्हणून ऊन थड होत नाही आणि चद्र प्रतिकूल झाला तरी चादणे काही उष्ण होत नाही मग ते अनुकूल प्रतिकूल असून करणार काय ? चद्रसूर्यादि ग्रहाच्या गतीनें ऋतुमानादि जे फरक व्हावयाचे ते सर्वाना समानच भासतात साराश, ज्योतिषशास्त्राचा तात्त्विक विचार केल्याने होणारा लाभ एका बाजूस राहून, साप्रत उदर भरण्यास साधनीभूत अशी फलज्योतिष्याची लीला मात्र चोहोकडे पसरून राहिली आहे व ती पर्यायानें लोकाच्या पुरुषार्थाच्या मात्र आड येत आहे

हाच प्रकार तात्रिकाच्या ठिकाणी आढळतो * हे लोक जारण, मोहन,

* उदाहरणार्थ " ऱ्हा ऱ्ही ऱ्हू बगलामुख्यै फट स्वाहा ॥" (शा० प्रकी० प्र० ११॥) हु फट् स्वाहा ॥ (कमरत्न ज० बीज मं० ४) अशा तऱ्हेचे चमत्कारिक आवाज काढून भोळ्या बापड्या लोकाना धूर्त लोक फसवीत असतात.

उच्चाटन, विद्वेषण, वशीकरण असे प्रयोग आपण करतों असें लोकांना सांगतात व गरिबांना आपल्या जाळ्यांत ओढतात. यांच्या ह्या मंत्रांनीं तर कांहींच होत नसतें. ते जे जें हातचलाखीनें करतात ते तें सर्व मंत्राने केलें असे ते लोकाना भासवितात हे वाममार्गी सोडले तरी धुमी पेटवून तिच्याजवळ बसणाऱ्या बेरागी साधु लोकाच्या तपस्येचें असलेच थोताड असतें. त्यांच्यातील नाथपथी लोकांचा " नमःशिवाय " खाकी बैराग्याचा " नृसिंहाय नमः " रामावताऱ्याचा " श्रीरामचद्राय नमः " किंवा " सीतारामाभ्या नमः " कृष्णोपासकाचा " श्रीराधाकृष्णाभ्या नमः " किंवा " नमो भगवते वासुदेवाय गोविंदाय नम. " असे मत्र असतात हा मत्र कानात उच्चारण केल्याबरोबर तो उच्चारणारा गुरु बनतो व ऐकणारा उत्तम शिष्य बनतो ! याशिवाय कोणीं तर नवे नवे मत्रही तयार केले आहेत उदाहरणार्थ ! " जल पवितर सथल पवितर और पवितर कुवा । शिव कहे सुन पार्वती तुबा पवितर हुवा ॥ " दयानद म्हणतात की, अशा निरक्षर व निर्बुद्ध लोकाकडून जनतेवर उपकार तो कोणता होणार ? हे लोक आपल्या धुमीवर जीं लाकडे जाळतात त्या ऐवजीं जर यानीं एक काबळे विकत घेतले तर त्याचे थोड्या पैशात काम भागून व्यर्थ लाकडें फुकट जाणार नाहीत पण त्यांस इतकीही बुद्धि असत नाही. ते आपणास तपस्वी म्हणवितात, का तर ते धुमीजवळ तापत बसतात तसेंच रामराम असें काहीं म्हणत राहिल्याने पापें नाश पावतात असें समजणे हेंही अज्ञानच होय.

वास्तविक ब्रह्म, ईश्वर, परमेश्वर, न्यायकारी, दयाळु, सर्वशक्तिमान् अशीं जीं परमेश्वराची अनेक नावें आहेत, त्या नावानीं जो अर्थ व गुण दर्शित होतो, तो गुणधर्म आपण आपल्या अगीं अशतः तरी आणण्याचा प्रयत्न करणें व अशी प्रयत्नाची स्फूर्ति होण्यासाठीं तीं नावे लक्षात ठेवणे याचेच नाव वैदिक नामस्मरण होय उदाहरणार्थ, ब्रह्म या नांवाबरोबर थोर होण्याची इच्छा करावी, ईश्वर शब्दानें सामर्थ्याची आकाक्षा बाळगावी, विष्णु शब्दाने जीवास आपणांप्रमाणेच सुखदुःख आहे असें मानून दुसऱ्यास साहाय्यकारी व्हावें. अशा प्रकारें कृतीमध्यें उतरलेलें नामस्मरण मात्र उन्नतिकारक असतें. हीच वैदिक पद्धत होय " तेजोसि तेजो मयि-धेहि । " हे परमेश्वरा ! तू तेजःस्वरूप आहेस म्हणून माझ्यामध्येंही तेज उत्पन्न कर. अशा प्रार्थना वेदांत अनेक आहेत. पातञ्जल योगसूत्रांतही जपाची अशाच प्रकारची व्याख्या केली आहे. 'तज्जपस्तदर्थ भावनम्' (योग० पा० १ सू० २८)

अर्थात् जप करणें म्हणजे त्याच्या शब्दोच्चारणानें त्या शब्दांत जी अर्थव्यंजक सत्ता आहे तिच्या जोरावर त्या अर्थाची भावना बुद्धींत प्रगट करणें होय.

**तंत्र**—तांत्रिकांवर तर दयानदांनीं अत्यत कडक रीतीनें टीका केली आहे. तांत्रिकांच्या आचारांचें जें वर्णन त्यानीं केले आहे तें पाहता तत्रमार्ग हा सर्वतोपरी पापमूलक व अनर्थावह आहे अशी भावना होते. असा हा मार्ग अत्यंत उज्ज्वल विचारांच्या आर्यावर्तांत सहस्रावधि वर्षें टिकला तरी कसा, असाही संदेह मनांत उत्पन्न होतो! पण त्याविषयी जास्त खोलांत न जातां येथें तूर्त दयानंदाचे त्यासबंधीं काय मत आहे तेवढेंच आपणांस पहावयाचें आहे. तांत्रिकांतील चोळीमार्गी व बीजमार्गी लोकाचे वामाचार अत्यंत अनीतिमय दिसतात. त्यांचें उघड वर्णन येथें करणें अप्रस्तुत नसलें तरी अप्रशस्त वाटतें *

अनीतीच्या अनिर्बंध आचरणास पवित्र धर्माचरणाचे स्वरूप या ग्रंथामध्यें मिळालेलें आहे त्याच्या मताने काही काहीं विशेष दुराचारी लोक फारच योग्यतेचे ठरतात असें हे स्वैराचरण धर्माच्या नावाखालीं इतकीं वर्षें उजळमाथ्यानें चालत आलें असून—दयानद म्हणतात कीं, अत्यत आश्चर्याची गोष्ट ही कीं, या गोष्टी आपल्याच धर्मातील आहेत असे अजूनही कित्येकास वाटत आहे याचें कारण

---

*तथापि नमुन्याकरिता अर्थ न देता काही तात्रिक वचनें खाली देत आहों;

मद्य मास च मीन च मुद्रा मैथुनमेव च ॥
एते पञ्च मकाराः स्युर्मोक्षदा हि युगे युगे ॥ (कालितंत्रादि)
पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा यावत्पतति भूतले ॥
पुनरुत्थाय वै पीत्वा पुनर्जन्म न विद्यते ॥ (महानिर्वाण)
मातृयोनि परित्यज्य विहरेत्सर्व योनिषु ॥ (ज्ञानसंकलनी)
"मातरमपि न त्यजेत् (मातगी विद्यानुयायी)

रजस्वला पुष्कर तीर्थ चाण्डाली तु स्वय काशी, चर्मकारी प्रयागः स्याद्रजकी मथुरा मता। अयोध्या पुक्कसी प्रोक्ता (रुद्रयामल)

हालापिबती दीक्षितस्य मन्दिरे सुप्तो निशाया गणिकागृहेषु ॥ विराजते कौलवचक्रवर्ती ॥

मद्याचें अतिरिक्त प्राशन, असंख्य बलिदान व स्त्री-सेवनांत, कन्या, भगिनी आणि माता यांसही वर्ज न मानणें हें त्याच्या अत्याचाराचें अत्युग्र चित्र होय !

या शाक्तांनीं वेदावर आपल्या मताप्रमाणें टीका केल्या आणि श्रुति-स्मृति-पुराणांत आपले मत घुसडून देण्याचा थोडाबहुत यशस्वी प्रयत्न केला. उदाहरणार्थ, " न मांसभक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने ॥ प्रवृत्तिरेषा भूताना निवृत्तिस्तु महाफला ॥ ( मनुः ५।५६ ॥ ) हे वचन मनुस्मृतीत यानींच घुसडून दिले असावें. कारण मांसभक्षण करणे, मद्यप्राशन करणे, परस्त्रीगमन करणे यांत जर मुळींच दोष नसेल तर दोष तरी कशात आहे ?

**तीर्थक्षेत्र**—" अन्यक्षेत्रे कृत पापं काशीक्षेत्रे विनश्यति " " गगा गगेति यो ब्रूयाद्योजनाना शतैरपि ॥ मुच्यते सर्व पापेभ्यो विष्णुलोक स गच्छति ॥ " इत्यादि तीर्थाचे श्रेष्ठत्व प्रतिपादणारे असख्य श्लोक पुराणातून व माहात्म्यग्रथातून आहेत, त्यातील वर्णन साफ खोटे आहे असेच दयानद निक्षून सागतात. ते म्हणतात की, ( जना यैस्तरन्ति दुःखानि तानि तीर्थानि ) ज्याच्या योगाने जीव सर्व दुःखातून तरून जातात व सुख प्राप्त करून घेतात, तीच खरी तीर्थें होत जलाशये ही तारणारी नसून बुडविणारीं आहेत त्याच्यापेक्षा नौकाना तीर्थें म्हणणे बरें वास्तविक 'तीर्थ' या शब्दाचा अर्थ पिता किवा पित्यासमान आचार्य असा होतो " नमस्तीर्थ्याय च " ( यजु० अ. १६।४२ ) म्हणजे वेदविद्यांचे पठण करणारा आणि सत्यभाषणादि कामात प्रवीण अशाचा सत्कार करावा त्यास अन्न द्यावे असे यजुर्वेदात सागितले आहे जर गगाभागीरथी, काशी, प्रयाग, इत्यादि नावे घेतल्याने पापे नाश पावतील तर कोणीही पापी राहणार नाही व पापे करावयासही कोणी भिणार नाही हें सर्वांनी लक्षात ठेवावे की, केलेले पातक भोगलेच पाहिजे भोगल्याशिवाय त्याची कधीही निवृत्ति होत नाही. तेव्हा जलाशय किवा क्षेत्र याना पापनाशक तीर्थ असे म्हणण्यापेक्षां " जना यैस्तरन्ति दुःखानि तानि तीर्थानि " हेच तीर्थाचे खरें स्वरूप असल्यामुळे सत्यशास्त्राचे अध्ययन, अध्यापन, धार्मिक विद्वानाची सगति, परोपकार, धर्मानुष्ठान, योगाभ्यास, निर्वैर होणे, निष्कपटी होणें, सत्य बोलणे, सत्य मानणे, सत्यकर्म करणे, ब्रह्मचर्य सेवन करणे, आचार्य, अतिथि, मातापिता याची सेवा करणे, परमेश्वराची स्तुति, प्रार्थना व उपासना करणे, शाति धरणे, जितेंद्रिय होणें, सुशील बनणें, धर्मयुक्त पुरुषार्थ करणे, ज्ञान व विज्ञान मिळविणे शुभगुण अगी आणणे ही सर्व दुःखांतून जीवाला पार नेणारीं वेदानुकूल तीर्थे होत. याचेंच सेवन करावें, म्हणजे मनुष्य पावन होतो. गयाश्राद्धादि तीर्थविधि हीं सारीं थोतांडें असून पितर आपल्या हातानें

पिंड घेतात हें म्हणणें निव्वळ खोटें आहे पूर्वी कोणी धूर्तानें कांहीं कपट करून खड्यात एखाद्या माणसाला बसवून त्यावर झांकण घालून कपटानें पिंड आंत घेऊन जाण्याची व्यवस्था केली असेल एखाद्या अडाणी श्रीमताला असें फसविलें म्हणजे तीच गोष्ट सहज रूढ होते. भूतप्रेत, पिशाच, शाकिनी, डाकिनी इत्यादि साऱ्या कल्पना व त्याच्या निवृत्तीकरिता तीर्थक्षेत्राचे उपाय हे पैसे उपटण्यासाठींच ढोंगी लोकांनी काढलेले खूळ आहे त्याच्या नादीं कोणी लागू नये

**भस्मरुद्राक्षादि धारण**—दयानदाच्या दिग्विजयाच्या आरंभी ते आपल्या अनुयायास रुद्राक्षमाळा देत असत पण पुढे लवकरच त्यानी तो क्रम बंद केला इतकेच नव्हे, तर रुद्राक्ष-भस्म तिलक आणि मुद्रा इत्यादींचे पूर्वप्रथात वर्णिलेले शक्तिसामर्थ्य साफ खोटे आहे असे ते प्रतिपादन करू लागले ते म्हणतात की, जर रुद्राक्षासारखे एखाद्या वृक्षाचे फळ गळयात वागविण्याने किंवा भस्म धारण केल्याने मुक्ति मिळत असेल, तर राखेमध्ये लोळणारी गाढवे व रुद्राक्षाचीं आभूषणें घालणारे वनचर हे सारेच मुक्त होतील कालाग्निरुद्रोपनिषद् कोणीं तरी राख फासणाऱ्यानें लिहिले आहे तें सारें असत्य आहे "यस्य प्रथमा रेखा सा भूर्लोकः" इत्यादि वचने अवैदिक व अनर्थकारक आहेत "त्र्यायुषं जमदग्नेः" हा वैदिक मत्र भस्मधारणविधि सागत नसून त्याचा अर्थ माझ्या नेत्राचा ज्योति तीनशे वर्षेपर्यंत राहो" असा आहे जमदग्नि हा शब्द नेत्रवाचक आहे. तात्पर्य, रुद्राक्ष, भस्म, तुलसी, कमलाक्ष, दर्भ, चदन वगैरे धारण करणें हे सर्व पशुकोटींत असलेल्या मनुष्याचे काम आहे मुद्रा व तिलक हेही त्यातीलच प्रकार आहेत "बाना बडा दयालका, तिलक छाप और माल। यमडरपै काल्र कहे, भय माने भूपाल ॥" असे हे ढोंगी अजाण लोकाना समजावितात पण रुद्राक्ष धारण करणाराला यमाचे दूत राहोत पण पोलिसाचे शिपाई तरी भ्याले पाहिजेत पण मग आपण तर प्रत्यही असें पाहतों की, त्यास कुत्राही विचारीत नाही! माशी-मच्छरासारखे क्षुद्र कीटकही भीत नाहीत "अतप्त तनूर्न तदामो अश्नुते" ह्या ऋग्वेदातील श्रुतीचा अर्थ तप्तमुद्रा नसलेल्या शरीरास असा नसून धर्माचरणादि तप न केलेल्या शरीरास परमात्मप्राप्तीचे अनुपम सुख मिळणार नाहीं असा आहे. धर्मयुक्त कामाला तप म्हणतात देह-दड उपासतापास म्हणजे कांहीं खरें तप नव्हे पुराणांत पाहिले तर प्रत्येक तिथीवार निरनिराळ्या देवासाठीं आहेत. त्या देवांप्रीत्यर्थ उपोषण करणे हें पुण्य व अन्न ग्रहण करणें हें जर पाप असेल तर

मनुष्याला जेवायला दिवसच मिळणार नाहीं. धर्मसिंधु, निर्णयसिंधु, व्रतार्क इत्यादि ग्रंथ अज्ञानी लोकांनींच बनविलेले आहेत, उपास कधीं धरावा हे असलेच त्यांतील वाद. खऱ्या धर्माचा अंशही त्यांत सांपडणार नाही. " एकादश्यामन्ने पापानि वसन्ति " एकादशीच्या दिवशीं सर्व पापे अन्नामध्यें राहतात असें यांनीं या पुराणांतून लिहिलें आहे त्याना विचारावें 'ही कोणाचीं पापें ? तुमचीं का तुमच्या वडिलांचीं '' त्या दिवशी सारीं पापे अन्नांत जातीं तर सारे लोक निष्पाप होऊन सुखी झाले असते. पण ते तर भुकेनें तडफडताना दिसतात वास्तविक उपाशी राहण्यापासून दुःख होतें, दुःख पापापासून होतें. म्हणून उपास करणे हें पाप आहे. पण या उपासाचें माहात्म्य पुराणात किती वर्णन केले आहे ! न जाणता एकादशीच्या दिवशीं उपास घडलेल्या एका शूद्र स्त्रीनें दुसऱ्या एका वेश्येस स्पर्श केल्याबरोबर त्या पुण्याईनें त्या वेश्येचें विमान स्वर्गात गेलें म्हणतात ! हें जर खरें असेल, तर फार कशाला, ही पानाची विडी स्वर्गात मिळत नाही तर तिला कोणी उपाशे स्पर्श करून स्वर्गात पाठवू शकतील का ? धनदा, कामदा, पुत्रदा, निर्जला असे एकादशीचे चोवीस भेद मानतात विधवा स्त्रियाना त्या दिवशीं पाणीसुद्धा पिऊ देत नाहींत ! काय हा धर्माच्या नावावर निर्दयपणा ? त्यातले त्यात उन्हाळ्यांतील एकादशीला सजला व पावसाळ्यांतील एकादशीला निर्जला म्हटले असतें तरी बरे होतें पण या भिक्षुकाना कोठची दया ! " कोणी मरो किवा जगो " आमची दक्षणा कायम असली म्हणजे झाले· हाच जप ज्यांना आहे त्यांच्या मेंदूंत विचार तरी कशाला शिरेल ! भूक लागली असता न खाणे व लागली नसतां खाणे, हे दोन्ही मार्ग अपायकारक आहेत. म्हणून कोणीही विचारी पुरुषानीं या पौराणिक गाबाळावर विश्वास न ठेवतां आपली नीति कायम ठेवून शुद्ध धर्मानें वागण्याचा निश्चय करावा, हेच उत्तम होय.

**देवपूजाः**—ह्या सर्व थोतांडात प्रतिमापूजा हे सर्वांत मोठें असल्यामुळें दयानंदांनी त्याचाही फार जोराने निषेध केला आहे, मूर्तिपूजाविरोध हा ब्राह्मधर्मीतीलही एक विशेष आहे त्याचा युक्तिवाद प्रथम खंडाच्या प्रथम भागात राममोहन आणि शास्त्री यांच्या सवादरूपानें विस्तृतपणे पूर्वी सांगितलाच आहे. दयानंदांचा युक्तिवाद अगदीं तसाच नसल्यामुळे तोही येथे सविस्तर देत आहोंत. दयानंद म्हणतात कीं, ज्यांमध्यें दिव्यगुण असतात त्याना देवता म्हणतात, या प्रमाणे पृथ्वी ही देवता खरी; पण तिलाच ईश्वर किंवा उपास्य म्हणून कोठेंही

वेदांत सांगितलें नाहीं. देव किंवा देवता आणि परमेश्वर हे शब्द समानार्थी नाहींत. " त्रयस्त्रिंशत् त्रिशता० " इत्यादि वेदमन्त्रात तेहतीस देव सांगितले आहेत. ते पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, चद्र, सूर्य, नक्षत्रें (सृष्टीचे आधार म्हणून) हे आठ वसु, दशप्राण व जीवात्मा हे अकरा (शरीरातून निघताना रडवितात म्हणून) रुद्र, बारा महिने हे (आयुष्याला कमी करणारे) आदित्य, परम ऐश्वर्याने युक्त अशी विद्युत तोच इद्र आणि (वायुजलादिकाची शुद्धि, विद्वानांचा आणि शिल्पकाचा सत्कार, जो साधतो तो) प्रजापति म्हणजेच यज्ञ या तेहतीस देवतांचा स्वामी असा जो चोविसावा परमात्मा तोच उपास्य होय असें शतपथाच्या चवदाव्या काडात स्पष्ट सागितले आहे तसेच " ईशावास्यमिद२ सर्व यत्किंच जगत्या जगत् ॥ " या व इतर अनेक श्रुतीत ईश्वराचे सर्वव्यापित्व दाखविलें आहे. तसेच न प्रतीके न हिसः [ब्रह्मसूत्र, अ ४, पा. १।४] या सूत्रात, प्रतीकांत म्हणजे परिच्छिन्न पदार्थावर ब्रह्मोपासना करणे, याचा शास्त्रात निषेध आहे वेदात " अज एक पाद् स पर्यगाच्छुक्रम कायम् " असे सागितले आहे यावरून परमेश्वर जन्म घेत नाही व शरीरही धारण करीत नाही असें ठरतें " यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति " इ० गीतावचनावरून परमेश्वर शरीर धारण करतो असें होत नाहीं श्रीकृष्ण हा योगीश्वर व धर्मात्मा होता धर्मरक्षण करण्याची त्याची इच्छा असल्यामुळे युगायुगांमध्ये जेव्हां अधर्म वाढेल तेव्हां आपण जन्म घेऊन धर्माचें रक्षण करू असे त्याने म्हटलें तर त्यात कांहींच वावगे नाही परोपकाराय सतां विभूतयः० तेवढ्यानें श्रीकृष्ण ईश्वर आहे असें ठरत नसून तो महात्मा व योगीश्वर होता असें ठरतें. अनत सामर्थ्ययुक्त परमेश्वराला एखाद्या क्षुद्र जीवाला मारण्यासाठीं शरीरधारी व जरामरणधर्मयुक्त व्हावें लागतें, असे मानणे मूर्खपणाचें आहे. ज्यांस मारावयाचें त्या कस-रावणाच्या शरीरांतच तो नव्हता काय? मग आंतूनच मर्मच्छेदन करण्यास त्यास काय कठिण होते? वस्तुतः व्यापक परमेश्वर एखाद्या शरीरांत राहूंच शकत नाहीं व गर्भामध्येही येऊ शकत नाहीं. त्याचे ठिकाणी येणे जाणे इत्यादि क्रिया मानणे अयुक्त होय शैव आणि शाक्त या दोन मतवाद्यांनीं ज्याप्रमाणें लिंगपूजा सुरू केली, त्याचप्रमाणें जैनी लोकाच्या चव्वीस तीर्थंकराचे अनुकरण करून पौराणिकांनीं हिंदूचे चव्वीस अवतार बनविले व त्यांच्या पुराणांप्रमाणें आपलींही अठरा पुराणे केलीं. आतां पहा कीं, ज्या पदार्थाला किंवा मूर्तीला ज्योतिर्लिंग म्हणावयाचें त्यामध्ये प्रकाशाचा लेश तरी

पाहिजेना ? पण यांचें दर्शन दिवा जवळ नेल्याशिवाय होत नाहीं ! कोणी म्हणतील कीं, " नमस्ते रुद्र मन्यवे । " " वैष्णवमसि । " " वामनायच । " " गणानांत्वा गणपतिःहवामहे ।" " भगवती भूयाः।" " सूर्यआत्मा जगतस्तस्थुषश्च ।" इत्यादि वचनावरून शैव, वैष्णव, गाणपत्य, शाक्त वगैरे पंथ वैदिकच ठरतात, तर तें वास्तविक नाहीं वरील वाक्यें या संप्रदायांना साधक नसून बाधक आहेत. कारण, रुद्र, शिव (परमेश्वर), विष्णु (व्यापक), गणपति (जगाचा स्वामी), सूर्य ( चराचराचा आत्मा ) वगैरे नावें परमेश्वराचीं आहेत. व तीं त्या एका परमेश्वराचेच निरनिराळे गुण दाखवीत आहेत. त्या नावाच्या निरनिराळ्या देवता नाहींत. भगवती, देवी, शक्ति, हीं नावें वाणीचीं आहेत रुद्र याचा अर्थ प्राण, अग्नि, व नम याचा अर्थ अन्न असाही होतो तेव्हा " नमस्ते रुद्र०" याचा अर्थ प्राण व जठराग्नि याना अन्न द्यावें असाही होईल तात्पर्य, या वचनातून निरनिराळ्या विभूतिपूजा अथवा उपासना सिद्ध होत नाहीत

ब्रह्माचें प्रतीक अशी कोणतीच वस्तु जगतात नाही शिवाय आधुनिक मूर्तिपूजा हा इंद्रियाचा विषय असून परमात्म्याची उपासना इन्द्रियें आणि विषय यापासून आत्मा निवृत्त झाल्यान साधणारी आहे तेव्हा याविरुद्ध स्थितीची एकवाक्यता कशी व्हावी ? परमेश्वर सर्वव्यापक असल्यामुळे भाव तेथे देव असे म्हणून काही मूर्तिपूजेचें समर्थन करू पाहतात, पण असे म्हणणाऱ्यानीं मातापिता, आचार्य, अतिथि, याच्या ठिकाणी तसेच पतीनें स्त्री व स्त्रीनें पति याच्या ठिकाणीं ईश्वरभाव ठेवून पूजा केली तर तिची हल्लीपेक्षा श्रेष्ठ अशा मूर्तिपूजेत गणना होणार नाहीं काय ? वैदिक मूर्तिपूजा किंवा विभुतिपूजा म्हणजे भूत, वर्तमान व भविष्य कालातील विभूतीचा सत्कार होय. उपासना ही अगदी भिन्न असून त्यात आत्म्याचा परमात्म्याबरोबर संयोग करावयाचे कर्म असते. हा भेद लक्षात घेतला असता याचे खरें मर्म समजून येऊन बराच विरोध कमी होईल.

परमेश्वराचें स्मरण करून देणाऱ्या मूर्ति आहेत असें मानले तर, पृथ्वी, पहाड, पर्वत वगैरे महान् मूर्ति आहेतच. त्याच्याकडे पाहिलें असतां सर्वशक्तिमान् परमेश्वराची जशी तात्काळ कल्पना येते, तशी प्रतिमांकडे पाहून येणार नाही. प्रतिमा सुंदर असली तर मूर्तिकाराच्या कौशल्याची फार तर साक्ष देईल. शिवाय अशी मूर्ति नेहमींच समोर नसल्यामुळे, ती नाहीं तर परमेश्वर तेथें नाहीं, असें होऊन पापकर्माकडे बिनदिक्कत प्रवृत्ति होईल. परमेश्वर मूर्तीत आहे इतरत्र

नाहीं, असें म्हणणें म्हणजे चक्रवर्ती राजाला एखाद्या झोंपडीचा मालक समजण्या-सारखेंच आहे. व्यापक परमेश्वराची पूजा ती काय? चंदनाच्या आंत परमेश्वर आहे, मग चंदन उगाळून लावायचें काय प्रयोजन? हातांत परमेश्वर आहे ते हातच मूर्तीपुढे काय जोडतां? डोक्यात परमेश्वर असता ते कोणापुढे वाकवा वयाचें? पाषाणाची पूजा करीत असतां आम्ही व्यापक परमेश्वराचीच पूजा करतो असे खोटें का बोलायचें? भाव तेथेंच देव म्हणाल तर काय तुमचा भाव नसेल तेथे परमेश्वर नाहींच की काय? उलट पक्षीं पाण्यामध्ये तुपाचा आणि धुळीमध्ये साखरेचा भाव धरून व्यवहार चालतो काय? भौतिक पदार्थ जर भावनेनें मिळत नाहींत तर ध्यानयोगगम्य परमेश्वर तुमच्या भावनेचा गुलाम होऊन मूर्तीत येतो हे कशावरून? सुखाची भावना करूनही सुख लाभत नाहीं आणि दुःखाची भावना न करताही ते पाठीस लागते याचा अर्थ काय?— भावनेने अधास दिसू लागत नाही आणि भावना नसताही मरण प्राप्त होते. जडाच्या ठिकाणी चेतनाची भावना करणे चूक आहे जो पदार्थ जसा असेल तसाच तो मानणे ही खरी भावना व्यापक परमात्म्याचें अनात्म पदार्थांच्या ठिकाणी आवाहन कसलें? आवाहनाने देवता येत असेल तर मूर्ति सचेतन का होत नाही? आवाहन व विसर्जन ह्याबद्दल वेदात एक अक्षरही नाही हें सारें वड अज्ञान्याचे आहे हे लोक आवाहन विसर्जनाचे प्रयोग जड मूर्तीवर करतात. त्यापेक्षा गतप्राण झालेल्या मृतात्म्याचे आवाहान आणि आपल्या शत्रूंच्या आत्म्यांचें विसर्जन हे कां करून दाखवीत नाहींत?

मूर्तिपूजन याप्रमाणें बिलकूल सत्य नसून—परमेश्वराशिवाय अन्य पदार्थाची परमेश्वर म्हणून उपासना केल्यास—

अन्धतमः प्रविशन्ति येऽसम्भूतिमुपासते ॥
ततो भूय इव ते तमो य उ सम्भूत्या ँ रताः ॥—यजु०, ४०।९.

या ईशावास्योपनिषदातील वचनाप्रमाणे हे मूर्ख लोक चिरकाल अज्ञानी होऊन थोर दुःखमय नरकात पडून अत्यत क्लेश भोगतात 'न तस्यप्रतिमा अस्ति' [—यजु०, ३२।३ ] असें स्पष्ट वेदवचन आहे. केनोपनिषदातही हेंच अनेक वेळां सांगितले आहे.

यद्वाचानभ्युदित येन वागभ्युद्यते ॥
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥३॥

यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतम् ॥
तदेव ब्रह्म त्व विद्धि **नेदं यदिदमुपासते** ॥४॥

या वचनात 'दुसऱ्या पदार्थाची उपासना करू नकोस" हा ज्या अर्थी निषेध केला आहे, त्या अर्थी तशी उपासना वैदिक काळी पूर्वीच रूढ होती, असे मानण्याचे कारण नाही प्राप्त वस्तूचाच निषेध संभवतो तेव्हां या निषेधा-वरून मूर्तिपूजा वैदिक काळी प्रचलित होती, असेही मानण्याचे कारण नाहीं. कारण चोरी करू नकोस, खाड्यात पडू नकोस इत्यादि प्रकारे अप्राप्त गोष्टीचेही निषेध होतात अशा रीतीनें वेदांनी जिचा निषेध केला, ती मूर्तिपूजा करणें हें पाप आहे

आता कोणी म्हणेल की वेद हे अनादि आहेत त्याच्या वेळी मूर्तिपूजेचें काय काम होतें ? त्या वेळी देवता प्रत्यक्ष होत्या पण पुढे मनुष्याचें सामर्थ्य कमी होऊ लागलें, निराकाराचे ध्यान त्यास करता येईना, तेव्हा अशा अल्पज्ञाकरिता साधन-परंपरेतील एक पायरी म्हणून पुराणें व तन्त्रग्रंथ यानी मूर्तिपूजा रूढ केली ती का मानू नये ? निशाण मारणारा जसा स्थूलावरून सूक्ष्म बिंदूवरही निशाण मारण्यास शिकतो, त्याप्रमाणे हा अभ्यास आहे बाहुल्यांचा खेळ ही प्रपंचाचीच पूर्व तयारी नाही काय ? यास उत्तर असें की, पदार्थांची पूजा केल्यानें ज्ञान वाढणार तर नाहींच, पण असलेले नाश पावेल. ज्ञानाचें साधन सत्संगति अथवा चेतनपूजा हीच होय. माता-पिता-गुरु आदि पंचायतनपूजा हीच कल्याणप्रद होईल मूर्तिपूजा ही उपासनेची पायरी नसून उलट एक खड्डा आहे ! मूर्तिपूजा ही ब्रह्मप्राप्तीच्या उद्योगात स्थूल लक्ष्याप्रमाणें मानता येणार नाहीं. त्यापेक्षा सृष्टिविद्या ही एक पायरी आहे असें म्हटले तर तें अधिक शोभेल. सृष्टिशास्त्राचे व्यापकदृष्टीचे अभ्यासक आज जगावर सत्ता गाजवीत आहेत आणि संकुचित दृष्टीचे मूर्तिपूजक पूर्वजाचें अगाध ज्ञान गमावून आज गुलामगिरींत खितपत पडले आहेत ! वेदविरुद्ध पुराणतन्त्रादि ग्रंथाना प्रमाण मानणें हे नास्तिकाचें काम आहे असें मनूनेंही म्हटले आहे [मनु०, ९३।९५] अक्षरओळख व स्वाध्याय हेच ईश्वरप्राप्तीचे खरे बालाभ्यास होत. मूर्तिपूजा नव्हे आता निराकारावर मन स्थिर होत नाहीं म्हणून साकार मूर्तीची आवश्यकता मानावी, तर वस्तुस्थिति याच्या अगदींच उलट आहे. 'ध्यान निर्विषय मनः' याप्रमाणे ध्यानाचें खरें स्वरूप मन निर्विषय करणें हेच असून अनुभव असा आहे कीं, साकार मूर्तीचें ध्यान करीत

असतां प्रत्येक अवयवावर क्रमाक्रमानें मन चलन पावतें. ते स्थिर होऊच शकत नाहीं. उलट निराकाराचें चिंतन करण्यात प्रथमतः मन जोराने धावतें; पण निरवयवाच्या ध्यानात मनास चंचल करण्यास कारणच नसल्यामुळे परमेश्वराची अनंतता पाहून तें थकते व पुन्हा आपल्या ठायीं स्थिर राहून त्याच्या अनंत गुणकर्मस्वभावाच्या चिंतनामध्यें गुंगून राहते आणि त्या आनंदात ते अधिकाधिक स्थिर होत जाते तात्पर्य, मन स्थिर करण्यास साकार पदार्थ सोडावे लागतात मूर्तीच काय पण स्त्री, पुत्र, धन, मित्र इत्यादि पदार्थांविषयींही उदासीन व्हावे लागते, असेच ज्ञाते प्रतिपादन करतात

मूर्तीच्या दर्शनानें कांही सुपरिणाम होणें शक्य असते, तर देवळातच कुकर्में घडलीं नसतीं मूर्तिपूजा हाच धर्म मानल्याने मनुष्ये पुरुषार्थहीन होतात तसेंच उपास्य-भेदानें जगात भेदभाव माजतो सर्व कांही उपास्य मूर्ति करील अशा भरवशावर राहिलेले उपासक आणि पुजारी अखेर परटाच्या धोंड्याप्रमाणे शत्रू कडून धोपटले जातात. परमेश्वरालाच मूर्तिपूजा कशी आवडावी ? आपल्या बसण्याच्या जागी कोणी धोंडा आणून ठेवला तर आपल्याला जसा राग येईल तसाच परमेश्वराचें अधिष्ठान जे आपलें हृदय तेथें जर पाषाणमूर्ति येऊन बसली तर त्यास का राग येणार नाही ? जडाचें ध्यान करणाऱ्याचा आत्माही जडबुद्धियुक्त होतो सुगंधीयुक्त फुलें दगडावर वाहायला का देवाने निर्माण केली आहेत ? अक्षता पाणी आणि फुले तेथे सडून जाण्यापेक्षा तीं झाडावर राहिलीं तर अधिक वेळ टिकून हवा शुद्ध व निरोगी तरी करतील अशा प्रकारें मूर्तिपूजेंत अनेक दोष आहेत देवळातील मूर्तीच्या स्वार्थी पुजाऱ्याना हवे त्याहून जास्त धन मिळत असल्यामुळे ते वेश्यागमनादि भयंकर पापें करून दुःखी होतात व नाश पावतात कित्येक देवस्थाने मोठी कडकडीत व जागृत आहेत, कोठें सिंहनाद झाला, कोठे देवाने उडी घेतली, इत्यादि माहात्म्ये लोक सांगत असतात तीं सारीं खोटी असून, भोळ्या भाविकांना फसविण्याकरिता पुजारी लोक कांही तरी कंड्या उठवितात. आणि हातचलाखी करून ठकवितात. दुसरें कांहीं नाहीं. महादेव आणि विष्णु यानीं खरोखरच राक्षसांचा संहार केला असता तर महमद गझनीसारख्या मुसलमानांचें भस्म करणे त्यास काय अशक्य होते ? रामाने रामेश्वराची स्थापना केली असती तर वाल्मीकि रामायणांत त्याचा का उल्लेख नसावा ? " अत्र पूर्वं महादेवः प्रसादमकरोद्विभु· सेतु-

बध इति ख्यातम्०" इत्यादि वाल्मीकींतील (युद्ध, १२३।२०) वचनांवर कल्पने ची उभारणी होऊन त्याचें पुढें रामदेवराव यादवाने स्थूलमदिरांत रूपांतर केलें. तसेंच हरिद्वार हे स्वर्गाचें द्वार नसून आज तें एक भिक्षुकवन बनलें आहे वृंदावन पूर्वी कधी नीट असले तरी सध्या ते वेश्यावन झाले आहे! याची ही अनादि काळची माहात्म्यें सारी बनावट आहेत कोणत्याही देवस्थानचे ताम्रपट किंवा जुन्या वह्या पाहाव्या, त्यात हजार वर्षांपूर्वीचा एकही लेख सापडणार नाहीं.

हे खरे कीं, राम, कृष्ण, शिव हे मोठमोठे चक्रवर्ति राजे पूर्वी होऊन गेले त्यांच्या सीता रुक्मिणी, पार्वती इत्यादि महाराण्या होऊन गेल्या पण सध्यां त्याच्या नावाने काय चालले आहे? महात्म्याच्या मूर्ति मंदिरात ठेवून 'महा- राज, शेठ सावकारजी! या दर्शन घ्या, चरणामृत घ्या व मूर्तीपुढे यथाशक्ति भेट ठेवा. अहो, लोक हो, सीताराम, लक्ष्मीनारायण, शिवपार्वती याच्या मूर्ति दर्शनीय आहेत, पण काय करावे याना तीन चार दिवसात कोणी भोग चढविला नाही, सीतेची नथ काल चोरीस गेली, कृष्णाचा शेला हरवला, लक्ष्मीनारायणाचे कपडे फाटले, या मूर्तीचा डोळाच उंदरानी नेला, तेव्हा डोळ्याला कवडी लावली! असे म्हणून त्याच्या नावाने पुजारी लोक भीक मागत फिरत आहेत! एक ना दोन, हजार गोष्टी सांगून भोग चढवा म्हणून धन लुबाडतात, रामलीला व रासमंडळ खेळतात आणि देवाची मूर्ति उभी पाहत असता हे खुशाल लोडाला टेंकून लोळत असतात कोठे ते सीताराम आणि कोठे त्याची ही मूर्तिपूजकानीं चालविलेली विटंबना!

---

## प्रकरण दहावें

# दयानंदांचा तत्त्वविवेक

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परि षस्वजाते।**
**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति॥**

—ऋग्वेद, १।१६४।२०.

**भावार्थ—**(१) जीवात्मा आणि (२) परमात्मा हे दोघे (तिसऱ्या) प्रकृतिरूप एका वृक्षावर बसले आहेत जीवात्मा कर्मफल भोगतो आहे परंतु परमात्मा काहीच फलभोग न करिता केवळ प्रकाशक होऊन राहिला आहे

मागील दोन प्रकरणात आम्ही प्रचलित धर्मपंथासंबंधीं स्वामीचे खंडनपर विचार सारांशरूपाने दिले आहेत ते वाचल्यावर मग सद्धर्म स्वरूपासंबंधीं स्वामींचे स्वतःचे म्हणणे तरी काय, असा प्रश्न सहजींच उत्पन्न होतो त्या प्रश्नाचाच खुलासा यापुढे प्रकरणशः करण्याचे योजले आहे

स्वामी दयानंदाच्या आयुष्याच्या अखेरच्या कांहीं वर्षांचा पत्रव्यवहार पाहिला तर ते ग्रंथरचना आणि त्यांची छपाई यात अत्यंत गढलेले दिसतात. त्यांच्या ह्या सांप्रदायिक साहित्यात सत्यार्थप्रकाश, ऋग्वेदादि भाष्यभूमिका, आणि संस्कारविधि हे ग्रंथ आर्यसमाजाच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचे दिसतात. त्याशिवाय ऋग्भाष्य (अपूर्ण), यजुर्भाष्य, गोकरुणानिधि (गोरक्षणासंबंधीं), पंच महायज्ञविधि, (नित्यकर्म), वेदांगप्रकाश (व्याकरणविषयक) आर्योद्देशरत्नमाला (शब्दव्युत्पत्ति), आर्याभिनय (वेदसूक्ति), असेही लहानमोठे ग्रंथ असून शिवाय पाखंडखंडन (भागवतपुराणस्फोट), अद्वैतखंडन, वेदान्तध्वांतिनिवारण वगैरे अनेक शास्त्रार्थांची लहान चोपडीही त्यांनीं वेळोवेळीं प्रसिद्ध केलीं.

श्रीज्ञानेश्वरांच्या भावार्थदीपिकेनंतर वामन पंडितांनीं आपल्या गीतेवरील टीकेस यथार्थदीपिका म्हणण्यांत जी खोंच दिसते तीच सायन माधवाच्या अनुभवप्रकाशानंतरच्या दयानंदांच्या सत्यार्थप्रकाश या नांवांत कोणास

दिसेल.§ इतर आधुनिक धार्मिक संस्थांत सत्यार्थप्रकाशादि ग्रंथासारखे सांप्रदायिक शास्त्रग्रंथ लिहिण्याचा उद्योग इतक्या विस्तृत प्रमाणावर दुसरा कोणी केल्याचें आढळत नाहीं, ही गोष्ट खरी ग्रंथाच्या आरंभी श्रीगणेशायनमः । अथवा हरिः ओ३म् असे मंगलाचरण करण्याची आधुनिक पौराणिकाची व तांत्रिकांची कल्पना टाकाऊ आहे असा प्रथम टोमणा देऊन आर्षग्रंथाप्रमाणे ओ३म् ह्या शब्दाने त्यांनीं आपल्या ग्रंथास आरंभ केला आहे. आणि ईश्वरनामव्याख्या नामक प्रथम समुल्लासात इंद्र वरुण, यम, अग्नि, विष्णु, वायु इत्यादि शंभर नावे शुद्ध परमेश्वरवाचक आहेत, असें यौगिकपद्धतीने त्या नावाचा विग्रह करून दाखविले आहे गौणिक, कार्मिक व स्वाभाविक असे परमेश्वराच्या नावाचे त्यानीं तीन भेद कल्पिले आहेत उदाहरणार्थ, परमेश्वर प्रकृति व जीव याच्या गुणानी विरहित असल्यामुळे निर्गुण व सर्वज्ञत्वादि गुण त्याच्यामध्ये असल्यामुळें, तोच सगुण आहे, असें ते मानतात जडामध्ये चैतन्याचे गुण नाहीत म्हणून ते जडासही निर्गुणच म्हणतात व जडाचे नैसर्गिक गुण त्यात असतात म्हणून त्यास सगुण मानतात

दयानंदाच्या सत्यार्थप्रकाशाला आर्यसमाजात इतके महत्त्व आहे, की त्या ग्रंथाला कित्येक पाचवा वेद असेंही मानतात. याप्रमाणे सारेच आर्यसमाजी जरी त्या ग्रंथास वेद म्हणून मानीत नसले, तरी महाभारतानंतर लौकिकदृष्टीने लिहिलेला इतका तार्किक आणि मनोरंजक ग्रंथ दुसरा झाला नाही, असे श्री० नरदेवशास्त्र्यां-सारख्या समतोल बुद्धीच्या पंडितांनींही म्हटले आहे यास्तव प्रथम सत्यार्थ प्रकाशातील दयानंदाचा तत्त्व विचार साररूपाने या प्रकरणात पुढे देत आहोत.

जीव आपली कर्तव्ये करण्यास स्वतंत्र पण परमेश्वराच्या व्यवस्थेत मात्र परतंत्र आहे म्हणजेच फल भोगण्यात तो परतंत्र आहे कर्मफलभोक्ता ईश्वर नसून तो जीवाकडून कर्मफलभोग करविणारा आहे ईश्वराच्या ठिकाणी तीन काल नाहीत. त्याच्या ठिकाणीं केवळ वर्तमानकालच आहे, म्हणून त्याला त्रिकालज्ञ म्हणणें योग्य होणार नाही जीव आपल्या स्वातंत्र्याने जे कर्म करतो, ते सर्वज्ञ ईश्वर

---

§ त्यावरही पुढे दयानंद तिमिरभास्कर, भास्करप्रकाश, भास्कराभास निवारण, धर्मदिवाकर आणि दिवाकरप्रकाश असे टीका प्रतिटीकारूप जे अनेक ग्रंथ झाले त्यांच्या नांवांतही हाच अभिनिवेश दिसून येतो

जाणतो. किंबहुना जें ईश्वर जाणतच असतो, तेंच जीव करतो. असें आहे तरी जीवाच्या स्वातंत्र्यांत कांहीं बिघाड होऊं शकत नाहीं. जीव परिच्छिन्न असून ईश्वर विभु आहे त्याच्यात जसा व्याप्यव्यापक संबंध आहे, त्याचप्रमाणे सेव्य-सेवक, आधारआधेय, स्वामि भृत्य, राजा-प्रजा, पिता पुत्र इत्यादि संबंध आहेत.

जीवब्रह्मैक्य दाखविण्याकरिता 'प्रज्ञान ब्रह्म', 'अहं ब्रह्मास्मि', 'तत्त्वमसि', 'अयमात्माब्रह्म,' ही वेदातील चार महावाक्ये आधार देतात परंतु ही वाक्ये वेदातील नसून ब्राह्मणग्रंथातील आहेत ऋषिप्रणीत शास्त्रात यास महावाक्ये असें म्हटलेलें नाही शिवाय ह्यांही चारी वाक्याचा वास्तविक अर्थ नूतन वेदान्ती करतात तसा अद्वैतपर होत नाही उदाहरणार्थः—'अहं ब्रह्मास्मि' याचा अर्थ मी ब्रह्मस्थ आहें इतकाच होतो आता सर्वच पदार्थ जरी ब्रह्मस्थ असले तरी जीवाला ब्रह्माचे ज्ञान होऊन तो मुक्तीमध्य ब्रह्माशी साक्षात्संबंध ठेवून राहतो. तशी इतर पदार्थांची स्थिति नाही. तथापि जीव हा ब्रह्माबरोबर 'तास्थ्य' अथवा तत्सहचरितोपाधि असला तरी त्यावरून दोघे एक असे ठरत नाही परमेश्वराच्या गुणकर्मस्वभावाच्या अनुकूल आपले गुणकर्मस्वभाव बनवून जीव ब्रह्माशी साधर्म्य जोडू शकतो. हें खरें, पण अशा स्थितीत जीव व ब्रह्म एक याचा अर्थ दोन्ही अविरोधी अथवा एक अव-काशस्थ आहेत, इतकाच समजावयाचा तत्त्वमसि या वाक्यात तत् या पदाचा अर्थ ब्रह्म असा करतात परंतु वास्तविक तेथे ब्रह्म या शब्दाची अनुवृत्तिच नाही. " सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीय ब्रह्म " ह्या आधारभूत गणलेल्या वचना-च्या पूर्वीच्या वाक्यातील शेवटला ब्रह्म शब्द मुळात नाही अर्थात् (तदात्मकस्त-दन्तर्यामी त्वमसि) त्या अंतर्यामी परमेश्वरानें युक्त असा, तू आहेस हाच तत्त्वमसि याचा वेदातील खरा अभिप्राय आहे अद्वितीय हे विशेषण जसे व्यावर्तक तसें प्रकाशकही असते अद्वितीय ह्याचा अर्थ तत्सम दुसरें काहीं नाही, इतकाच समजावा. त्याहून अन्य जगजीव मुळीच नाहीत, असा त्याचा अर्थ नसून, जीव व जग ह्याहून ब्रह्म हे अगदींच वेगळया प्रकारचे म्हणजेच अद्वितीय आहे, असें श्रुति सांगते

कार्योपाधि व कारणोपाधि याच्या योगानें ब्रह्मच जीवरूप व ईश्वररूप नसतें असें मानता येत नाहीं कारण ब्रह्मामध्ये स्वाश्रय स्वविषयक अनादि अज्ञान सर्वत्र मानल्यास ब्रह्म शुद्ध राहणार नाहीं. जर अज्ञानोपाधि परिच्छिन्न मानली तर ती उपाधि जेथें जेथें जाईल तेथील ब्रह्म अज्ञानी होईल, पूर्वानुभव राहणार नाहीं, असे

अनेक अनवस्थाप्रसग येतील उपाधि चंचल न मानल्यास अज्ञानी ब्रह्म व ज्ञानी ब्रह्म असे अखड ब्रह्माचे दोन खंड मानावे लागतील तात्पर्य, जीव हा अनादि, अनुत्पन्न व अमृतस्वरूप आहे त्याहून भिन्न असा ईश्वर आहे त्यालाच ब्रह्म म्हणावें चिदाभासालाच जीव मानले तर आभास हा क्षणभगुर असल्यामुळें मोक्ष सुखाचा अनुभव कोण घेणार ?

"द्वितीयाद्वै भयं भवति" [बृहदा०] या वचनातील द्विधाभाव, वैर किंवा दुजाभाव दर्शवितो "परमेश्वराशीं आपला काही सबध नाहीं" हीच द्वैतबुद्धि भयकारक मानली आहे आकाशावाचून द्रव्ये राहू शकत नाहीत. हा जसा त्यांचा अन्वय, त्याचप्रमाणे द्रव्ये आकाशाहून भिन्न असतात, हा त्याचा व्यतिरेकही पाहिला पाहिजे पण, साप्रतचे वेदान्ती काण्या पुरुषाप्रमाणे केवळ अन्वयाच्याच दृष्टीने एकत्व मानतात आणि व्यतिरेकाकडे दुर्लक्ष करतात वस्तुतः अन्वयव्यतिरेक, सगुणनिर्गुण, साधर्म्य वधर्म्य सामान्य विशेष हे भाव ज्यात नाहीत, असे एकही द्रव्य जगात नाही उदाहरणार्थ—प्रत्येक पदार्थामध्ये स्वाभाविक गुणामुळें सगुणता व विरोधी गुणांच्या अभावामुळे निर्गुणता सदैव असते त्याचप्रमाणे परमेश्वर ज्ञान, बल, क्रियादि गुणामुळे सगुण आणि रगरूपादि व रागद्वेषादि गुणाच्या अभावामुळे निर्गुणही आहे

**सृष्ट्युत्पत्ति**—परमेश्वरच सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, व प्रलय करतो [ऋग्वे०, म १०।१२९।७] प्रलयकाळी जग अव्यक्त असते त्यालाच सृष्टीच्या आरभीं परमेश्वर आपल्या सामर्थ्याने व्यक्त स्थितीत आणतो [ऋग्वे०, म १०।१२९।३]. परमेश्वर हाच जगदाधार होय [ऋग्वे०, म १०।१२१।१] प्रकृति, जीव व परमेश्वर हे तीनही अज अर्थात् अनादि आहेत अजामेकां लोहित शुक्ल कृष्णा इ० [श्वेता०, ४।५] द्वा सुपर्णा सयुजा सखाया समान वृक्षं परिष स्वजाते ॥ [ऋग्वे०, म. १।१६४।२०] या मत्राचा अर्थही "ब्रह्म व जीव हे दोनही चेतनत्व व पालन शक्ति या गुणांत सदृश आहेत. ते व्याप्यव्यापक भावामुळें सयुक्त आहेत. तसेच ते सनातन व अनादि मित्र आहेत; आणि या दोहोंप्रमाणेंच अनादि मूलरूप कारण व शाखारूप कार्य यानीं युक्त असा एक वृक्ष आहे, ह्याप्रमाणें शास्त्र द्वैतात्मकच आहे.

जगाची कारणें तीन आहेत. निमित्त, उपादान आणि साधारण. अखिल सृष्टीचें निमित्तकारण ईश्वर आहे. त्याचप्रमाणें ह्या ईशसृष्टीतील अनेक कार्यां-

न्तराचें निमित्तकारण जीवही आहे. परमाणु प्रकृति हें जगाचें उपादानकारण होय तसेंच ज्ञान, दर्शन, बल, हात इत्यादि साधारण कारणे होत. आधुनिक वेदान्त कोळ्याचा दृष्टान्त घेऊन (यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च ॥ मुण्डक. १।१।७). या मंत्राच्या आधारे अद्वैत सिद्ध करू पाहतात पण ते चूक आहे कोळ्याच्या दृष्टान्तांत कोळ्याचा जीवात्मा हा निमित्तकारण असून त्याचें शरीर हें उपादान-कारण तद्भिन्न आहे

"आदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा" ही माण्डुक्यावरील गौड पादीय कारिकाही भ्रामक आहे. कारण जे ज्ञात्याला प्रमाणांनी जाणता येते व अनुभवाला येते ते जग नाही असे म्हणता येणार नाही 'प्रलयकाली ते प्रसुप्त असते इतकेच (तम आसीत्तमसा गूढमग्रे ।–ऋग्वेद म १०।१२९।३ तसेच मनु, १-५ पहा ) अर्थात् वर्तमानकाळी त्याचा अभाव मानता येणार नाही परमे श्वराच्या ज्ञान, बल, क्रियादि गुणाची सार्थकता सृष्टि उत्पन्न केल्यानेच होणार आहे आळसामध्ये सुख नसून पुरुषार्थामध्येच सुख आहे जर परमेश्वराने जग उत्पन्न केले नसते तर पूर्व सृष्टीतील जीवाच्या कर्मांची फळे त्यास कशी देतां आली असती या कार्यकारणपरंपरेत बीजरूप कारण हेच आधी मानले पाहिजे कर्मांचें फल, कारणाचे कार्य, त्याचप्रमाणे कार्यास कारण असणे, हे नियम अढळ आहेत ते ईश्वरासही बदलता येणार नाहीत ईश्वर हा सर्वशक्तिमान् खरा पण सर्व शक्तिमान् याचा अर्थ नियमाविरुद्ध वर्तणारा असा नसून दुसऱ्या कोणाच्या-ही साहाय्यावाचून स्वसामर्थ्याने कार्य घडवून आणणारा असा आहे ईश्वर हा निराकार खरा, पण त्याचा अर्थ तो प्रकृतीपेक्षा सूक्ष्म असल्यामुळे तिला व्यापून जगदाकार घडवितो जगताची उत्पत्ति होण्याच्या पूर्वी परमेश्वर, प्रकृति, काल, आकाश आणि ( अनादि ) जीवाचे अस्तित्व, इतक्याची आवश्यकता आहे. मूळाचे मूळ नसतें, म्हणजे कारणाचे कारण नसतें म्हणून अकारण असें जें सर्व कार्यांचें कारण तेंच मूळ (अविकारी) कारण होय. परम सूक्ष्म कारणालाही अनित्य म्हणता येणार नाहीं. तसेंच सत्य कारणाचे कार्यही सत्यच असलें पाहिजे. "ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या" ह्या आधुनिक वेदान्तांतील सिद्धान्तात मिथ्या हा शब्द अनित्य या अर्थी न वापरतां अभाव या अर्थी वापर-तात, ती चूक आहे. स्वप्नाप्रमाणें किंवा रज्जुसर्पाप्रमाणें जगास मानतां येणार नाहीं. द्रव्य व गुण पृथक् राहूं शकत नाहींत कल्पक सत्य तर कल्पनाही सत्यच.

अज्ञात विषयाचे स्वप्न पडत नाहीं. जन्मांधाला स्वप्नातही रूपदर्शन होणार नाहीं. सर्पाभासांत सर्पाचा अभाव सिद्ध न होता, सत्यसर्पाचा भावच गृहीत असतो. सुषुप्तींतही बाह्य पदार्थाचें ज्ञान नसले तरी त्या पदार्थाचा स्वरूपतः अभाव नसतो. तात्पर्य ब्रह्म, जीव आणि प्रकृति हे तीन पदार्थ अनादि आणि नित्य आहेत

वेदादि शास्त्रात सृष्टीची उत्पत्ति ( तैत्तिरीय ), आकाश ( छांदोग्य ), अग्नि ( ऐतरेय ), जल ( वेद ), पुरुष, हिरण्यगर्भ ( मीमांसा ) कर्म, वैशेषिक काल ( न्याय ) परमाणु ( योग ) पुरुषार्थ, ( सांख्य ) प्रकृति, ( वेदान्त ) ब्रह्म, अशा निरनिराळ्या पदार्थांपासून झाली असे म्हटलें आहे हा वस्तुतः परस्परविरोध नाही महाप्रलयानंतर आकाशादि क्रमानेच सृष्टीची उत्पत्ति होते. परंतु लघुप्रलयात आकाश आणि वायु याचा प्रलय होत नाही तेव्हा अग्न्यादि क्रमाने सृष्टि उत्पन्न होते. तात्पर्य, ज्या ज्या प्रलयामध्यें जेवढ्यापर्यंत प्रलय होतो, तेथून पुन्हा सृष्टीची उत्पत्ति त्या पुढील अनुक्रमाने होते याप्रमाणें शास्त्रात विरोध नाहीं पुरुष आणि हिरण्यगर्भ ही परमेश्वराचीच नावे असल्यामुळे वेदांतही विरोध नाहीं किंवा आणखी एका तऱ्हेने पाहता [१] मीमांसेप्रमाणें असे कोणतेंही जगांत कार्य नाहीं की, ते कर्म केल्याशिवाय बनेल, [२] वैशेषिकामध्यें वेळावाचून काही होत नाही, [३] न्यायानुसार उपादान कारणाचे अस्तित्व जरूर असतें, [४] विद्या, ज्ञान आणि विचार त्यावांचून कांही होत नाही, असे योग म्हणतो, [५] सांख्याप्रमाणे तत्त्वाच्या मिलाफाशिवाय कांहीं बनत नाही आणि [६] वेदान्तात बनविणाऱ्यानें बनविलें नाही तर कांहीच होऊं शकणार नाही, असे सांगितले आहे. ज्या सहा कारणानी सृष्टि बनते, त्यापैकीं एकेकाची व्याख्या एकेका शास्त्रात केली आहे म्हणून साही शास्त्रात विरोध नसून आंधळे आणि हत्ती या सुप्रसिद्ध गोष्टीप्रमाणें वरील प्रत्येक शास्त्रीय सिद्धान्त खराच आहे

ज्या जीवाची कर्मे ईशसृष्टीमध्ये उत्पन्न होण्यासारखी बनतात त्यांसच सृष्टीच्या आरंभी ईश्वर जन्म देतो सृष्टीच्या आरंभी एकच मनुष्य किंवा दंपत्य उत्पन्न झाले नसून अनेक मनुष्ये उत्पन्न झाली होती, ही सारी ईश्वराची प्रजा प्रारंभीं युवावस्थेतच प्रगट झाली कारण, बालक झाले असते तर त्याचे पालन करण्यास दुसऱ्या माणसांची गरज लागती आणि वृद्ध असतें तर त्यांच्याकडून मैथुनी सृष्टि सुरू झाली नसती. " ये देवा साध्या ऋषयश्च यमग्रतो जात तम् "

असें म्हटलें आहे. यावरून जेव्हां ज्ञान व शरीर यांनी समाधि लावण्यास योग्य अशीं माणसें झाली, तेव्हांपासूनच मनुष्यव्यवहार सृष्टींत सुरू झाला असे दिसते. सृष्टीचा आरंभ होऊन एक अब्ज सत्त्याण्णव कोटि एकूणतीस लक्ष एकूणपन्नास हजार पाच इतकी वर्षे झाली तथापि सृष्टीची युवावस्था आरभापासून एक कोटि सत्तर लक्ष चवसष्ट हजार वर्षे लोटल्यावर सुरू झाली तोपर्यंत स्त्री पुरुषांचीं मानवी बीजे रजाच्या आवरणात युवावस्थेपर्यंत समाधिदशेत राहिली होती ही मनुष्याची सृष्टि प्रथम उत्तर ध्रुवाजवळच त्रिविष्टप (म्हणजे हल्लींचे तिबेट नव्हे) देशांत उत्पन्न झाली. देवऋषि पितर उत्तरध्रुवाजवळ प्रथमतः जन्मास आले. तेच सर्व गुणांनी श्रेष्ठ असे आर्य होत ते ज्या स्थानात राहण्यास आले, त्यास आर्यावर्त म्हणू लागले त्यांनीच हिमालयाला स्वर्गद्वार कल्पून आजच्या तिबेटासच त्रिविष्टप मानले

आर्यावर्ताशिवाय पूर्व, पश्चिम, उत्तर. वायव्य व ईशान्य या बाजूंच्या लोकांना दस्यु, म्लेच्छ असुर असे म्हणत, व नैर्ऋत्य, दक्षिण व आग्नेय या दिशाकडील लोकांस राक्षस म्हणत. तसेच आर्यावर्ताच्या बरोबर खालच्या पाताळ (अमेरिका) देशांतील लोकांस नाग म्हणत त्याच देशांतील उलपि नामक राजकन्येशीं अर्जुनानें विवाह केला. इक्ष्वाकु हाच आर्यावर्त वसविणारा पहिला राजा होय

मानवी सृष्टीचा हा विस्तार केवळ पृथ्वीवरच आहे असें नसून ज्या जातीची सृष्टि या लोकांमध्यें आहे त्याच जातीची सृष्टि अन्य लोकांमध्येही आहे [सूर्याचन्द्रमसौ धाता यथा पूर्वमकल्पयत् ॥ दिवंच पृथिवीं चान्तरिक्षमथो स्वः ॥ ऋग्वे०, म १०।१९०.] पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, चद्र, नक्षत्रें, व सूर्य हे सर्व निवासाचे हेतु असल्यामुळें त्यांस वसु असें म्हणतात [शतपथ, १४।६।७।४] जे वेद येथे आहेत ते तसेच सर्व लोकांतरीं आहेत

**बंधमोक्ष**—देहगेहादि अनित्य पदार्थास नित्य मानणें, चोरी, लबाडी इत्यादि अपवित्र पदार्थांस पवित्र मानणें, विषयसेवनरूप दुःखास सुख मानणे आणि अनात्म पदार्थाच्या ठिकाणीं आत्मबुद्धि ठेवणें, यांस अविद्या म्हणतात, आणि याहून वेगळें जे सत्यज्ञान त्यास विद्या म्हणतात. कर्म आणि उपासना यांनाही अविद्याच म्हणतात. कारण ते कियाविशेष आहेत, ज्ञानविशेष नाहींत. कर्मोपासनेचा (अविद्येनें) मनुष्य मृत्यूला तरून जातो. आणि यथार्थ ज्ञानाच्या विद्येनें मोक्षाला

प्राप्त होतो. यास्तव शुद्ध कर्मोपासना व ज्ञान यांची मोक्षप्राप्तीला आवश्यकता आहे उलट अपवित्र कर्म, प्रतीकोपासना, व मिथ्याज्ञान याच्या योगानेंच बंध होतो.

वंध आणि मोक्ष हे स्वाभाविक नाहीत, नैमित्तिक आहेत " न निरोधोन चोत्पत्तिर्न वद्धो न च साधकः ॥ न मुमुक्षुर्नैवमुक्त इत्येषा परमार्थता ॥ " ही माडुक्यावरील गौडपादीयकारिका वरोवर नाही कारण जीव हा अल्प असल्या-मुळे आवरणात येतो, जन्म घेतो, कर्मफलभोगात वद्ध होतो, मुक्त होण्यासाठीं साधने करतो, दु खनाशाची इच्छा करतो व अखेर मुक्त होऊन सुखी होतो हे सारे अनुभव जीवालाच घडतात जीव हा त्याचा केवळ साक्षी नसून कर्ता व भोक्ता आहे. कर्माचें साक्षी ते एकच अद्वितीय ब्रह्म आहे ब्रह्म निराकार, सर्व-व्यापक व कोणाहूनही पृथक नसल्यामुळे त्याचे प्रतिबिंब तोच जीव ही कल्पना चुकीची आहे सत्यसकल्प परब्रह्मालाच मिथ्या कल्पना करणारा जीव मानणे हा शुद्ध वेडेपणा होय तात्पर्य, मुक्तीमध्ये जीवाचे भौतिक शरीर नसते पण जीव विद्यमान असून तो ब्रह्मामध्ये राहून आपल्या सत्यसकल्पादि स्वाभाविक गुण व सामर्थ्याच्या योगाने आनदाचा भोग घेतो लिङ्ग शरीराच्या उत्पत्तीचा हेतुच आत्मा आहे, त्याचा जर अत्यन्त अभाव होत नाहीं तर लिंगदेहाचाही अत्यन्त अभाव होत नाही मात्र मुक्तीत जीव विवेकाने या प्राकृतिक लिङगशरीराचा अभिमानी होत नाही म्हणून त्या शरीराने व्यवहार करीत नाही जैमिनी, व्यास, व्यासाचा पिता बादरी याचे मत असेच आहे [अभाव वादरिराह ह्येवम् ॥–वेदान्तदर्शन,४।४।१० भाव जैमिनिर्विकल्पा मननात् ॥—वेदा०, ४।४।११ व १२ पहा] कठोपनिष-दातही " यदा पञ्चावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसासह ॥ बुद्धिश्च न विचेष्टते तामाहुः परमाङ्गतिम् ॥ २।६।१० (भावार्थः—जेव्हा शुद्धमनयुक्त पंचज्ञानेंद्रियें जीवासह राहतात व बुद्धीचा निश्चय स्थिर होतो, तेव्हा त्या स्थितीला मोक्ष असें म्हणतात.) असें म्हटले आहे हे मुक्त जीव सकल्पमय शरीरानें परमेश्वरात सर्वत्र संचार करतात आणि ब्रह्मायुष आहे तोपर्यंत जन्ममरणरूपी दुःखात येत नाहींत.(स खल्वेवं वर्तयन्यावदायुष ब्रह्मलोकमभि संपद्यतेनच पुनरावर्तते न च पुनरावर्तते० ॥—छादोग्य, ८।१५) पण ते एक महाकल्पपर्यंत ब्रह्मामध्ये आनदानें राहून नतर पुनः ससारांत येतात (ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥–मुडक, ३।२।६,) तसेंच ऋग्वेदातही परमात्मा मुक्तजीवास पुन्हा आईबापांच्या पोटीं घालतो असें आहे. ( अग्नेर्वय प्रथमस्या मृतानां मनामहे चारु देवस्य नाम ॥ सनोमह्या

अदितये पुनर्दात् पितरं च दृशेयं मातरं च ॥—ऋग्वे०, मं १।२४.) तात्पर्य, बंध जसा कायमचा नाहीं, तशी मुक्तिही नाहीं अनंत आनद, अनत कालपर्यंत भोगण्याचे सामर्थ्य, कर्म व साधन हीं जीवामध्यें नाहींत. शिवाय मुक्तीमधून जर जीव परत न येते तर जगाचा कधीच उच्छेद झाला असता मुक्तीच्या ठिकाणीं फार गर्दी झाली असती, दु:खाभावी सुखाचाही त्यास अनुभव घडला नसता तेव्हा हें ससारचक्र अव्याहत चालण्यास मुक्ति व पुनरावृत्ति याची आवश्यकता आहेच सत्यभाषण, सद्धर्म, सत्सगति, विवेक, वैराग्य, मुमुक्षुत्व हीं मुक्तीची साधने आहेत. श्रवण, मनन, निदिध्यास आणि साक्षात्कार याला श्रवण चतुष्टय म्हणतात ते मुमुक्षूने करावे त्याने दररोज निदान दोन तास ध्यान करीत जावे

मुक्त जीवाला भौतिक आणि स्वाभाविक गुणरूप अशीं दोन सूक्ष्म शरीरे असतात कारण, शरीर मूल प्रकृतीचे बनलेले असल्यामुळे ते सर्वत्र विभु व सर्व जीवाला मिळून एक असते या शरीराच्या योगाने जीवाना गाढ निद्रेचा अनुभव येतो. चवथ्या तुरीय शरीरात जाऊन जीव आनदरूप परमात्म्यात मग्न होतो ईश्वर हा सर्वत्र व्यापक असल्यामुळे सालोक्य, सामीप्य, सारूप्य, सायुज्य, ह्या पौराणिकाच्या चतुर्विध मुक्ति कावळे, कुत्रे किवा कीटक पतगादि क्षुद्र प्राण्यानाही सदैव असतात त्यात काहींच महत्त्व नाहीं मोक्ष म्हणजे गोलोक कैलासादि स्थानविशेषही नाहीं मुक्तीमध्ये मुक्तजीवाची अव्याहत गति असली पाहिजे. तो पाहिजे तेथें अप्रतिबंधपणे जाऊं शकेल. त्याला भय, शका, दुःख ही नसतील ह्या आनदमय स्थितीलाच मुक्ति म्हणावे. ही मुक्ति एकाच जन्मात मिळत नाहीं. अनेक जन्म घ्यावे लागतात. मृत्यूपासून पुन्हा जन्म घेईपर्यंत तो यमालयात म्हणजे आकाशस्थ वायूत राहतो. यासबधी गरुड पुराणातील कथा खोट्या आहेत तसेच परमेश्वरात जीवाचा लय होतो हे म्हणणेही खोटे आहे. (क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥—मुडक, २।२।८।। पहा)

जीव मनाने केलेल्या शुभाशुभ कर्माचे फल मनाने भोगतो, वाणीने केलेल्याचे वाणीने भोगतो व शरीरानें केलेल्याचें शरीरानें भोगतो. म्हणजे शारीरिक दुष्कर्माबद्दल वृक्षादि स्थावर जन्म, वाणीच्या पापास्तव पक्षी व मृग यांचा जन्म, आणि मानसिक दोषास्तव चांडालादि योनि मनुष्यास प्राप्त होते [मनु०, १२।८।९]. जीवाला प्राप्त होणाऱ्या जन्मभेदाप्रमाणें सुखाच्या अनुभवांतही भेद असतो.

सर्वांच्या स्थितींत सर्वांनाच सुख असतें असें नाहीं. ज्ञानाधिक्यानें आनंदाची वृद्धि होत असते. तात्पर्य, मनुष्यानें राजसी व तामसी कर्मांपासून निवृत्त होऊन सत्त्व-गुणयुक्ततेपासूनही मनाला मागें हटवावें आणि केवळ शुद्ध सत्त्वगुणयुक्त व्हावें, नंतर त्याचाही निरोध करून एकाग्र व्हावे. अर्थात् परमात्मा व धार्मिक कर्मे याच्या अग्रभागी मनाची स्थिरता करावी बाकीच्या सर्व ठिकाणापासून मनाला मागे हटवावे ( योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥२॥ तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम् ॥३॥ 'योगदर्शन' १, पा० १ )

**अद्वैतमतपरीक्षणः**—वेदान्ताचा विवर्तवाद खोटा आहे कारण रज्जूमध्यें सर्पाचे भान होण्याला जसे सर्पाचे अस्तित्व लागते, त्याचप्रमाणे ब्रह्मामध्यें जगाचें भान होण्यास जग ( स्वतंत्र ) असण्याची आवश्यकता आहेच सर्प व रज्जु या दोन्हीही वस्तुच असल्यामुळे वस्तूवर अवस्तूचा भास असें म्हणता येत नाही. वेदांती म्हणतात की, अज्ञान हा उपाधीचा धर्म आहे आणि ती उपाधि जड किंवा चेतन, सत्य की असत्य आहे, हे त्यास काहीच सांगता येत नाही म्हणून ते तिला अनिर्वचनीय म्हणतात, पण असे म्हणण्यात त्याच्यावर 'वदतो व्याघात्' असा दोष येतो सोन्यात पितळ मिळविल्यावर ते सोने का पितळ हे जर सोनारास सांगतां येत नाहीं, तर त्यात दोनही प्रकार आहेत असेंच त्यानी कबूल केलें पाहिजे

तसेंच, जो एकच पदार्थ असतो तो व्याप्य व व्यापक होऊ शकत नाही. निराकाराचा आभासही पडू शकणार नाहीं अंतःकरणोपाधीने ब्रह्मच जीव होतो, हें म्हणणे अविचाराचें आहे तसें मानलें असतां अंतःकरणाच्या चंचलतेनें दरएक क्षणाला ब्रह्माला बंधमोक्ष घडेल तसेंच ब्रह्म चेतन असल्याकारणानें त्याचा एक देश अज्ञानी झाल्यास त्याचा परिणाम-शरीरावरील फोडाप्रमाणे—सर्व ब्रह्मावर होईल. शिवाय आणखी अशी एक आपत्ति येते कीं, मथुरानगरींतील अंतःकरणविशिष्ट ब्रह्मानें जर एखादी गोष्ट पाहिली व थोड्या कालानें ते अंतः-करण काशीला गेले, तर त्याला तेथे ती गोष्ट आठवणार नाही, कारण मथुरेंतील ब्रह्म निराळे व काशीचे ब्रह्म निराळे. बरें ब्रह्म सर्वज्ञ म्हटले तर जीवही सर्वज्ञच मानावा लागेल उलटपक्षी नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभाववान् ब्रह्माला अनित्य, अज्ञानी, अशुद्ध व बद्ध मानावें लागेल. अखंड ब्रह्माला खंडित मानावें लागेल.

जर उपाधि कल्पित आहे, तर तिची कल्पना करतो कोण ? जें मिथ्या कल्पना करतें, तें सत्य कसें असूं शकेल ? तुम्ही सत्यासत्यास मिथ्या मानून त्याचे केवळ साक्षी आहांत असें म्हणाल, तर तुमची सत्यवाणी ही मिथ्या ठरून तुम्ही मिथ्या वादी व्हाल.आणि असत्याचे साक्षी म्हणून अप्रामाणिक ठराल.नसून भासणें ही तुमची मायेची व्याख्या कोणीही विचारवान् मानणार नाही "सन्मूलाः सोम्येमाः प्रजाः" या छांदोग्योपनिषदाच्या वचनाच्याही ती विरुद्ध आहे. "जीवोब्रह्माऽभिन्नश्चेतनत्वात्" हें निश्चलदासादि अद्वैत्यांचें विधान साधारण विचारी मनुष्यही करू शकणार नाहीं. कारण साधारण साधर्म्यमात्रानेंच ऐक्य ठरत नाहीं तेथें वैधर्म्य आहे कीं नाहीं तें पहावें लागतें उदाहरणार्थ—पृथ्वी आणि जल हे दोन्ही जड पदार्थ असले तरी त्यांस एकरूप म्हणतां येणार नाहीं त्याचप्रमाणें जीव आणि ब्रह्म यात वैधर्म्य असल्यामुळें त्यांस कधींही एक म्हणतां येणार नाहीं. वशिष्ठ, व्यास, वाल्मीकि हे वेदमतानुयायी होते. ते असलें मत कधींच प्रतिपादणार नाहींत. योगवाशिष्ठ ह्या ग्रंथाशी वशिष्ठ, वाल्मीकि किंवा रामचंद्र यांचा मुळींच सबध नाहीं. ते वेदवेत्ते होते व्यासांच्या उत्तरमीमांसेंतही खरोखर अद्वैतमत प्रतिपादिलेलें नाहीं. पण नूतन वेदांत्यास त्याचा खरा अर्थच कळला नाहीं. कसें तें पहाः—

सम्पाद्याऽऽविर्भावः स्वेन शब्दात् ॥१॥ ब्राह्मेण जैमिनिरुपन्यासादिभ्यः ॥२॥ चिति तन्मात्रेण तदात्मकत्वादित्यौडु लोमिः ॥३॥ एवमप्युपन्यासात् पूर्वभावाद-विरोधं बादरायणः ॥४॥ अतएव चानन्याधिपतिः ॥५॥—वेदांतदर्शन, सूत्र ४।४. सूत्र १।५।६।७।९.

| अद्वैत्यांचा अर्थ | सिद्धांत्यांचा अर्थ |
|---|---|
| (१) जें पूर्वी ब्रह्म असतें तेंच जीवरूपानें प्रगट होतें. | (१) जोंपर्यंत जीव पवित्र होणार नाहीं तोंपर्यंत त्याला अंतर्यामिन् ब्रह्म, योगैश्वर्य व पूर्ण आनद, यांची प्राप्ति होणार नाहीं |
| (२) अयमात्मा अपहतपाप्मा इ० उपन्यासांवरून ब्रह्मापासून जीव-स्थित होतो असें जैमिनीचें मत. | (२) जेव्हां योगी निष्पाप व योगैश्वर्य-युक्त होतो, तेव्हां तो ब्रह्माशीं मिळून आनदाचा उपभोग घेतो. |
| (३) तदात्मक स्वरूपनिरूपणादि बृह-दारण्यक वाक्यावरून जीव मुक्ती- | (३) जीव अविद्यादि दोषांचा त्याग करून चैतन्य मात्र स्वरूपानें राहतो |

| | |
|---|---|
| मध्यें चैतन्य मात्र असतो. | तेव्हांच त्याला तदात्मकत्व म्हणतात. |
| (४) जीव ब्रह्मच आहे असें व्यास म्हणतात. | (४) जीव मुक्त होऊन ब्रह्माशीं पूर्ण संबंध ठेवतो तेव्हा त्याला आपलें निर्मळ स्वरूप प्राप्त होतें |
| (५) योगी ब्रह्मस्वरूपांत स्थिर होतो. | (५) सत्यसंकल्प योग्यास मुक्तींत परमेश्वरप्राप्ति होऊन तो स्वाधीन व स्वतंत्र असा राहतो. सर्व मुक्त जीव एकाच योग्यतेचे असतात. |

जर असाच अर्थ न करावा तर खालील सूत्रांशीं विरोध येईल नेतरोनुपपत्ते १ भेदव्यपदेशाच्च ॥२॥ विशेषणभेदव्यपदेशाभ्या च नेतरौ ॥३॥ अस्मिन्नस्य च तद्योग शास्ति ॥४॥ अन्तस्तद्धर्मोपदेशात् ॥५॥ भेदव्यपदेशाच्चान्यः ॥६॥ गुहां प्रविष्टावात्मानौ हि तद्दर्शनात् ॥७॥ अनुपपत्तेस्तु न शारीरः ॥८॥ अतर्याम्यधिदैवाधिषु तद्धर्मव्यपदेशात् ॥९॥ शारीरश्चोभयेऽपि हि भेदेनैनमधीयते ॥१०॥ —वेदात०, १।१।१६—१७. १।२।२२. १।२।१९—२१. १।२।११—१३—१८—२०. इत्यादि वेदान्तसूत्रावरून जीवेश्वरभेद सिद्ध होत आहे. शिवाय जर ब्रह्माशिवाय दुसरा कोणताच पदार्थ नाहीं असें मानले तर सृष्ट्युत्पत्ति (उपक्रम) व प्रलय (उपसहार) हे ब्रह्मामध्येंच मानावे लागतील मग उत्पत्ति विनाशरहित ब्रह्म आहे, अशा वेदवाक्याशीं विरोध येईल शिवाय प्रलयानतरही जड व जीव कारणब्रह्मात राहूं शकतात, असें म्हटल्यानें अद्वैत्यांची उपक्रमोपसंहाराची व्यवस्थाही नीट लागत नाहीं.

---

## प्रकरण अकरावें

# दयानंदांचें मंतव्य

**संगच्छध्वं संवदध्वं संवो मनांसि जानताम् ।**
**देवा भागं यथापूर्वे सजानाना उपासते ॥**

—ऋग्वेद, १०।१९१।२.

**भावार्थ**—हे भक्तहो, तुम्ही सर्वत्र एक होऊन आपली प्रगति करा. उत्तम प्रकारचे सवाद करा तुमची सर्वांची मने सुसस्कृत होवोत त्याचप्रमाणे पूर्वकाळचे उत्तम ज्ञानी आणि व्यवहारचतुर लोक ज्याप्रमाणे स्वकर्तव्यनिष्ठ असत त्या प्रमाणे तुम्ही आपले कर्तव्य करीत रहा.

ज्याला सर्वतन्त्रसिद्धान्त असे म्हणता येते, ज्याला साम्राज्यधर्म किंवा सार्वजनिक धर्म असे म्हणतात, जो अनादिकालापासून चालत आला आहे, असे सर्वांनी मानले आहे, मानीत आहेत व मानतील, त्याला सनातनधर्म किंवा नित्यधर्म असे अन्वर्थक नाव आहे. या धर्माचा कोणीही विरोधी होऊ शकत नाही ज्याला सत्यवचनी, सत्यमानी, परोपकारी, नि.पक्षपाती, विद्वान् लोक मानतात, तेच सर्वांनी मानावे ज्याला ते मानीत नाहीत ते इतरांनीही मानण्यास योग्य नाही जी वेदादि शास्त्रांनीं व ब्रह्मयापासून तो जैमिनीमुनीपर्यंत सर्वांनीं मानलेलीं आहेत, त्या ईश्वररचित तत्त्वाला मीही मानीत असल्यामुळे, त्याना सर्वांच्यासमोर स्पष्टपणानें मांडतो तीं तीनही काळीं सर्वांनीं एकसारखी मानण्यास योग्य आहेत. नवीन मत सुरू करावे अशी माझी मुळीच इच्छा नाहीं. आर्यावर्तामध्ये व अन्य देशामध्ये ज्या धर्मयुक्त चालीरीति आहेत, त्याचा स्वीकार करावा व धार्मिक गोष्टींचा कधींही त्याग करू नये म्हणून माझा प्रयत्न आहे. मनुष्य त्याला म्हणतां येईल की, जो मननशील आहे, जो आपल्याप्रमाणेंच अन्यांलाही सुखदुःख, हानिलाभ समजतो. जो अन्याय करणाऱ्या बलिष्ठानाही भीत नाहीं व धर्मात्म्या निर्बलालाही भीत असतो अर्थात् जो होता होईल तितकें करून अन्याय करणाऱ्याऱ्या बलाची हानि व न्याय करणाऱ्याच्या बलाची उन्नति सर्व प्रकारें करीत असतो. अशा स्वरूपाची प्रस्तावना करून दयानद आपल्या मंतव्याचा खालीलप्रमाणें सक्षेपतः उल्लेख करतातः—

[१] **ईश्वर**—ज्यास ब्रह्म परमात्मादि नांवें आहेत तो ईश्वर सच्चिदानंद लक्षण-युक्त आहे. त्याचे गुणकर्मस्वभाव पवित्र आहेत. तो सर्वज्ञ, निराकार, सर्वव्यापक अजन्मा, अनन्त, सर्वशक्तिमान(आपल्या नियमाप्रमाणें स्वशक्तीनें सर्व कार्य करणारा दयाळु, न्यायकारी, सर्व सृष्टीचा धर्ता, हर्ता आणि सर्व जीवाना कर्मानुसार सत्य-न्यायपूर्वक फलदाता इत्यादि लक्षणयुक्त परमात्मा आहे. (बाबा छज्जुसिग अभि-मानपुरःसर असें सागतात कीं, ईश्वरासबधीं इतकी सम्यक् कल्पना हिंदु, ख्रिस्ती, इस्लामी इ० धर्मात किंवा थिऑसफी-आदि पंथात दुसरी कोठेच आढळत नाही )

[२] **वेद**—चारी वेद ( विद्याधर्मयुक्त ईश्वरप्रणीत संहितामत्रभाग ) हे निर्भ्रान्त स्वतः प्रमाण आहेत आणि चारी वेदाचे ब्राह्मण, सहा अगे, सहा उपांगे चार उपवेद आणि ११२७ वेदाच्या शाखा या ब्रह्मादि ऋषींची वेदांवरील व्याख्यानरूपानें असल्यामुळे परतः प्रमाण (वेदानुकूल असतील तर प्रमाण) आहेत.

[३] **धर्म**—जो पक्षपातरहित, न्यायाचरण व सत्यभाषण यानी युक्त आणि ईश्वराच्या आज्ञेशीं अविरोधी तो धर्म* व ह्याच्या उलट तो अधर्म होय.

[४] **जीव**—जो इच्छा द्वेष, सुख दुःख, आणि ज्ञानादि गुणयुक्त असून नित्य व अल्पज्ञ आहे तो जीव होय

[५] **जीवेश्वरसंबंध**—आकाश आणि मूर्तिमान् पदार्थ ज्याप्रमाणें अभिन्न असून भिन्नही आहेत, त्याप्रमाणें परमेश्वर आणि हे जीव व्याप्यव्यापक उपास्य-उपासक, पितापुत्र इत्यादि सबधयुक्त आहेत.

[६] **अनादि पदार्थ**—ईश्वर, जीव आणि प्रकृति हीं तीन अनादि आहेत. या तिघांस उद्देशून शास्त्रात अज शब्द वापरला आहे

[७] **प्रवाहानें अनादि**—पदार्थांचा संयोगवियोग व मधली स्थिति हीं तीन प्रवाहानें अनादि आहेत

[८] **सृष्टि**—पृथक् द्रव्याचे ज्ञानयुक्तिपूर्वक संमेलन होऊन नानारूपें बनणें यासच सृष्टि म्हणतात.

[९] **सृष्टीचें प्रयोजन**—जीवांस त्याच्या कर्माचा यथावत् भोग मिळावा हेच सृष्टीचे प्रयोजन असून ईश्वराच्या सामर्थ्याची त्यांत सफलता आहे.

---

*आर्यलेखक बाबा छज्जुसिग असें म्हणतात कीं, दुसऱ्या कोणत्याही धर्म-पंथांत धर्मरहस्य ठरविण्याचे कामीं बुद्धीस जें महत्त्व दिलें नाहीं तें दयानदांच्या आर्यधर्मीत दिलेलें आहे. (!)

[१०] **सृष्टिकर्ता**—सृष्टि सकर्तृक आहे.

[११] **बंध**—हा अविद्यानिमित्त आहे

[१२] **मुक्ति**—सर्व दुःखापासून सुटून बन्धरहित होत्साते सर्वव्यापक ईशतत्त्व आणि त्याची सृष्टि यांत स्वेच्छेने नियतकालपर्यंत विचरणे याचें नाव मुक्ति. हा मुक्तीचा आनद भोगल्यावर जीवाला ससारात पुनरावृत्ति आहेच. जीवाचें सामर्थ्य व त्याचीं साधने परिमित असल्यामुळें त्यास अनन्त फल किंवा कायमची मुक्ति मिळणें शक्य नाहीं

[१३] **मुक्तीचें साधन**—ईश्वरोपासना, योगाभ्यास, ब्रह्मचर्यपूर्वक विद्या-प्राप्ति, आप्त आणि विद्वान् याची सगति, सत्यविद्या, सुविचार, पुरुषार्थ इ० मुक्तीची साधनें आहेत

[१४] **अर्थ**—धर्माने जो प्राप्त तोच अर्थ होय

[१५] **काम**—धर्म आणि धर्मानुसार अर्थ यानीं प्राप्त होणाऱ्या अभिलाषेला काम म्हणावे

[१६] **वर्णाश्रम**—गुणकर्म आणि स्वभाव यावरून वर्णाश्रम ठरतो (बालपणी गुणकर्मस्वभाव कळेतो जन्मावरूनच वर्ण ठरवावा असें आर्यपडित लाला रलाराम खुलासा करतात)

[१७] **राजा**—जो शुभ गुणकर्मस्वभावाने प्रकाशित, पक्षपातरहित, न्याय धर्माचे सेवन करणारा, प्रजेशी पितृवत् वागून प्रजेला पुत्रवत् मानून तिची उन्नति व सुख वाढविण्यासाठी यत्न करणारा, त्यासच राजा म्हणावें.

[१८] **प्रजा**—वरील धर्माने राहून राजा व प्रजा या उभयताच्या उन्नती-साठीं झटणारी व वरील प्रकारच्या राजाशीं द्रोहरहित व पुत्रवत् वागणारी तीच प्रजा होय.

[१९] **न्यायकारी**—जो सदा विचारपूर्वक असत्याला सोडून सत्याचे ग्रहण करतो, अन्यायी लोकाचा रोध करून न्यायीजनांस बढती देतो, आणि जो आपल्या आत्म्याप्रमाणेच सर्वाच्या सुखाची इच्छा करतो, त्यास न्यायकारी म्हणावें.

[२०] **देव**—विद्वान् म्हणजेच देव, अविद्वान् तेच असुर, पापी हेच राक्षस, आणि अनाचारी यांसच पिशाच्च जाणावें.

[२१] **देवपूजा**—विद्वान्, माता, पिता, आचार्य, अतिथि, न्यायकारी राजा,

धर्मात्मे पुरुष, पतिव्रता स्त्री, आणि स्त्रीव्रत पुरुष यांचा सत्कार करणें ह्यासच देवपूजा म्हणतात याहून निराळी ती (प्रतिमापूजनादि) अदेवपूजा होय

[२२] **शिक्षण**—जिच्या योगानें विद्या, सभ्यता, धर्मात्मता, जितेंन्द्रियता इत्यादि गुणाची वाढ होते आणि अविद्यादि दोष सुटतात तीस शिक्षा म्हणावें.

[२३] **पुरुष**—ब्रह्मादि महर्षींनी रचित जे ऐतरेयादि ब्राह्मण, हेच पुराण, इतिहास, कल्प, गाथा आणि नाराशसी होत भागवतादि ग्रंथ नव्हत (महाभारत व रामायण यास दयानद मानीत होते असें आर्य इतिहासकार श्रीनरदेवशास्त्री म्हणतात )

[२४] **तीर्थ**—ज्याच्या योगाने दुःखसागरातून पार होता येते, असें सत्यभाषण, विद्या, सत्सग, यमादि योगाभ्यास, पुरुषार्थ, विद्यादान, इत्यादि शुभ कर्म यांसच तीर्थ म्हणावें इतर जलस्थलादि तीर्थ नव्हत.

[२५] **पुरुषार्थ**—पुरुषार्थ प्रारब्धापेक्षा श्रेष्ठ होय कारण, त्याच्या योगानें सचित प्रारब्ध बनतें, तो सुधारला असता सर्व सुधारतें, व तो बिघडला असतां सर्व बिघडतें.

[२६] **मनुष्य**—सुखदुःख लाभहानीच्या समयीं सर्वांशी यथायोग्य स्वात्मवत् वर्तणे हेच मनुष्याचें श्रेष्ठ कर्तव्य होय

[२७] **संस्कार**—ज्याच्या योगाने शरीर, मन आणि आत्मा उत्तम होतात ते संस्कार होत ते निषेकादि व स्मशानान्त सोळा प्रकारचे आहेत. ते पाळणें आपले कर्तव्य आहे शरीरदहनानतर मृतात्म्याकरता काहींच करण्याचें कारण नाही. [ कारण त्यानतर जीव आपल्या गत्यनुसार कोठें जातो तें कळत नाही ]

[२८] **यज्ञ**—ज्यांत विद्वानाचा सत्कार, शिल्प, रसायन, इत्यादि पदार्थविद्येचा यथायोग्य उपयोग, विद्यादि शुभगुणाचें दान आणि अग्निहोत्रादि करून ज्याचे योगाने वायु, वृष्टि, जल, औषधि याची पवित्रता होऊन सर्व जीवाना सुख मिळतें तो यज्ञ होय.

[२९] **आर्य**—श्रेष्ठ माणसास आर्य व दुष्टांस दस्यु म्हणावें

[३०] **आर्यावर्त**—सृष्टीच्या आदिकालापासून जेथें आर्यलोक राहतात, त्या भूमीस आर्यावर्त म्हणतात याच्या चतुःसीमा उत्तरेस हिमालय, दक्षिणेस विंध्याचल, पश्चिमेस अटक, आणि पूर्वेस ब्रह्मपुत्रा याप्रमाणें आहेत. या चतुःसीमेंत जे नेहमीं राहतात ते आर्यलोक समजावे. ( वरील लक्षण मनूच्या वचनाप्रमाणें

(२–२२) आहे. परतु त्यानंतर आर्यांची वस्ती जास्त पसरल्यामुळें आजचा सगळा भारतवर्ष हा आर्यावर्त होय असें श्री० नरदेवशास्त्री म्हणतात).

[३१] **आचार्य**—जो सागोपाग वेदविद्येचा अध्यापक असून सत्याचाराचें ग्रहण व मिथ्याचाराचा त्याग करतो व करवितो त्यास आचार्य म्हणावें.

[३२] **शिष्य**—सत्यशिक्षण आणि विद्या यांचे ग्रहण करण्यास योग्य असा जो धर्मात्मा विद्याग्रहणाची इच्छा धरून आचार्यांचे प्रिय करतो तो शिष्य होय.

[३३] **गुरु**—माता, पिता, आणि जो सत्याचे ग्रहण करवून असत्य सोडा. वयास लावतो तो, यांस गुरु म्हणावें

[३४] **पुरोहित**—यजमानाचा हितकारी व सत्योपदेष्टा तो पुरोहित होय.

[३५] **उपाध्याय**—जो वेदाचा एक देश किंवा अग यांचें अध्यापन करतो तो उपाध्याय.

[३६] **शिष्टाचार**—धर्माचरणपूर्वक ब्रह्मचर्यानें विद्येचे ग्रहण आणि प्रत्यक्षादि प्रमाणानी सत्यासत्याचा निर्णय करून सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग, यासच शिष्टाचार म्हणावे व असे वागणाऱ्यास शिष्ट म्हणावे.

[३७] **अष्टविध प्रमाणें**—प्रत्यक्षादि आठ प्रमाणे.

[३८] **आप्त**—यथार्थ वक्ता व धर्मात्मा असून जो सर्वांच्या सुखाकरिता यत्न करतो त्यास आप्त म्हणावे

[३९] **परीक्षा**—परीक्षा पांच प्रकारची असते. (१) वेद व ईश्वराचे गुण-कर्म स्वभाव, (२) प्रत्यक्षादि आठ प्रमाणें, (३) सृष्टिक्रम, (४) आप्तांचा व्यवहार; (५) आपल्या आत्म्याची पवित्रता, यास अनुकूल तें सत्य व प्रतिकूल तें असत्य जाणावें.

[४०] **परोपकार**--ज्याच्या योगानें मनुष्याचें दुःख व दुराचार जाऊन सुख व सदाचार वाढेल तो परोपकार होय

[४१] **स्वतंत्र व परतंत्र**--जीव आपल्या कर्मात स्वतत्र असून फल-भोगांत ईश्वरी व्यवस्थेनुसार परतंत्र आहे त्याचप्रमाणें ईश्वर आपल्या सत्या-चारादि कामात स्वतंत्र आहे.

[४२] **स्वर्ग**--सुखविशेष भोग आणि त्यांच्या सामग्रीची प्राप्ति हा स्वर्ग होय

[४३] **नरक**—दुःखविशेष भोग व त्यांच्या सामुग्रीची प्राप्ति तो नरक

[४४] **जन्म**—शरीर धारण करून प्रगट होणे म्हणजे जन्म त्यात मागचा, मधला आणि पुढचा असे तीन प्रकार आहेत.

[४५] **मृत्यु**—शरीराचा संयोग म्हणजे जन्म. वियोग म्हणजे मृत्यु

[४६] **विवाह**—स्वेच्छापूर्वक आणि नियमपूर्वक जें उघड रीतीने पाणि-ग्रहण करणे त्यास विवाह म्हणतात

[४७] **नियोग**—मरणादि कारणांनीं पतिपत्नीचा वियोग झाला असतां किंवा नपुंसकत्वादि कायमच्या व्याधि प्राप्त झाल्या असता, स्त्रीपुरुषांनी आपल्या वर्णाच्या किंवा आपल्याहून श्रेष्ठ वर्णाच्या स्त्री किंवा पुरुषाशी विधिपूर्वक नियुक्त होऊन संतानोत्पत्ति करणे यास नियोग म्हणतात *

[४८] **स्तुति**—गुण, कीर्तन, श्रवण व ज्ञान होणे, यास स्तुति म्हणावें या-पासून प्रीति आदि फलें प्राप्त होतात

[४९] **प्रार्थना**—आपल्या सामर्थ्याचे उपरान्त ईश्वराकडूनच जे विज्ञानादि प्राप्त व्हावयाचे, त्यासाठी ईश्वराजवळ याचना करणे यास प्रार्थना म्हणावे त्याचें फल निरभिमानादि प्राप्त होते

[५०] **उपासना**—ईश्वराचे गुणकर्म स्वभाव जसे पवित्र आहेत, तसे आपले करणें, व ईश्वर हा सर्व व्यापक व आपण व्याप्य आहोत, हें जाणून ईश्वर आणि आपण एकमेकासमीप आहोत, असा निश्चय योगाभ्यासानें साक्षात्कृत करणे, यास उपासना म्हणावे हिचे फळ ज्ञानाची उन्नति आदि आहे व्यक्तीची उपासना म्हणजे संध्या एकांतिक व निर्गुण असावी पण सामुदायिक उपासना म्हणजे यज्ञ तसेंच संस्कारविधि ही बाह्यांगपूर्ण व सगुण असावीत व्यक्तीच्या उपासनेत देह-बुद्धि सुटणे जितकें जरूर तितकेंच सामाजिक धर्मविधीत आपल्या व इतरांच्या

---

*याबद्दल श्री० नरदेवशास्त्री म्हणतात कीं, नियोग हा वेदानुकूल असला तरी वेदविहित नाही. तो केवळ आपत्कालिक धर्म आहे. ज्या वेळी लोक विशेष शुद्ध व धार्मिक होते, त्या वेळींच हा आचार शुद्ध मानला जात असे परंतु आजचा समय तसा नाही, राजनियम, परिस्थिति व लोकस्थिति हीं पण अनुकूल नाहींत. तेव्हा कलियुग संपून पुन्हा सत्ययुग सुरू होईपर्यंत हा आचार पाळणें अनर्थावह आहे. उलटपक्षीं कोणी आर्यलेखक नियोगपद्धति ख्रिस्ती धर्मातही आहे, वगैरे कारणें दाखवून त्याचें समर्थन करतात.

देहबुद्धीबद्दल आणि सगुण व साकार उपकरणांबद्दल आस्था ठेवणें जरूर असतें. असें दयानदांचें मत प्रो० चमूपति सांगतात.

[५१] **सगुणनिर्गुण स्तुतिप्रार्थनोपासना**—परमेश्वराचे ठिकाणीं जो गुण आहे, त्यानें तो युक्त आहे व जो नाहीं त्यानें तो अयुक्त आहे, अशी त्याची प्रशसा करणे ही सगुण-निर्गुण स्तुति होय शुभगुणाच्या प्राप्तीची इच्छा आणि दोष सुटावे म्हणून परमेश्वरी साहाय्याची याचना ही सगुण-निर्गुण प्रार्थना, आणि सर्व गुणांनीं अलकृत व सर्व दोषानीं रहित असा परमेश्वर आहे असे मानून आपल्या आत्म्यास त्यास (त्याच्या इच्छेस) अर्पण करणे ही सगुण निर्गुणोपासना होय.

दयानदांचीं जी एकावन मतव्ये वर दिलीं आहेत त्याचीच सुधारून वाढविलेली आवृत्ति म्हणजे आर्योद्देशरत्नमाला होय. प्रत्येक आर्यानें ती आदरपूर्वक कठीं धारण केली पाहिजे अशी आहे. म्हणजे प्रत्येक आर्यास हे उद्देश मान्य असावे लागतात, असें समजतें यास्तव तीही आम्ही यापुढें देत आहोत. यातील काही व्याख्या पूर्वी मतव्यात दिल्याप्रमाणेच आहेत खऱ्या, पण ही शभर रत्नाची माला अखडित असावी म्हणून आम्ही वगळ न करता ती सारीच वाचकास सादर करीत आहोत ह्यात व्याख्येकरिता जरी पुन्हा पूर्वीचे शब्द कित्येक ठिकाणीं घेतले असले तरी व्याख्येत फरक केला आहे असेंही आढळेल

[१] **ईश्वर**—ज्याचे गुणकर्मस्वभाव (अनुक्रमाक ७८ पहा) आणि स्वरूप सत्य आहे. जो केवळ चेतनमात्र (म्हणजे ज्ञेयशून्य केवळ ज्ञप्तिमात्र असा नव्हे) वस्तु आहे. जो अद्वितीय (अर्थात् वेदान्ती मताप्रमाणे नव्हे) सर्व शक्तिमान्, निराकार, सर्वत्र व्यापक, अनादि, अनत, आदि, सत्य, गुणवान् आहे. ज्याचा स्वभाव अविनाशी, ज्ञानी, आनन्दी, शुद्ध न्यायकारी, दयाळू, अजन्मा इत्यादि प्रकारचा आहे, जगाची उत्पत्ति, पालन आणि विनाश करणें, त्याचप्रमाणें सर्व जीवाना त्यांच्या पापपुण्यानुसार बरोबर फळ देणे हे ईश्वराचें काम आहे.

[२] **धर्म**—ईश्वराच्या आज्ञेचें यथावत् पालन, आणि पक्षपातरहित न्यायाने सर्वहित करणें हें त्याचें स्वरूप आहे. तो प्रत्यक्षादि प्रमाणानें सिद्ध असून वेदोक्त (अनुक्रमाक ९५ पहा) असल्यामुळें सर्व मानवानीं तोच एक मानणें योग्य आहे.

[३] **अधर्म**—ईश्वराची आज्ञा न मानतां पक्षपाती व अन्यायी होऊन विवेक

न करितां स्वार्थपर असणें हें त्याचें स्वरूप आहे. जो अविद्या, हठ, अभिमान, क्रूरता इत्यादि दोषांनीं युक्त असल्यामुळें वेदविद्येच्या विरुद्ध असून सर्व लोकांनीं सोडण्यासारखा आहे, तो अधर्म होय.

[४] **पुण्य**—विद्यादि शुभगुणाचें दान आणि सत्यभाषणादि सत्याचार म्हणजे पुण्य (पुण्य हें परिणामानुयायी नाहीं तसेंच कोणतेंही अविचाराचें कर्म निष्कामनेनें पुण्यरूप होत नाहीं अखेर दुष्परिणामी होणारी हिंदूंची दानपद्धति पुण्यमय ठरत नाहीं)

[५] **पाप**—पुण्याच्या उलट तें पाप.

[६] **सत्यभाषण**—असंभवादि दोषरहित असें जे आपल्या मनात असेल तेंच बोलणें

[७] **मिथ्या भाषण**—सत्य भाषण नव्हे तें

[८] **विश्वास**—ज्याचें मूळ (basis), अर्थ (aim) आणि फळ (result) हीं निश्चयेंकरून सत्य आहेत त्यास विश्वास म्हणावे.

[९] **अविश्वास**—जो विश्वास नव्हे–जो तत्त्व–अर्थशून्य तो अविश्वास.

[१०] **परलोक**—जेथे सत्यविद्येच्या योगानं परमेश्वराची प्राप्ति होते आणि तत्प्राप्तीनें इहपरजन्मीं किंवा मोक्षावस्थेंत परमसुख प्राप्त होतें, तो परलोक

[११] **अमरलोक**—परलोकाहून उलट जेथे दुःखविशेष भोगावे लागतें तो.

[१२] **जन्म**—एखाद्या शरीराशी संयुक्त होऊन जीव कर्म करण्यास समर्थ होतो, त्यास जन्म असे म्हणतात. (मोक्षावस्थेतही जीव क्रियासमर्थ असतो, पण त्या वेळीं त्याचे शरीर पांचभौतिक नसून त्याच्या क्रियाही मृत्युलोकींच होतात असा निर्बंध नसतो शिवाय त्या वेळीं सुखाप्रमाणें दुःखाचा अनुभव येण्याचा संभव नसतो.)

[१३] **मरण**—ज्या शरीराचे धारण करून जीव क्रिया करण्यास समर्थ होतो त्या शरीराचा व जीवाचा वियोग

[१४] **स्वर्ग**—विशेष सुख किंवा सुखसाधनें यांची जीवास प्राप्ति

[१५] **नरक**—विशेष दुःख किंवा दुःखाच्या कारणाची जीवास प्राप्ति

[१६] **विद्या**—ईश्वरापासून पृथ्वीपर्यंत पदार्थांचें सत्य विज्ञान होऊन त्याचा यथायोग्य विनियोग होत आहे, त्यास विद्या म्हणावें.

[१७] **अविद्या**—विद्येच्या उलट भ्रम, अंधकार अथवा अज्ञानरूप ती अविद्या.

[१८] **सत्पुरुष**—सत्यप्रिय, धर्मात्मा, विद्वान्, सर्वांचें हित करणारा आणि महत्त्वाकांक्षी (महाशय) अशा पुरुषास सत्पुरुष म्हणावें. (अर्थात् निरिच्छ, निरुद्योगी आणि आळशी असे दिसणारे जे बैरागी, साधु, संन्याशी वगैरे ते सत्पुरुष नव्हत.)

[१९] **सत्संग-कुसंग**—ज्याचे योगाने असत्य सुटून सत्याची प्राप्ति होते तो सत्संग आणि ज्याच्या योगानें जीव पापाचे पाशांत पडतो तो कुसंग होय.

[२०] **तीर्थ**—विद्याभ्यास, सुविचार, ईश्वरोपासना, धर्मानुष्ठान, सत्यसंग, ब्रह्मचर्य, जितेंद्रियता इत्यादि जी उत्तम कर्में आहेत तीं सारीं तीर्थें होत कारण, त्यांच्या योगानें जीव दुःखसागर तरून जाण्यास समर्थ होतो

[२१] **स्तुति**—ईश्वर किंवा दुसरा एखादा पदार्थ याचे गुण, ज्ञान, कथन, श्रवण आणि सत्य-भाषण यांस स्तुति म्हणावें

[२२] **स्तुतीचें फळ**—गुणज्ञानाच्या योगानें गुणवानाबद्दल प्रीति उत्पन्न होणें हे स्तुतीचे फळ (येथे प्रीति या शब्दाचा अर्थ यथार्थ कल्पना इतकाच घ्यावा)

[२३] **निंदा**—मिथ्या ज्ञान, मिथ्या भाषण, असत्यमय आग्रहादि क्रिया ज्याच्या योगानें गुण सोडून त्या ठिकाणीं अवगुणाचा आरोप होतो ती निंदा

[२४] **प्रार्थना**—उत्तम कर्मांच्या सिद्धीकरितां आपल्या पूर्ण प्रयत्नानंतर परमेश्वराचे किंवा दुसऱ्या कोणा सामर्थ्यवान् व्यक्तीचे साहाय्य घेणे यास प्रार्थना म्हणतात

[२५] **प्रार्थनेचें फळ**—अभिमानाचा नाश, आत्म्याच्या ठिकाणी आर्द्रता, गुणग्रहणाचे कामी पुरुषार्थ आणि प्रीति हीं प्रार्थनेचीं फळे होत.

[२६] **उपासना**—ईश्वराच्या आनंदस्वरूपात आपला आत्मा जेणेकरून मग्न होऊन रहातो ती उपासना.

[२७] **निर्गुणोपासना**—शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, संयोग, वियोग, हलका, भारी, अविद्या, जन्म, मरण आणि दुःख इत्यादि गुणानीं विरहित असा परमात्मा आहे असे जाणून जी उपासना ती निर्गुणोपासना. (निर्गुणात गुणधर्मांचा सर्वथा अभाव असतो असें नव्हे अभाव असतो, पण तो दुर्गुणाचा व जन्ममृत्यु इत्यादि धर्मांचा असतो.)

[२८] **सगुणोपासना**—ईश्वरास सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, शुद्ध, नित्य, आनंद, सर्वव्यापक, एक सनातन सर्वकर्ता, सर्वाधार, सर्वस्वामी, सर्वनियन्ता, सर्वान्तर्यामी, मंगलमय, सर्वानंदप्रद, सर्वपिता, सर्वजगत्कर्ता, न्यायकारी, दयाळु, आदि सत्य

गुणांनीं युक्त जाणून त्याची जी उपासना करणे ती. (निर्गुणोपासनेंत जसा गुणाभाव नाहीं तसा उलट सगुणोपासनेंत आकारमानरूप इत्यादि गुण येत नाहींत.)

[२९] **मुक्ति**—दुष्कर्म आणि जन्ममरणादि दुःखसागर यांतून सुटका होऊन सुखरूप परमेश्वराला प्राप्त होत्साते केवळ सुखात राहणे याला मुक्ति म्हणावें

[३०] **मुक्तीचीं साधनें**—पूर्वोक्त ईश्वराची स्तुति, प्रार्थना आणि उपासना करणें, धर्माचरण, पुण्याचरण, सत्सग, विश्वास, तीर्थसेवन, सत्पुरुषाचा सग, परोपकारादि शुभकर्म आणि दुष्टकर्मापासून पराङ्मुखता हीं मुक्तीचीं साधने होत

[३१] **कर्ता**—जो कर्म करण्यात स्वतत्र आहे व ज्याचे आधीन सर्व साधनें आहेत तो कर्ता होय.

[३२] **कारण**—ज्याचे ग्रहण करून कर्ता कोणतेंही कार्य किंवा पदार्थ करतो, अर्थात् ज्याच्या साह्यावाचून कोणतीही वस्तु तयार होत नाहीं, तें कारण. ते तीन प्रकारचें आहे

[३३] **उपादान कारण**—ज्याचे ग्रहण करूनच काही उत्पन्न होऊ किंवा बनू शकतें. ज्याप्रमाणें मातीपासून घट तयार होतो त्यास उपादान कारण म्हणावे

[३४] **निमित्त-कारण**—कुंभाराप्रमाणे वस्तु तयार करणारा

[३५] **साधारण-कारण**—दड, दिशा, आकाश, प्रकाश इत्यादि

[३६] **कार्य**—पदार्थ, सयोगविशेषाने स्थूलरूपास येऊन जे कामास येतें, अर्थात् जे करणे योग्य आहे, ते कारणाचे कार्य होय

[३७] **सृष्टि**—कर्त्याच्या रचनेने कारणद्रव्याच्या सयोगविशेषाने अनेक प्रकारच्या कार्यरूपास प्राप्त होऊन साप्रत व्यवहारयोग्य झाली आहे ती सृष्टि.

[३८] **जाति**—जी जन्मापासून मरणापर्यंत असते, जी अनेक व्यक्तींत एकरूप असते, जी मनुष्य, गाय, घोडा आणि वृक्षसमूह याप्रमाणे ईश्वरकृत असते ती जाति होय (ब्राह्मणादि जाति नव्हत, कारण त्या बदलतात)

[३९] **मनुष्य**—जो विचार केल्यावाचून कोणते काम करीत नाही तो मनुष्य.

[४०] **आर्य**—जो श्रेष्ठस्वभाव, धर्मात्मा, परोपकारी, सत्य, विद्यादि गुणयुक्त असून जो आर्यावर्त देशात नेहमीं राहणारा आहे तो.

[४१] **आर्यावर्त**—हिमालय, विन्ध्याचल, सिन्धुनदी, आणि ब्रह्मपुत्रा नदी यांचेमधील देशविभाग तो.

[४२] **दस्यु**—डाकू, चोर, हिंसकादि दुष्ट मनुष्यें.

[४३] **वर्ण**—गुणकर्मानें जाणला जाणारा, तो वर्ण

[४४] **वर्णाचे भेद**—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादि वर्ण होत

[४५] **आश्रम**—ज्यांत अत्यंत परिश्रमपूर्वक उत्तम गुणांचें ग्रहण होऊन श्रेष्ठ प्रतीचे कर्म केलें जातें त्यास आश्रम म्हणावें.

[४६] **आश्रमाचे भेद**—सद्विद्यादि सद्‌गुण आणि जितेंद्रियता यांच्या योगानें आत्मा आणि शरीर यांचें बल वाढविणारा ब्रह्मचर्याश्रम, सतानोत्पत्ति आणि विद्यादि सर्व व्यवहार सिद्ध करणारा गृहस्थाश्रम, चिंतनोपयोगी वानप्रस्थ, आणि सर्वोपकारक असा संन्यास, आश्रम होय.

[४७] **यज्ञ**—अग्निहोत्रापासून अश्वमेधापर्यंत सारे यज्ञच. तसेंच जगाचे कल्याणासाठीं होणारा शिल्पव्यवहार किंवा पदार्थविज्ञान तोही यज्ञ.

[४८] **कर्म**—मन, इंद्रिय आणि शरीरात जीवाचे जे चेष्टा–विशेष तें कर्म होय. शुभ, अशुभ आणि मिश्र असें कर्म तीन प्रकारचें आहे

[४९] **क्रियमाण**—वर्तमानकाळी होणारें कर्म

[५०] **संचित**—क्रियमाणाचे जे सस्कार ज्ञानात राहतात ते

[५१] **प्रारब्ध**—पूर्वकर्मांचा सुखदुःखरूप भोग

[५२] **अनादि पदार्थ**—ईश्वर, जीव आणि जगत्कारण हे स्वरूपतः अनादि.

[५३] **प्रवाहरूपानें अनादि**—कार्य-जगत्, जीवाचें कर्म आणि त्यांचा संयोग वियोग–हीं परपरेनें अनादि होत.

[५४] **अनादिस्वरूप**—जें कधीं उत्पन्न झालें नाहीं, ज्याचे उत्पत्तीचें कोणतेही कारण नाही, अर्थात् जें स्वयंसिद्ध आहे तें अनादि.

[५५] **पुरुषार्थ**—आळस सर्वथा सोडून उत्तम व्यवहारसिद्धीकरितां तन-मनधन आणि निर्वचन याने साह्यानें जो दीर्घोद्योगतो

[५६] **पुरुषार्थाचे भेद**—अप्राप्त वस्तूची इच्छा, प्राप्ताचें रक्षण, रक्षितांचें संवर्धन आणि समृद्धीचा सत्यविद्येची उन्नति आणि सर्वोपकार या कामीं विनियोग, असे चतुर्विध पुरुषार्थ आहेत.

[५७] **परोपकार**—आपल्या सर्व सामर्थ्यानें दुसऱ्या प्राण्यांस सुख देण्या-साठीं तनमनधनानें जो प्रयत्न तो.

[५८] **शिष्टाचार**—ज्यांत शुभगुणांचें ग्रहण आणि अशुभगुणांचा त्याग होतो तो शिष्टाचार.

[५९] **सदाचार**—सृष्टीच्या आरंभापासून आजपर्यंत सत्पुरुषांचा जो वेदोक्त आचार चालत आला आहे, ज्यांत सत्याचें आचरण आणि असत्याचा परित्याग असतो तो.

[६०] **विद्यापुस्तक**—ईश्वरोक्त, सनातन, सत्य विद्यामय चार वेद

[६१] **आचार्य**—जो आचरणानें श्रेष्ठ असून सर्व विद्या शिकवितो तो.

[६२] **गुरु**—जो जन्म देऊन नतर अन्नाच्छादनादिकानीं रक्षण करतो तो पिता तसेंच जो सत्योपदेशानें आपल्या चित्तांतील अज्ञान दूर करतो तो

[६३] **अतिथि**—ज्याच्या येण्याजाण्याचा नियम नाहीं व जे प्रश्नोत्तर-रूपानें उपदेश करून जीवावर उपकार करतात ते.

[६४] **पंचायतनपूजा**—जीवमान माता, पिता, आचार्य, अतिथि आणि परमेश्वर याना यथायोग्य सत्काराने प्रसन्न करणे

[६५] **पूजा**—ज्ञानादि गुणसपन्न व्यक्तींचा यथायोग्य सत्कार

[६६] **अपूजा**—ज्ञानादिरहित जड पदार्थ, तसेंच सत्कारास अपात्र अशाचा जो सत्कार ती.

[६७] **जड**—ज्ञानादि गुणरहित

[६८] **चेतन**—ज्ञानादि गुणसपन्न.

[६९] **भावना**—जसें असेल तसेच समजून घेणे (यथार्थ कल्पना)

[७०] **अभावना**—भावनेच्या उलट

[७१] **पण्डित**—सत्यासत्यविवेकवान्, धर्मात्मा, सत्यवादी, सत्यप्रिय, विद्वान् आणि सर्वांचे हित करणारा तो

[७२] **मूर्ख**—अज्ञान, हठ दुराग्रहादि दोषांनीं युक्त तो

[७३] **ज्येष्ठ-कनिष्ठ व्यवहार**—ज्येष्ठ-कनिष्ठाचा परस्पराशीं जो यथायोग्य व्यवहार तो

[७४] **सर्वहित**—सर्वांच्या सुखवृद्धीकरिता तनमनधनासहित जो उद्योग तो.

[७५] **चोरीत्याग**—मालकाचे परवानगीवाचून त्याची वस्तु घेणे ही चोरी आणि चोरी करणें सोडणें म्हणजे चोरीत्याग.

[७६] **व्यभिचार त्याग**—स्व-स्त्रीशिवाय अन्य स्त्रीशीं गमन, स्वस्त्रीशीं ऋतुकालाशिवाय संभोग, स्व स्त्रीशीं अति सभोग, तरुणपण नसता केलेला विवाह, हे सारे व्यभिचार होत. ते न करणे म्हणजे व्यभिचारत्याग.

[७७] **जीवाचें स्वरूप**—चेतन, अल्पज्ञ, इच्छा, द्वेष, प्रयत्न, सुख, दुःख, या गुणांनीं युक्त असून जो नित्य आहे तो.

[७८] **स्वभाव**—जो ज्या वस्तूचा स्वाभाविक गुण म्हणजे जो ती वस्तु आहे तो तिला कधींच सोडीत नाहीं. उदा० अग्नीचें रूप व दाहकत्व

[७९] **प्रलय**—जगत्कार्य कारणरूप होणे

[८०] **मायावी**—ज्याच्या ठिकाणी छल, कपट, स्वार्थ ह्यांसबंधी आवड आणि दंभ, अहंकार, शठतादि दोष आहेत तो

[८१] **आप्त**—जो छलादि दोषरहित, धर्मात्मा, विद्वान्, सत्यापदेष्टा असून सर्वांवर कृपादृष्टि करतो आणि अविद्यांधकाराचा नाश करून अज्ञानी लोकांच्या आत्म्याचे ठिकाणी विद्यारूप सूर्याचा सदा प्रकाश पाडतो तो.

[८२] **परीक्षा**—प्रत्यक्षादि आठ प्रमाणे, वेदविद्या, आत्मशुद्धि आणि सृष्टि-क्रमानुकूल विचार याच्या द्वारे सत्यासत्य निर्णय

[८३] **आठ प्रमाणें**—प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, ऐतिह्य, अर्थापत्ति, सम्भव आणि अभाव

[८४] **लक्षण**—स्वाभाविक गुण म्हणून जो जाणला जातो ते

[८५] **प्रमेय**—प्रमाणानीं जाणले जाणारे

[८६] **प्रत्यक्ष**—प्रसिद्ध शब्दादि पदार्थांचे श्रोत्रादि इंद्रियें आणि मन त्यांच्याशी निकटसंबंधानें होणारें ज्ञान

[८७] **अनुमान**—पूर्वदृष्ट पदार्थाचें एक अंग प्रत्यक्ष झाले असतां त्याच्या अदृष्ट अंगाचें जे यथावत् ज्ञान तें

[८८] **उपमान**—उपमेने जें सादृश्य ज्ञान होतें तें.

[८९] **शब्द**—पूर्ण आप्त-परमेश्वर किंवा आप्त मनुष्य यांचा उपदेश.

[९०] **ऐतिह्य**—शब्दप्रमाणाला अनुकूल असून जें असंभव किंवा खोटें नाहीं तें.

[९१] **अर्थापत्ति**—एक गोष्ट सांगितल्यावर दुसरी न सांगताच समजणें.

[९२] **सम्भव**—जो प्रमाण, युक्ति आणि सृष्टिक्रम यास अनुकूल आहे तो.

[९३] **अभाव**—एखादी वस्तु एके ठिकाणीं नसल्याने ती दुसऱ्या कोठे आहे याबद्दल होणाऱ्या ज्ञानास अभाव म्हणावे.

[९४] **शास्त्र**—जें सत्यविद्याप्रतिपादनानें युक्त आहे आणि ज्याच्या योगानें मनुष्यास सत्यासत्य कळतें तें.

[९५] **वेद**—ईश्वरोक्त सत्यविद्येने युक्त ऋक्संहितादि चार पुस्तकें.

[९६] **पुराण**—प्राचीन ऐतरेय शतपथ ब्राह्मणादि ऋषिमुनिकृत सत्यार्थ पुस्तकें आहेत त्यांस पुराण, इतिहास, कल्प, गाथा आणि नाराशसी असें म्हणावें.

[९७] **उपवेद**—आयुर्वेद–वैद्यशास्त्र, धनुर्वेद–शस्त्रास्त्र विद्या, राजधर्म, गांधर्ववेद–गायनशास्त्र, अथर्ववेद–शिल्पशास्त्र

[९८] **वेदांग**—शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्द आणि ज्योतिष

[९९] **उपांग**—ऋषिमुनिकृत मीमांसा, वैशेषिक, न्याययोग, साख्य आणि वेदान्त

[१००] **नमस्ते**—मी तुम्हाला मान्य करतों (हें मोठ्यांनी लहानांसही म्हणावयाचें असतें) *

वरीलप्रमाणे आर्यधर्माचें सूत्ररूपानें व्याख्यान आहे स्वमतव्या मतव्य सांगून दयानद अखेर असे म्हणतात कीं, "या मतमतातराच्या झगड्यांचा नाश करून सत्याचा प्रचार करावा आणि सर्वांचें एकमत करवून, परस्परातील द्वेषभाव नाहीसा करून, परस्पराला दृढप्रीतियुक्त करून,सर्वांला सर्वांकडून सुखाचा लाभ पोंचवावा, यासाठीं माझा प्रयत्न आहे. सर्वशक्तिमान् परमात्म्याची कृपा, त्याचें साहाय्य व आप्तजनांची सहानुभूति याच्या योगानें हा सिद्धान्त सर्वत्र पृथ्वीवर शीघ्र प्रवृत्त व्हावा व त्याच्या योगानें सर्व लोक सहज चतुर्विध पुरुषार्थ सिद्ध करून उन्नत व आनदयुक्त होत राहावेत, हेंच माझें मुख्य प्रयोजन आहे.

---

* कंसांतील खुलासे बाबा अर्जुनसिंह यांच्या टीपांवरून केले आहेत.

# प्रकरण बारावें

# वेदविचार

**ओ३म् सहनाववतु सहनौ भुनक्तु सहवीर्यं करवावहै।
तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै॥
ओ३म् शांतिः शांतिः शांतिः॥*** —तैत्ति०, प्र. ९, अ. १.

आर्यसमाजाच्या धर्मपुस्तकात सत्यार्थप्रकाशाच्या खालोखाल भाष्यभूमिकेला महत्त्व आहे त्यातही मतभेदाची बाजू फारच महत्त्वाची आहे यास्तव त्यासबधीं वाचकास योग्य कल्पना यावी म्हणून कित्येक गोष्टी क्लिष्ट असूनही तपशिलवार दिल्या आहेत. त्या देताना भूमिकेंतीलच अनुक्रम सामान्यतः ठेवला असल्यामुळें त्यात सत्यार्थप्रकाशातील क्वचित् काही मुद्द्याची द्विरुक्तिही होईल. पण भूमिकेतील महत्त्वाचे मुद्दे न गळावे म्हणून ती तशीच राहूं देणे जरूर वाटतें.

दयानदांनीं भाष्यभूमिकेला आरभ करताना ज्या शातीने मगल केलें आहे ती शान्ति प्रकरणाच्या आरभीं दिली आहे त्या शातीवरूनही निश्रेयसापेक्षां अभ्युदय, मोक्षापेक्षा परोपकार, यासबधीच त्यांच्या ठिकाणी अधिक आस्था दिसते. आणि त्यांच्या समग्र विचारसरणीत तेंच धोरण असून त्याच्या आर्यसमाजाचें विशिष्ट लक्षणही तेच दिसते असो. दयानदानी आरंभी वरील प्रकारचें मंगल केल्यावर वेदोत्पत्तीविषयीं त्यानीं आपले विचार प्रथम सागितले आहेत.

---

*** दयानंदांचा भावार्थ**—हे सर्वशक्तिमान् ईश्वर ! आपल्या कृपेनें, रक्षणानें आणि साहाय्यानें आम्हीं लोकानी परस्पराचे रक्षण करावे ! तसेच आम्ही सर्वांनीं परम प्रीतीने एकत्रित होऊन आम्हा सर्वास उत्तम ऐश्वर्यादि (चक्रवर्ति राज्य) साधनानी युक्त अशा आनदाचा भोग आपल्या कृपेने सदैव प्राप्त असावा आणि आपल्या साह्यानें परस्पराचे सामर्थ्य वाढविण्याचा पुरुषार्थ संपादावा. हे प्रकाशमय परमेश्वरा ! आमचें सारे व्यावहारिक ज्ञान प्रकाशित कर आणि आमचें ज्ञान सदा वृद्धि पावो. आम्ही आपल्या कृपेनें परस्परांशीं सदैव अविरोधानें वर्तावें. हे भगवन् ! आपल्या कृपेनें आम्ही त्रिविध तापापासून मुक्त असावें.

**तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे।**
**छन्दांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥**

—यजुर्वेद, ७।३१.

यांत वर्णन केल्याप्रमाणे सच्चिदानंदरूप परब्रह्मापासून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे उत्पन्न झाले वरील मंत्रातील तस्मात् ह्या शब्दाच्या पुनरावृत्तीवरून वेद हे परब्रह्मापासूनच निर्माण झाले असें निश्चयेंकरून जाणावें तसेंच जज्ञिरे व अजायत ह्या दोन क्रियापदांतून असा ध्वनि निघतो कीं, वेदात अनेक विद्या आहेत. सर्वहुत म्हणजे सर्व मानवाच्या उपासनेला योग्य. ह्या विशेषणाचा संबंध यज्ञ = विष्णु म्हणजे व्यापक परब्रह्माकडे किंवा ऋग्वेदादि वेदाकडे दयानंद जोडतात. तसेच छन्दांसि ह्याचा अर्थ अथर्ववेद असा करतात दयानंद यजुर्वेदी होते त्यानीं यजुर्वेदांतील ह्या एका मंत्रात आपलें सारें रहस्य आणलें आहे. (१) वेदाची प्रेरणा यज्ञ म्हणजे विष्णु म्हणजे व्यापक परब्रह्मातूनच झाली आहे. (२) सर्व शास्त्रें वेदांतर्गत आहेत. (३) वेद चार आहेत (४) सर्व मानव वेदाचे अधिकारी आहेत. असे हे चार सिद्धान्त आहेत पैकी पहिल्या सिद्धान्ताबद्दल दयानंद म्हणतात कीं, आमचा विष्णु जरी अशरीर आहे तरी त्यानें ज्या अर्थी साधनावाचून अद्भुत सृष्ट पदार्थ निर्माण केले, त्या अर्थी त्यास शब्दसमुच्चयाच्या वेदराशि प्रगट करणें काहींच कठीण नाहीं आता सृष्ट पदार्थ उत्पन्न करणें हें जरी मनुष्यास अशक्य असले, तरी वेदग्रंथ निर्माण करणे मनुष्यासच जास्त शक्य दिसते, असें कोणी म्हणेल पण मनुष्य जो ग्रंथरचना करतो त्याचे ज्ञान तो अगोदर इतर ग्रंथातून किंवा गुरुमुखानें मिळवीत असतो अशा बाह्य साधनावाचून केवळ स्वाभाविक ज्ञानाने मनुष्याला ग्रंथ निर्माण करता येणार नाहीत. आणि सृष्टीच्या आरंभीं तर गुरुशास्त्रादि बाह्य साधनें अस्तित्वातच नव्हतीं स्वाभाविक ज्ञान हें तर नेत्रांप्रमाणें केवळ साधनीभूत आहे, त्यास कोणी प्रेरक पाहिजे एरव्हीं तें चतुर्विध पुरुषार्थप्राप्तीस निरुपयोगी आहे तो प्रेरक म्हणजेच परमात्मा होय. वेद ही त्याची नित्यविद्या होय. विद्येंत स्वतांचा आनंद आणि दुसऱ्यांचें कल्याण ही दोन्ही साधू शकतात. ही विद्यादानाची साधी थोरवी ईश्वराच्या ठिकाणीं खचितच असली पाहिजे. ज्यांनीं मनुष्यमात्राच्या हितासाठी इतकी अद्भुत सृष्टिरचना केली, तो त्यांस त्यांच्या पुरुषार्थसिद्धीसाठी विद्या दिल्यावांचून कसा राहील? ती विद्या म्हणजेच वेद होत. ते वेद ईश्वराकडून प्रथम अग्नि (ऋग्वेद), वायु (यजुर्वेद),

आदित्य (सामवेद) आणि आंगिरस (अथर्ववेद) या सृष्टीच्या आरंभींच्या चार ऋषींना (पूर्वकल्पातील) त्यांच्या पूर्वपुण्याईमुळे प्राप्त झाले. आणि त्यानीं ते ईश्वरप्रणीत शब्द प्रथमरूपात माडले. वेदातील सारे शब्द जसे ईश्वराचे, तसे ते ज्या छदांत गुंफले आहेत ते छंदही त्या सर्वज्ञाचेच त्याने केवळ ज्ञानाची प्रेरणा केली नसून आज जे विद्यमान आहेत त्या वेदाचीच अक्षरशः प्रेरणा ईश्वराने केली वेद ब्रह्मदेवानें सांगितले, त्याची खडे व्यासऋषींनें केलीं, ज्या मन्त्राचा जो ऋषि त्यानेच तो मंत्र मूळ रचला, असें म्हणतात, ते सर्व खोटें आहे त्यास ऐनिश्य प्रमाण नाही. " यो वै ब्रह्माणं विदधाति पूर्व यो वै वेदाश्च प्रहिणोति तस्मै० ॥ " [—श्वेताश्वतर उप०, ६ म १८ ] याचा अर्थ दयानद असा करितात की, " जिसने ब्रम्हा को उत्पन्न किया और ब्रह्मादिको सृष्टि कीं आदि मे **अग्नि आदि के द्वारा** वेदों का भी उपदेश किया है " म्हणजे परमेश्वरानें ब्रह्मदेवाला उत्पन्न केलें आणि त्यांस जे वेद सागितले ते अग्नि, वायु, आदित्य, अंगिरस या ऋषींच्याकडून सागविले मनूही म्हणतो कीं, अग्निवायु रविभ्यस्तु त्रयं ब्रह्म सनातनम् । दुदोह यज्ञसिध्यर्थ ऋग्यजु सामलक्षणम् ॥–मनु०, १।२३, म्हणजे " पूर्वोक्त अग्नि, वायु, रवि आणि अङ्गिरस यापासून ब्रह्मदेव वेद पढले " तात्पर्य, जेथे ब्रह्मदेवालाच प्रथम वेद माहीत नव्हते, तेथे व्यास मरीच्यादि ऋषींची गोष्ट कशाला !

वेदाना उत्पन्न होऊन आज सवत् १९३३ सालीं १९६०८५२९७६ (प० लेखरामाचे मतानें १९५५८८४९७६) इतकीं वर्षे झालीं असे हे वेद नित्य आहेत. कारण, ईश्वराचें ज्ञान हे ईश्वराप्रमाणेच नित्य आहे, आणि वेद हे त्याच ज्ञानाचा भाग आहेत. शिवाय व्याकरणकार पाणिनी आणि पतञ्जलि हे शब्दालाही नित्य मानतात; कारण, शब्दात जीं अक्षरें असतात, तीं सारीं कूटस्थ, अर्थात् विनाश रहित असतात. वाणी अनित्य आहे. पण शब्द अनित्य नाहींत. शब्द जर अनित्य असते तर शब्द नाश पावल्यावर अर्थाचें ज्ञान कोणाकडून झाले असते ? तात्पर्य, शब्दरूप जे वेद ते नित्य आहेत आणि ते शब्द ईश्वराचे असून धर्मसबधी असल्यामुळे मनुष्यमात्राला चारी वेद हे नित्य-प्रमाण आहेत आप्तपुरुषानीं ते प्रमाण मानले आहेत. आणि ज्याप्रमाणे आयुर्वेदांतील एखाद्या वचनाचा अनुभव आला असतां, आपण त्यातील इतरही वचनें प्रमाण मानतों, त्याप्रमाणें आयुर्वेदात वेदास प्रमाण मानले असल्यामुळें आपणही निभ्रांतपणें त्यास प्रमाण मानलें पाहिजे. ईश्वर सर्वज्ञ

आहे, तेव्हां त्यानें प्रेरित केलेले जे वेद ते अर्थातच प्रमाणभूत होतात. उलटपक्षीं वेदातील अपरंपार ज्ञानाकडे पाहिलें, कीं त्याचा प्रेरक सर्वज्ञ परमेश्वरच असला पाहिजे, असें मानणें प्राप्त होतें याप्रमाणें वेद हे स्वत: प्रमाण आहेत. आणि त्यात बदल होत नाहीं, ते नित्य आहेत. मानवी ज्ञानवृक्षाचे मूळ वेदात आहे. निरनिराळया ज्ञानाच्या शाखा शून्यातून कशा निर्माण होतील ?

अशा ह्या वेदात [१] विज्ञान म्हणजे तत्त्वज्ञान आणि अध्यात्म [२] कर्म [३] उपासना, [४] सामान्य ज्ञान असे चार विषय येतात पैकीं विज्ञानाचें महत्त्व सर्वात अधिक आहे त्या विज्ञानाचेच परा आणि अपरा विद्या असे दोन विभाग आहेत. परा विद्या म्हणजे ईश्वर विषयक ज्ञान होय आणि तेंच वेदाचें मुख्य प्रतिपाद्य आहे यास्तव वेदार्थ करताना हे मुख्य ध्येय आपण डोळयासमोर ठेवले पाहिजे विज्ञानाच्या खालोखाल वेदातील दुसरा विषय कर्माचा आहे त्या कर्मात सकाम आणि निष्काम असे दोन प्रकार आहेत, काम्य कर्मात अभ्युदयादि फलप्राप्तीकरता केलेले लौकिक व्यवहारोपयोगी अन्न–प्रावरणादि पदार्थांची निपज करण्याचे उद्योग येतात आणि निष्काम कर्मात, अग्निहोत्र, यज्ञ अशीं कर्में येतात यज्ञ करण्याविषयीं वेदाची आज्ञा आहे यज्ञात जळणाऱ्या वस्तूंनीं हवा शुद्ध होऊन आरोग्य प्राप्त होतें यज्ञात मंत्र म्हटल्यानें ईश्वराची स्मृति होते, आणि एकाप्रकारे त्याची प्रार्थनाही होते वैदिक मंत्र हेच निभ्रांत सत्य असल्यामुळे तेच म्हणावे आणि यज्ञाच्या उपकरणासंबंधी दुसरीही योग्य व जरूर ती विधि-विधानें पाळावीं अनावश्यक पाळू नयेत

वैदिकमंत्रानीं अग्निहोत्रापासून अश्वमेधापर्यंत यज्ञासंबंधीं शिल्पविद्या आणि त्याची साधनसंपत्ति प्राप्त होते त्याचप्रमाणे त्यानी कर्मकांडापासून मोक्षापर्यंतचें सुख मिळतें म्हणून अशा वैदिक मंत्रास देवता मानतात एखाद्या मंत्राचा जो वर्ण्य विषय किंवा पदार्थ त्यासही त्या मंत्राची देवता मानतात ज्या मंत्रातून असे वर्णन किंवा विवरण असते त्यास मंत्र किंवा ऋचा म्हणतात त्याही देवताच मानतात या परोक्ष, प्रत्यक्ष आणि आध्यात्मिक अशा त्रिप्रकारच्या असतात ज्या मंत्राची देवता कोणती तें कळत नाहीं, त्याची यज्ञ किंवा प्रजापति देवता मानतात. याशिवाय यज्ञाचे भाग, ईश्वराच्या आज्ञा, ईश्वर, मानव, वासना, विद्वान्, पवित्र अतिथि, आईबाप, गुरु या सर्व वैदिक देवताच होत. ज्याच्या योगानें बोध होतो ती देवता जड पदार्थातील प्रकाशक, क्रियात्मक किंवा उपकारक अंश देवता

जाणावी; जेणेंकरून विचार स्फुरतो तो मत्र आणि ज्यानें अज्ञानाचें निवारण होतें तो छांदस असें जाणावे.

देवता या शब्दाच्या वरील व्याख्या फक्त सामान्य कर्मकांडापुरत्याच मानाव्या. पण निष्काम कर्म, ज्ञान आणि उपासनाकांडांत देव आणि देवता हे शब्द केवळ परमात्मवाचकच जाणावे. सर्व्या देवतांचा देव तो एकच आहे. देवतापञ्चायतनांत माता, पिता, अतिथि आणि गुरु ह्या चार मूर्ति आणि पांचवें परब्रह्म हें अमूर्त जाणावे. त्याचप्रमाणे अग्नि, पृथ्वी, आदित्य, चंद्रमा आणि नक्षत्र हे मूर्तिमान् देव असून बाकीचे अकरा रुद्र ( दश प्राण आणि आत्मा ), बारा आदित्य, (बारा मास), मन, अन्तरिक्ष, वायु, द्यौ आणि मंत्र हे अमूर्तिमान् देव आहेत. तसेंच पांच ज्ञानेंद्रिये, वाज (इंद्र) आणि विधियज्ञ हे उभयविध आहेत. या तेहतीस देवांहून निराळा जो चवतिसावा परमात्मा तोच काय तो एक उपासनीय आहे. बाकीच्यातील देवत्व गौण आहे. हिरण्यगर्भ म्हणजे परमात्मा. यांतील हिरण्य या शब्दाचा अर्थ सोनें असा करून हा शब्द ज्या ग्रंथांत आला ते शतपथ ब्राह्मण सोनें धातूचा शोध लागल्यानंतरचें अर्वाचीन आहे, असें मोक्षमुल्लर मानतात. तें चूक आहे. हिरण्य याचा अर्थ प्रकाश, अमृतत्त्व वगैरे अनेक त-हेनें परमात्मवाचक होतो.

वेद म्हणजे फक्त संहिता होत. त्याच्यापुढील ब्राह्मणादि भाग हा वेद नव्हे. ब्राह्मणभागांत इतिहास, पुराण, कल्प, गाथा आणि नाराशंसी असे प्रकार आहेत. शतपथांतील 'देवा सुराऽस्ययत्ता आसन्।' हा इतिहास होय. सृष्ट्युत्पत्तीपूर्वीच्या स्थितीची जीं वर्णनें ब्राह्मणांत येतात, उदाहरण, "एक सत मात्र होतें" "फक्त आत्मा होता." "पाणी मात्र होतें" अशा वचनास पुराण म्हणावें. भागवतादि ग्रंथ पुराणें नव्हत. वैदिक मंत्राचा विनियोग ज्यांत आहे त्यास कल्प म्हणावें. उदाहरण, यजुर्वेदांतील पहिल्या मंत्रापैकीं 'इषेत्वा०' हा मंत्र पर्जन्याकरितां म्हणावा. याज्ञवल्क्य आणि जनक, गार्गी आणि मैत्रेयी यांच्यामधील जे संवाद त्याच गाथा होत. आणि ब्राह्मणभागांतील नरस्तुति किंवा गोष्टी यास नाराशंसी म्हणतात. मंत्रभागांत जमदग्नि व कश्यप हे शब्द जरी आले आहेत [ त्र्यायुषं जमदग्नेः कश्यपस्य त्र्यायुषम्०। यजु०—अ. ३ मंत्र ६२ ] तरी ते शब्द ऋषिवाचक नसून जमदग्नि म्हणजे नेत्र आणि कश्यप म्हणजे कूर्मनामक प्राण असें समजावें. [ चक्षुर्वै जमदग्निर्ऋषिर्यदनेन.—श०, का. अ. १ ] [ कश्यपो वैकूर्म्मः। प्राणो वै कूर्म्मः। श०, का —७ अ. ४ ].

तात्पर्य, वेद हे काहीं इतिहास नव्हत. इतिहास ब्राह्मणभागांत आहे. न्याय-शास्त्रात ब्राह्मणवचनाना लौकिक म्हटले आहे. तीं वैदिक नव्हत. वैदिक मंत्राचा विधि, अर्थवाद (स्तुति), निंदा, पराकृति (प्रकार) किंवा पुराकल्प (उदाहरणें देऊन केलेला खुलासा) आणि अनुवाद ब्राह्मणात सांगितलेला असतो. पाणिनीनें आपल्या महाभाष्यात वैदिक आणि लौकिक शब्दाची जी उदाहरणें दिलीं आहेत त्यात ब्राह्मण ग्रंथातील शब्द वैदिक म्हणून दिलेले नाहींत पाणिनीच्या सूत्रात व्याकरणाचे नियम सागताना ब्राह्मण, कल्प, छादस व पुराण याचा वेदाहून भिन्न असा स्पष्ट उल्लेख आहे [ अष्टा०, अ. २, पा. ३ । सू ६०, ६२, १०५ ] ब्राह्मण ग्रथ हे वेदाहून भिन्न असल्यामुळें वैदिक संहितेला जे स्वतःप्रामाण्य आहे, ते ब्राह्मणे, आरण्यकें उपनिषदे वगैरे कशासच नाहीं त्यांचें प्रामाण्य दुय्यम प्रतीचें आहे हीच गोष्ट या विवेचनात मुद्दयाची आहे.

वेदात काय सांगितले आहे ते पाहूं गेल्यास त्यात सर्व शास्त्रे बीजरूपानें आढळतात असे दयानदानी प्रतिपादन केले आहे त्यात ब्रह्मविद्या आहे[१] धर्म-शास्त्र आहे[२] त्यात सृष्टिविद्या[३] आहे. आयगौःपृश्निरक्रमीद सदन्मातर पुरः । पितरं च प्रयन्त्स्वः ॥ [ यजु०, अ म ६ ] या व अशा वैदिक मंत्रात गौचा अर्थ पृथ्वी, सूर्य, द्यौ, सूर्यकिरण, चंद्र आणि गधर्व असा होतो. त्यात गति दर्शित केली जाते पृश्नि म्हणजे अतरिक्ष स्वः म्हणजे सूर्य निरुक्तावरून वरील मंत्राचा अर्थ लावल्यास त्यावरून, सूर्य, चंद्र, पृथिव्यादि खगोल गतिमान् आहेत. पृथ्वी ही सूर्यापासून उत्पन्न झाली, ती सूर्याभोवतीं फिरते, ती पाण्याच्या पोटातून निघाली; वायु आणि आकाश यातून सूर्य निघाला, अग्नि आणि पाणी ह्यानीं चंद्र उत्पन्न

---

[१] तमीशान जगतस्तस्थुषस्पति०—ऋ. १।६।१५।४ तद्विष्णोः परमं पद० —ऋ० १।२।७।५ परित्यभूतानि परित्यलोकान्०—यजु० ३२।११. महद्यक्ष भुवनस्य मध्ये०—अथर्व० १०।४।७।३.

[२] संगच्छध्व सवदध्व० ।—ऋ० ८।८।४९।९ समानो मन्त्रः समितिः० —ऋ० ८।८।४९।३ चोदनालक्षणोऽर्थो धर्म्म ।—पू० मीमासा १।१।२.

[३] नासदासीन्नो सदासीत्तदानी०—नासदीयसूक्त, ऋग्वे०, ८।७।१७।१–७. हिरण्यगर्भः समवर्तताग्रे०-ऋग्वे०, ८।७।३।१. सहस्रशीर्षा पुरुष०—यजु०, अ. ३१, मं १.

केला इत्यादि अर्थ निष्पन्न होतो. ही परिभ्रमण करणारी पृथ्वि ह्या परिभ्रमणानें ऋतु बदलून तिच्या पाठीवरील प्राणिमात्राचें कसें पोषण आणि रक्षण करते हेंही खालील मन्त्रावरून[1] दिसेल तसेच चंद्र पृथ्वीभोंवतीं फिरतो, हेंही ऋग्वेदातील एका[2] मन्त्रावरून उघड दिसतें. गुरुत्वाकर्षणाचा नियमही वेदांत स्पष्ट आहे[3] सत्येनोत्तिभता भूमिः सूर्य्येणोत्तभिता द्यौः। ऋतेनादित्यास्तिष्ठन्ति दिवि सामोऽधिश्रितः ॥—अथर्व०, कां. १४, अनु १ म. १. या मंत्रांत चंद्र पर-प्रकाशित आहे, असें म्हटले आहे तसेंच "सूर्य्य एकाकी चरतिचन्द्रमा जायते पुनः। अग्निर्हिमस्य भेषजं भूमिरावपनं महत्"—यजु०, २३।१० या मंत्रावरून सूर्य इतर खगोलांस प्रकाश देत एकटाच फिरत आहे वगैरे गोष्टी कळून येतात. अंकगणित, बीजगणित आणि भूमिति ह्या शास्त्राची बीजेही वेदांत आहेत, हें खालील मन्त्रावरून[4] दिसेल वेदात उपासनेचे, प्रार्थनेचे आणि आशीर्वचनाचे मंत्र अनेक आहेत, हे सांगावयास नकोच. ऋग्वेदातील "स्थिरा वः सन्त्वायुधा पराणुदे वीळू उत प्रतिष्कभे। युष्माकमस्तु तविषी पनीयसीमा मर्त्यस्य मायिनः" १।३।१८।२ ह्या मन्त्रात लढाईच्या बंदुका, तोफा, धनुष्यें, तरवारी वगैरे आयुधां-

---

(१) या गौर्वर्तनिं पर्य्येति निष्कृतं पयो दुहाना व्रतनीरवारतः। सा प्रब्रुवाणा वरुणाय दाशुषे देवेभ्यदाशद्धविषा विवस्वते —ऋ०, ८।२।१०।१.

(२) त्वं सोम पितृभिः संविदानो अनु द्यावापृथिवी आततथ। तस्मै त इन्द्रो हविषा विधेम वयं स्याम पतयो रयीणाम ॥ —ऋ०, ६।४।१३।३.

(३) यदा ते हर्य्यता हरी वावृधा ते दिवे दिवे। आदित्ते विश्वा भुवनानि येमिरे ॥—ऋ०, ६।१।६।३ यदा ते मारुतीर्विशस्तुभ्यमिन्द्र नियेमिरे। आदित्ते विश्वाभुवनानि येमिरे ॥—ऋ०, अ. ६ अ. १ व. ६ म ४. यदा सूर्यममुं दिवि शुक्रं ज्योतिरधारयः। आदित्ते विश्वाभुवनानि येमिरे ॥—ऋ०, अ. ६ अ. १ व. ६ म. ५. आकृष्णेन रजसा वर्त्तमानो निवेशयन्नमृतं मर्त्यंच हिरण्ययेन सविता रथेन देवो याति भुवनानि पश्यन् ॥—यजु०, ३३।४३

(४) एका च मे तिस्रश्च मे०-यजु० १८।२४।२५. अग्न आ याहि वीतये गृणानो हव्य दातये ॥ निहोता सत्सिबर्हिषि ॥१॥—साम०, छं. प्र. १ खं. १ कासीत्प्रमा प्रतिमा किं निदानमाज्यं किमासीत परिधिः क आसीत् छन्दः किमासीत प्र उगं किं मुक्थं यद्दे वा०—ऋ०, ८।७।१८।३

चा उल्लेख सांपडतो "तसेंच तुम्रोह भुज्यमश्विनोदमेघेरयिं न कश्चिन्ममृवाँ अवा हाः । तमूहथुर्नौभिरात्मन्वतीभिरन्तरिक्षप्रुद्भिरपोदकाभिः" इ०॥–ऋ०,१।८।८ १–९ १।३।४ ते ९ ३४ इत्यादि मन्त्रात वाफेचीं, तेलाचीं व विजेचीं इंजिनें, असलेल्या गाड्या व विमानें अशा वाहनाचें वर्णन मिळतें. तसेंच तारायन्त्राचा उल्लेख, "युवं पेदवे पुरुवारमश्विना स्पृधाश्वेतं तरुतारंदुवस्यथ· शर्यैरभिद्युपृतनासु दुष्टरं चर्कृत्यमिन्द्रमिव चर्षणीसहम ॥८॥"–ऋ०, १।८।२१।१० या मन्त्रात आढळतो. आणि "सुमित्रिया न आप ओषध य· सन्तु । दुर्मित्रियास्मै सन्तु योऽस्मान् द्वेष्टि यं च वयं द्विष्म· ॥"–यजु०, अ ६।२२ यात वैद्यशास्त्राचे बीज आहे राहता राहिलें मोक्षशास्त्र त्या बाबतीत वेद म्हणतो कीं, उपासनेने अज्ञान दूर होऊन पापक्षय झाला असता शुद्ध ज्ञान आणि सदाचार या योगाने जीवास मोक्ष मिळतो· सगुण आणि निर्गुण अशा दोन उपासनापद्धति आहेत दु ख, अज्ञान, परिमाण, संख्या, स्पर्श, रूप, रग, रस, गन्ध अशा गुणाहून अलिप्त असें ईश्वरास मानणे ही निर्गुणोपासना होय पातजलयोगात समाधीपर्यंत गर्व माहिती दिली आहे त्याचा प्राय· अनुवादच दयानदानी केला आहे

यापुढे दयानद पुनर्जन्म, पितृयान आणि देवयान, विवाहबंधन, नियोग, राज-प्रजाधर्म, वर्णाश्रमधर्म, अग्निहोत्र, पितर याबद्दल खालीलप्रमाणे वेदांतील उल्लेख दाखवितात नतर सृष्ट्युत्पत्तीपासून ग्रथप्रामाण्याचा विचार सागतात त्यात वेदसंहिता, ब्राह्मण, वेदाग, उपवेद, मानव कल्पसूत्र, अष्टाध्यायी, महाभाष्य,

---

[१] ऋ०, ८।१।२३।६–७, यजु०, ४।१५, अथर्व , ७।६।६७।१

[२] अथर्व०, ५।१।१।२, यजु०, १९।४७

[३] ऋ०, ८।३।२७।१, ८।३।२८।२

[४] ऋ०, ५।८।१८।२, अथर्व०, १८।३।१।१, ऋ०, १०।१८।८, ऋ०, ८।३।२८।५ अथर्व० १४।२।१८

[५] ऋ०, ३।२।२।६, यजु०, २०।१–२५

[६] यजु०, ३१, अथर्व०, ११।३।५।३,४,५–यजु०, ३, ४१–५० ११।३।-६,७,१७,१९.

[७] यजु०, अ. ३।१०, अ. २२।७, अथर्व०, १९।७।३,४

[८] यजु०, अ. २ व १९.

धातुपथ, उणादिपथ, गणपथ, प्रतिपादिका, निरुक्त, निघटु, पिंगल-सूत्रभाष्य, ज्योतिष, भूमिति, गणित, बीजगणित यावर वशिष्ठादि ऋषींचे ग्रंथ, षड्दर्शनें, बौद्धायन, दशोपनिषदे ह्या ग्रंथांच्या प्रामाण्याची ते शिफारस करतात. बाकी बहुतेक ग्रंथ विषयुक्त अन्नाप्रमाणे त्याज्य मानतात.

पौराणिकांवर दयानंदांचा विशेष कटाक्ष आहे. ते पौराणिकांच्या ग्रंथांचा निषेध करूनच थांबले नाहीत, तर दयानंदांनी आपल्या यौगिक व्युत्पत्तीच्या बळावर ज्याप्रमाणे वेदांत भौतिकशास्त्राचा उल्लेख दाखविला, त्याचप्रमाणे त्यांनीं त्याच पद्धतीचा अवलंब करून पौराणिकांच्या खालील विलक्षण कथांचा सुसंगत खुलासा लावून दिला. उदाहरणार्थ, ब्रह्मदेवाने आपलीच मुलगी सरस्वती हिच्यावर केलेल्या बलात्काराची कथा यांच्यामते अशी लागते कीं, प्रजापति म्हणजे सूर्य; त्याच्या प्रकाश व उषा या दोन कन्या, कारण त्या त्याच्यापासून उत्पन्न होतात. पैकी आरक्त अशा उषेवर उगवत्या सूर्यानें आपले किरण टाकून तिच्यापासून दिवस उत्पन्न केला असें हें रूपक आहे. त्याप्रमाणें अहल्या जार इंद्राच्या कथेंतही इंद्र म्हणजे सूर्य, गौतम म्हणजे चंद्रमा आणि अहल्या म्हणजे रात्र असें जाणावें. इंद्र वृत्रासुराच्या कथेंत इंद्र ना सूर्य, आणि वृत्रासुर म्हणजे मेघ समजावें. बाकीच्या देवासुरांच्या युद्धकथा अशा सूर्य आणि वादळ, सुष्ट आणि दुष्ट, मन आणि प्राण यांच्या विरोधावर रचलेल्या आहेत. कश्यपाच्या कथेंत कश्यप=कूर्म=ईश्वर, किंवा कश्यप=पश्यक=द्रष्टा=परमेश्वर असें जाणलें म्हणजे सारे प्राणिमात्र ही त्याचीच प्रजाच, हें पटतें. आतां गयाश्राद्धाच्या कल्पनेंतही, विष्णुपद =मोक्ष आणि गया म्हणजे गायत्री, प्राण, गृह, आणि जीवमान लोक हें लक्षांत घेतलें म्हणजे गया श्राद्धाचा अर्थ गायत्रिजपानें, किंवा प्राणाच्या संयमानें मोक्ष प्राप्त करून घेणें, गृहस्थाश्रम उत्तम चालवून आईबाप, गुरु आणि सन्माननीय गृहस्थ यांची सेवा करणें, हाच निष्पन्न होतो[1]. तीर्थ शब्दासंबंधीं मागें खुलासा केलाच आहे. गंगायमुना इत्यादि नावें इडापिंगळा सुषुम्ना आणि कूर्म या खऱ्या तीर्थांचीं होत. सीतासिते यत्र संगथे म्हणजे सीता=गौर= गंगा=इडा; असिता = काळी = यमुना = पिंगला, यांचा संगम सुषुम्नेंत होतो तेथें योग्यांना

[१] प्राणो वै बलं तत्प्राणे प्रतिष्ठितं तस्मादाहुर्बलं सत्यादोजीय इत्येष वेषा गायत्र्यध्यात्मं प्रतिष्ठिता । साहैषा गयांस्तत्रे । प्राणा वै गयास्तत्प्राणांस्तत्रे तद्यद्ग-यांस्तत्रे तस्माद्गायत्री नाम । —शत०, १४।८।१।६-७.

ज्ञान घडून मोक्ष प्राप्त होतो. लौकिकी तीर्थयात्रेच्या निषेधाप्रमाणें मूर्ति-पूजानिषेधही वेदांत स्पष्ट आहे.[१] वेद हे सर्वांकरिता आहेत सर्वांस वेदविद्येचा अधिकार आहे.[२] शूद्र अजाण असेल तर मात्र त्यानें वेदाभ्यास करणें व्यर्थ ठरेल इतकेंच

इतकें सांगितल्यावर आपल्या वेदभाष्याबद्दल कांहीं शकांचा खुलासा करण्याच्या हेतूनें दयानंद सांगतात: मी माझ्या भाष्यांत मला वाटलें तें नवीन असें कांहींच सांगितलें नाहीं रावण, उवट, सायण, महीधर इत्यादींचीं भाष्यें आणि टीका खऱ्या वेदार्थाला सोडून आहेत उदाहरणार्थ, सायणाच्या मतें वेद (मंत्र ब्राह्मण) हे कर्मपरच आहेत पण ही चूक आहे तसेंच वेदमंत्रांतील इंद्रम्, मित्रम्, वरुणम्, अग्निम् हे सारे शब्द ब्रह्मवाचक आहेत हे त्यांच्या लक्षांत आले नाहीं पण त्याहीपेक्षा महीधरानें वेददीपांत यजुर्वेदाच्या तेविसाव्या अध्यायांतील १९ ते ३१ या मंत्रांचा जो अर्थ केला आहे तो अत्यंत अश्लील आहे दयानंदाचा अर्थ त्याच्याशीं ताडून पाहतां इतका अश्लील अर्थ महीधरासारख्या पंडितानें कसा प्रसिद्ध केला, ह्याचें कोणास फारच आश्चर्य वाटेल. हे दोन्ही अर्थ येथें विस्तारभयास्तव देतां येत नाहींत तथापि यजुर्वेदांतील सदर मंत्रांपैकीं कांहीं खालीं दिले आहेत[३]

---

[१] न तस्य प्रतिमास्ति यस्य नाम महद्यश हिरण्यगर्भ इत्येष मा माहि॑ सीदित्येष यस्मान्न जात इत्येष'—यजु०, अ. ३२ म ३. सपर्य्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविर॑ शुद्धमपाप विद्धम् कविर्मनीषी परिभू॰ स्वयम्भूर्याथातथ्य तोऽर्थान् व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्य॰ —यजु०, ४०।८॥

[२] यथेमा वाचं कल्याणी मावदानि जनेभ्य॰। ब्रह्मराजन्याभ्या॑ शूद्राय चार्य्याय च स्वाय चारणाय॥ प्रियोदेवाना दक्षिणायै दातुरिह भूयासमयं मे कामः समृध्यतामुपमादो नमतु॥—यजु०, २६।२.

[३] गणाना त्वा गणपति॑ हवामहे प्रियाणां त्वा प्रियपति॑ हवामहे निधीनाँ त्वा निधिपति॑ हवा महे वसो मम। आहमजानि गर्भधमात्वमजासि गर्भधम्॥१९॥ ता उभा चतुरः पदः सम्प्रसारयावस्वर्गे लोके प्रोर्णवाथा वृषा वाजी रेतोधा रेतो दधातु॥२०॥ यकासकौ शकुन्तिका हलगति वञ्चति। आहन्ति गभेपस्तेविगल्गलीति धारका॥२२॥ माता च ते पिता च तेऽग्र वृक्षस्य रोहतः। प्रतिलामीति ते पिता गभे मुष्टिमत॑सयत्॥२४॥

ह्याप्रमाणे सायणमहीधर प्रभृति हिंदु पंडितांनीं आणि त्यांवर आधारलेल्या पाश्चात्य पंडितांनीं वेदार्थ करण्यांत ज्या भयंकर चुका केल्या आहेत त्या आपल्या हातून न व्हाव्यात म्हणून आपण आपलें भाष्य निरुक्त, ऐतरेय शतपथादि प्राचीन ग्रंथास अनुसरून केले आहे, आणि अर्थ करताना मुख्यत्वेंकरून अध्यात्मदृष्टिच ठेवली आहे, असें दयानंद सांगतात पुढे ते म्हणतात कीं, स्थूल मानानें पहातां असे दिसून येईल कीं, निरनिराळ्या शास्त्राच्या अभ्यासाला सोयीचें पडावें म्हणून वेदाचे चार विभाग केले आहेत ऋग्वेदात पदार्थांचे गुणधर्म सांगितले, यजुर्वेदात त्याचा उपयोग सांगितला,सामवेदात ज्ञानकर्मांचा सूक्ष्म विचार दाखविला; आणि अथर्ववेदात शास्त्राचे रक्षण, उत्कर्ष आणि निभ्रांतस्थिति दाखविली; यामुळें याच अनुक्रमानें वेद जाणले जातात वैदिक मंत्रांचा खरा अर्थ ज्यानीं पूर्वी जाणला तो त्या मंत्राचा ऋषि मानला गेला तसेंच मंत्राच्या वर्ण्यविषयाला त्याची देवता आणि त्याच्या वृत्ताला छंद म्हणतात तो उत्तम गातां यावा म्हणून त्यावर स्वर देतात वैदिक मंत्रात निर्जीव पदार्थासंबधींही त्याची प्रत्यक्षता आणि उपयुक्तता दाखविण्याकरिता द्वितीय पुरुष वापरतात हा नियम लक्षांत न आल्यामुळे अशा पदार्थास सचेतन मानून वेदात जडाची पूजा आहे असें कित्येक पौर्वात्य आणि पाश्चात्य पंडित चुकीनें समजतात तेव्हां वेदार्थ करताना कोणते नियम पाळले पाहिजेत, तेंही दयानंदानीं भाष्यभूमिकेच्या अखेर दिलें आहे पण तो विषय अगदींच क्लिष्ट आहे आणि प्रस्तुत विषयाला त्याची विशेष जरुरीही नाहीं म्हणून हें प्रकरण अधिक न लांबवितां आम्ही आटोपतें घेतो आता दयानंदाच्या वाङ्मयात सत्यार्थप्रकाश व भाष्यभूमिका याच्या इतकेंच आर्यांचे संस्कार विधि यास महत्त्व आहे. यास्तव त्यांचा विचार पुढील स्वतंत्र प्रकरणात करू

---

## प्रकरण तेरावें

# प्रारंभिक संस्कार

अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम्।
होतारं रत्न धातमम्॥ —ऋग्वेद, १।१।१.

**भावार्थ**—पूर्वापासून जगतास धारण करणारा, हवन, विद्यादिदान आणि शिल्पक्रिया यांचा प्रकाशक प्रत्येक ऋतूंत पूजनीय असलेला, जगातील सुंदर पदार्थांचा दाता, रमणीय रत्नांचा पोषक, प्रकाशस्वरूप, अशा परमात्म्याची मी उपासक स्तुति करतों —[स. चं.]

पंचमहायज्ञ आणि षोडश संस्कार हेंच आर्यांचें नित्यनैमित्तिक कर्म होय उभयतांचे धार्मिक आचार किंवा संस्कारविधि वेदमूलकच आहेत पण त्यांच्यात वास्तविक विशेषसें साम्य नाहीं. क्वचित काहीं मंत्र एक आहेत कोठें क्रियेतही सारखेपणा दिसेल, पण एकंदरीत विधींचा अनुक्रम, मंत्रांची निवड, त्यांचा अर्थ आणि त्यांचा विनियोग, तसेंच विधींचा हेतु किंवा फल इत्यादि कर्मांच्या सर्व अंगासंबंधीं इतकी भिन्नता आहे कीं जिज्ञासूंनी आर्यांचें तत्संबंधीं मूळ ग्रंथच पाहणें जरूर आहे या ग्रंथात तो विषय साररूपानेंही देता येणे कठीण आहे नुसते मंत्र आणि मंत्रांचा दयानंदांच्या मतानें अर्थ देऊं म्हटलें, तरी तें एक स्वतंत्र पुस्तक होईल बरें, हा विषय क्लिष्ट आणि सामान्य वाचकास निरुपयोगी म्हणून गाळावा, तर आर्यधर्माचें तें एक उत्तमांग आहे. शिवाय ज्या आधुनिक धार्मिक चळवळींचा विचार करण्याचा आम्हीं आरंभ केला आहे, त्या चळवळींत शास्त्रीय कर्मास आर्यांप्रमाणें दुसरें कोणीही महत्त्व दिलेलें नाहीं उलटपक्षीं त्यांनी रूढ असलेल्या कर्मप्रचारात बदलही बराच केला आहे यासाठीं जिज्ञासूस त्याची कल्पना येण्याकरिता आर्यांचा नित्यकर्मविधि आणि संस्कारविधि यांची रचना आणि हेतु यांचें संक्षिप्त वर्णन या व पुढील दोन प्रकरणात करण्याचें योजिलें आहे सनातन वैदिक हिंदूंत प्रांतभेद आणि शाखाभेद यांच्या योगानें शास्त्रीय कर्मांत थोडाफार फरक असतोच. आणि तसा फरक खास आर्यसमाजातही पडत चालला आहे.

पण हे गौणभेद लक्षांत न घेतां आर्यमतानुसार होणाऱ्या नित्यनैमित्तिक कर्मांतील दृष्टिभेदाच्या महत्त्वाच्या मुद्द्यासंबंधीं विचार करतां असे दिसतें कीं:—

[१] कोणत्याही शास्त्रीय कर्माशी संबंधित असलेल्या देवतांच्या कथा आणि देवताच्या पूजा आर्य मानीत नाहीत सर्व देवताचे उल्लेख परमेश्वरवाचक अथवा प्रत्यक्ष सृष्टपदार्थवाचक आहेत असे ते मानतात उदा०-इंद्र=परमेश्वर, सप्तऋषि पंचज्ञानेंद्रिये बुद्धि आणि मन, किंवा प्रत्यक्षादिप्रमाणे सविता=सृष्टिकर्ता वगैरे. तात्पर्य, सर्व स्तुतिपर मंत्र आणि प्रार्थना एका परमेश्वरास उद्देशून आहेत असें त्यांचें ठाम मत आहे त्याचे मंत्राचे अर्थ पुष्कळ वेळा भिन्न असतात.

[२] नित्यनैमित्तिक कर्माचे आरोग्यादि साक्षात फळ मिळतें, असें त्याचें मत आहे कर्मानें मानसिक शुद्धि होते असेंही जरी ते क्वचितप्रसंगीं मानतात तरी त्याची ही मानसिक शुद्धि आणि सनातनी वेदांत्याची चित्तशुद्धि किंवा अदृष्ट यात थोडाफार भेद आहे असें दिसते.

[३] शिवाय ज्ञान, बल, धन, सत्ता, संतति, सामर्थ्य, स्वराज्य इत्यादि अभ्युदयात्मक भोगासाठी ईश्वराची उपासना करणे यात काहींच गैर नसून उलट हे न मागता नुसताच मनोलयाचा अभ्यास करणे किंवा परमेश्वराजवळ परमात्मपद मागणे हाच अविवेक आहे असे ते मानतात

[४] शास्त्रीय नित्यनैमित्तिक कर्मास स्थळ आणि काळ यासंबंधी स्वच्छता आणि प्रसन्नता याशिवाय विशेष नियंत्रण त्यास पसंत नाही

[५] आर्य अधिकार वाद मानीत नाहीत त्याच्या मतें सामान्यतः नित्यनैमित्तिक शास्त्रीय कर्मास स्त्री शूद्रादि सारेच अधिकारी आहेत. आता व्यवहारतः हे कितपत घडतें ही गोष्ट वेगळी या बाबतीत दयानंदाचे अनुयायी त्याच्याही पुढे गेलेले दिसतात त्याचा विचार पुढील भागात करू

[६] त्याच्या शास्त्रीय नित्यनैमित्तिक कर्मांत ओंवळें आणि अशौच याचा प्रत्यवाय नसतो * जेवणखाण इत्यादि सामान्य कर्मास, इतकेंच काय पण कोणत्याही पापकर्मासही अशौच आडवें येत नाही. मग पुण्यकर्मांत मात्र अशौचामुळें अंतर पडावें, हे दयानंदास अगदींच अविचाराचें वाटते

* संस्कारचंद्रिकाकार होमहवनादि शास्त्रीय कर्माचे वेळीं रेशमी किंवा ऊर्णावस्त्र परिधान करावे म्हणजे अग्नीचें भय कमी होतें असें सुचवितात. तसेंच ऊर्णावस्त्र, कुशासन वगैरे वस्तु विजेच्या अवाहक असल्यामुळें उपयुक्त आहेत असें म्हणतात.

[७] शास्त्रीय कर्मांतील मंत्राचा पाठ किंवा जप सार्थ करावा निदान अर्थ समजून करावा इकडे दयानंदाचा जास्त कटाक्ष आहे. तथापि वैदिक मंत्रपठनाचें श्रेय त्याच्या केवळ देशी भाषेतील अर्थाचें पठनात नाहीं असें आर्यही मानतात· कारण ती साक्षात् देववाणी आहे अशी त्याची निष्ठा आहे. यामुळे अगदींच अप्रबुद्ध कर्ता नसेल तर सर्व मंत्र क्रिया करणाऱ्या स्त्री-पुरुषानींच म्हटले पाहिजेत असा त्याचा आशय दिसतो

[८] हिंदु वैदिक जे शाखाभेद मानतात ते खरे नसून एकाच वेदसंहितेचे ते निरनिराळे अर्थ करण्याचे प्रकार आणि प्रघात आहेत असें दयानंद मानतात.

[९] दयानदानीं आपल्या नित्यनैमित्तिक-कर्मविधींत सर्व शाखांतील मंत्र व सूत्रें एकत्र उपयोगात आणली आहेत

[१०] सूत्रकारादि ऋषींप्रमाणे स्वतःची बुद्धि किंवा तर्क यासही दयानदानीं ऋषि (समान) मानलें आहे असें संस्कारचंद्रिकाकार म्हणतात "यस्तर्केणानु सन्धत्ते सधर्म वेदनेतर." हेंच अनुसंधान दयानदाच्या संस्कारविधींत आहे. सनातनीयाच्या मताने शास्त्रीय कर्मांत तर्काला अशी प्रतिष्ठा मानलेली नाहीं

[११] पुण्याहवाचन नांदीश्राद्धादि कित्येक सामान्य विधि तसेंच संकल्पाचें आणि फलश्रुतीचे मंत्र हे आर्यसंस्कारात सनातनी रूढ वैदिकविधीप्रमाणे नसतात; उलट अग्निकार्य, आज्याहुति, साम देव्यगान, परमेश्वरस्तुति, दृष्ट फलाकांक्षा इत्यादि गोष्टींवर आर्यसंस्कारात जास्त भर दिसतो.

[१२] त्याचप्रमाणे आर्यांच्या संस्कारविधींत अथर्ववेद, सामवेद, पारस्कर गृह्य सूत्रें शौनक गृह्यसूत्रें, चरक, सुश्रुत, मनुस्मृति हे प्रामाण्य ग्रंथ, [ अर्थात् ऋग्युजु- आश्व० गृ० सूत्रे इत्यादींबरोबर ] विशेष उपयोगात आणलेले आढळनात

[१३] मीमांसकाप्रमाणें आर्य मंत्रदेवता मानीत नाहींत

[१४] त्याचप्रमाणे मंत्राचा ऋषि, देवता आणि छंद याचा उच्चार करण्याची त्याची पद्धत नाहीं

[१५] अग्निकार्यात ते अग्नीचे प्रकार बहुधा मानीत नसावेत असें दिसतें

[१६] रूढ सनातनी धर्मांतील विधींत उच्चारल्या जाणाऱ्या मंत्राचा बहुधा विधींच्या क्रियेशीं अर्थाअर्थी कांहींच संबंध नसतो, असा एक आक्षेप आहे. तो आर्यसंस्कार-विधींत नसावा म्हणून स्वामी दयानंदानीं संस्काराविधि रचतांना,

आणि संस्कारचंद्रिकाकारांनीं त्याचा खुलासा करतांना शिकस्तीचा प्रयत्न केला आहे, तो कितपत सिद्धीस गेला आहे त्याचा विचार शेवटल्या भागांत करूं

[१७] कर्मलोप किंवा कर्मदोष याबद्दल प्रायश्चित्त कर्म दयानंदांनीं सांगितलें नाहीं.

[१८] सनातनी वैदिकांच्या रूढ विधींत अनेक लौकिकाचाराचा जो भाग असतो, तो पसारा दयानंदांच्या संस्कारविधीभोंवतीं अद्याप जमा झालेला दिसत नाहीं.

ह्याप्रमाणे भेददर्शक ठळक ठळक गोष्टी आहेत याशिवाय प्रत्येक विधींत निरनिराळे भेदप्रकार आहेतच, ते विस्तारभयास्तव देता येत नाहींत

गर्भादान, पुंसवन, सीमन्तोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन, चूडाकर्म, कर्णवेध, उपनयन, वेदारम्भ, समावर्तन, विवाह, वानप्रस्थ, संन्यास आणि अंत्येष्टि हे संस्कार आर्यांस मान्य आहेत गृहाश्रम हाही एक संस्कार मानून अंत्येष्टि कर्माला संस्कारातून दयानंदांनी वगळलें आहे, असें त्यांच्या संस्कारविधि या पुस्तकावरून दिसतें. पण संस्कारचंद्रिकाकार आपल्या ग्रंथात गृहाश्रमसंस्कार सोडून अंत्येष्टि संस्काराचा संस्कारात अंतर्भाव करतात ह्या षोडश संस्कारांपैकी आज आर्यसमाजात रूढ कोणते आहेत याचा विचार निराळा व्हावयाचा असल्यामुळे तूर्त या ठिकाणी वरील सर्व संस्कारांचें दयानंदाच्या मते स्वरूप काय आहे, तेच पहावयाचें आहे दयानंदांनी नित्य कर्मांचा समावेश गृहाश्रमात केला आहे. यामुळें नित्यकर्म व नैमित्तिक कर्म असे पुढील विषयाचे विभाग न पाडता कर्णवेधापर्यंत प्राथमिक संस्कार, आश्रमसंस्कार आणि गृहस्थाश्रम असे तीन विभाग करून त्याचा विचार या व याच्यापुढील दोन प्रकरणात करण्याचे योजले आहे मात्र ही मांडणी येथेंच पुरी व्हावी म्हणून दयानंदाच्या संस्कारविधीबरोबर संस्कारचंद्रिका, संध्यारहस्य वगैरे आर्य ग्रंथातील विचार संक्षेपानें याच भागात ग्रथित केले आहेत

उपाध्याय ब्राह्मणवर्ग दयानंदांनीं कधींच मानलेला नाहीं तथापि वैदिक वाङ्मयातील देवता हा शब्द विद्वान् पुरुषवाचक आहे असेंच ते मानतात आणि अशा विद्वानाची पुरोहित, ऋत्विज, होते, अध्वर्यु इत्यादि प्रकारें त्यास आवश्यकताही भासते.

प्रत्येक संस्काराचे आरंभीं कोणा तरी विद्वान् पुरुषानें मंत्र पाठ करावा, अर्थद्वारा ईश्वराची स्तुति व प्रार्थना करावी आणि तेथें असलेल्या सर्वांसह ईश्वराचें

ध्यान करावें असे त्यांचें म्हणणें आहे त्या स्तुति, प्रार्थना व उपासनेसाठीं त्यांनीं वैदिकसंहितेंतून अनेक मत्राची निवड केली आहे. असेच कांहीं मंत्र दयानदांनीं एकत्रित केलेल्या पुस्तकास आर्याभिविनय असें नाव आहे त्यांत ऋग्वेद आणि यजुर्वेद यातील स्तुतिपर आणि प्रार्थनापर असे अनेक मंत्र असून त्या मत्रांवर दयानंदाचें केवळ अध्यात्मपर असें संक्षिप्त व्याख्यान आहे त्याच मत्राचा व्यवहार-परही अर्थ आहे, पण तो दयानंदानीं दिला नाहीं दयानदाच्या संस्कारविधि पुस्तकांत हे प्राथमिक म्हणावयाचे मत्र दिले आहेत

सर्व संस्काराच्या आरभी ईश्वरस्तुति प्रार्थनोपासनेनिमित्त मत्रपठन* झाल्यानतर स्वस्तिवाचन§ आणि शान्ति प्रकरण‡ यातील खालीं उल्लेखिलेले मत्र म्हणावयाचे असतात ते विस्तारभयास्तव येथें देता येत नाहीत

---

* ओ३म् विश्वानिदेव सवितर्दुरितानि० य० अ ३० म ३ हिरण्यगर्भः समवर्तताग्रे० इ० य० १३।४; य आत्मदा०—य० २५।१३, यःप्राणतो०—य० २३।३, येन द्यौरुग्रा —य० ३२।६, प्रजापतेन ,—ऋ० १०।१२१।१०; सनोबन्धु० य० ३२।१०, अग्नेनय०, य० ४०।१६

§ अग्निमीळे पुरोहित०-ऋ० १।१।१, सतःपितेव सुननेऽग्ने०—ऋ० १।१।९; स्वस्तिनो०—ऋ०५।५१।११,स्वस्तये०—ऋ०५।५।१२, विश्वेदेवा०ऋ०५।५१।१३; स्वस्तिमित्रावरुणा०। स्वस्तिपन्थामनुचरेम०—ऋ० ५।५१।१४।—१५ ये देवाना०—ऋ० ७।३५।३५, येभ्यो मा १०।६३।३, नृचक्षसो०—४,सम्राजो ये० ५कोव.स्तोम० ६ येभ्यो होत्रा० ७, य ईशिरे० ८ भरेष्विद्र० ९ सुत्रामाणे० १०, विश्वेयजत्रा० ११, अपामीवामप० १२, अरिष्ट स मर्त्तो० १३, य देवासोऽवय० १४, स्वस्तिनः पथ्यासु० १५,स्वस्तिरिद्धि० १६, ऋ० १०।६३।४—१६ मत्र १० यांतील "दैवीं नाव" याचा अर्थ विद्युत्‌विमान आणि म १४ यातील रथ=बाष्पयान असा अर्थ करतात इषेत्वोर्ज्जेत्वा०—य० १।१, आनोभद्राः २४।१५, देवाना भद्रा० य०—२५।१५. तमीशान—य० २५।१८, स्वस्तिनइन्द्रो० य० २५।१९ भद्रकर्णेभिःय० २५।२१ ५=१ अं ग्नं आं याहि वीं तं ये, त्वमग्ने यं ज्ञां नों० सा० छन्द आ० प्रपा० १।१—२ येत्रिषप्ता० अवर्व० १।१।१।१

‡ शन्न इद्राग्नी ,इद्र=विद्युत्],-ऋ० ७।३५।१—१३ [म. ७ त्वष्टा=विवेचक विद्वान्], इद्रो विश्वस्यराजभि० [म ९—अदितीः=विद्वान् स्त्रिया० विष्णु=व्यापक ईश्वर]—य० ३६।८—१०—११, १२—१७—य० २४।३४।९—६; सनः पवस्व० साम०—१।१, अभय नः०—अथर्व १९।१५।५—६

सर्व संस्कारांत करावा लागणारा सामान्य विधि म्हणून कांहीं गोष्टींचा उल्लेख स्वामींनीं संस्कारविधींच्या आरंभीं केला आहे. यज्ञदेश स्वच्छ व पवित्र असावा, यज्ञशाळा १६×१६×१०हात या प्रमाणाची असावी, ती ध्वजपल्लवांनीं सुशोभित, गोमयानीं शुद्ध केलेली, हळद, पिंजर, मेदा याच्या रेंखाकृतीनीं शृंगारलेली असावी * यज्ञकुंड आहुतींच्या सख्येच्या मानाने लहानमोठे असावें समिधा, पलाश, आम्र, विल्व इत्यादींच्या असाव्यात [पार० गृ. सू.] § होमद्रव्यात, [१] केशर † कस्तुरी, वेलची इ० सुगन्धित, [२] घृत, ‡ गहूं, उडिदादि पुष्टिकारक [३] साखर, अगूर इ० मिष्ट आणि [४] सोमलतादि रोगनाशक औषधि, असे चार प्रकार असावेत शिवाय खीर, लाडू, मोहनभोग, भात, खिचडी इत्यादि पदार्थांचा स्थालिपाक करावा यज्ञपात्रे चांदीची किंवा लाकडी असावीं लाकडी खडावा, लांकडी पाट, ह्या विजेच्या अवाहक असल्यामुळे फार उपयोगी असतात ऋत्विजादि पुरुष चांगले विद्वान्, धार्मिक, जितेंद्रिय, कर्मकुशल, असे गुणयुक्त असावेत यजमानाने कर्म करताना पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख बसावे

ओ३म् अमृतोपस्तरणमसि स्वाहा+ ॥१॥ [हे आमचे म्हणणे शोभन असो] ओ३म् अमृता पिधानमसि स्वाहा ॥२॥ ओ३म् सत्य यशः श्रीर्मयिश्री: श्रयतां स्वाहा ॥३॥ या तीन मत्रानीं तीन आचमने करावीं. आचमनाचा हेतु कंठ साफ करून तरतरी आणणे हा एक असतो × नतर सर्व इंद्रियांची सुस्थिति असावी.

---

* हळदीनें मुग्या जातात मेदावर मुग्या वगैरे कीटक तोच खाण्यासाठी थाबतात

§ अफगाणिस्थानात बदामाच्या, इग्लडात ओक वृक्षाच्या, जर्मनींत लवेंडरच्या आणि इटलींत युक्लेप्टिसच्या समिधा घेता येतील.

† या हवनाने महामारीचा नाश होतो अगर, तगर यानीं काहीं विषारी जंतु जातात.

‡ तूपही विषनाशक आहे साखरेच्या हवनाने हे फिव्हर वगैरे रोगाचीं बीजें नाश पावतात

+ स्वाहा याचा अपभ्रश इग्रजी 'हुर्रा' होय त्याचा अर्थ शुभकर्मवाचक आहे.

× पहिल्या आचमनाच वेळीं स्वच्छ जल हे अमृतोपम आहे असें मनांत आणावे दुसऱ्या आचमनाचे वेळीं ते पोषक आहे अशी भावना करावी. आणि तिसऱ्या खेपेस सत्य आणि उत्तम कर्मद्वारा धनप्राप्तीची आवश्यकता प्रपंचांत फार आहे याचें स्मरण करावे

अशी भावना करून 'ओ३म् नमोमेंप्राणोऽस्तु... ओ३म् अक्ष्णोर्मेचक्षुरस्तु... ओ३म् अरिष्टानि मेऽङ्गानि तनूस्तन्वा मे सह सन्तु ॥ [पा०, ३।२५] या मन्त्रानी अंग. स्पर्श करावा * व मार्जन करावे † नतर ओ३म् भूर्भुवः स्वाहाः ही तीन परमेश्वराचीं नावे घेऊन ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य याचे घरून अग्नि किंवा तुपाचे § दिव्यावर कापूर पेटवून आणावा आणि ओ३म् भूर्भुव स्वद्यारिव० [-य०, ३।५] मन्त्रानें अग्न्याधान करावे नतर उद्बुध्यस्वाग्ने० [-य०, १५।५४] या मन्त्रानें अग्नीची प्रार्थना करून ओ३म् अयन्त इध्म० ओ३म् समिधाग्नि० । सुसमिद्धाय- शोचिषे०। तन्वासिमिद्धशगिरो० [-य०, ३।१ ते ३]या मन्त्रानीं समिदाधान करावें नंतर पुन्हा ओ३म आयन्त इध्मा० या मन्त्राने अग्नीची प्रार्थना करून पांच घृता- हुति द्याव्या

नतर ओ३म् अदितेऽनुमन्यस्व ॥ इ० [गोभिल गृ०प्र०, ख. ३ सू०१-३ किंवा आपस्तब गृ० सू०, २।४।१ ] आणि ओंदेव सवितः प्रसुव इ०—य०, ३०।१ या मन्त्रानीं चारी बाजूस जलसिंचन करून अहिंसादि गुण सपादनार्थ अनुकूल बुद्धि ईश्वराजवळ मागावी. पुढें प्रसगविशेषीं निरनिराळया मन्त्रानीं यज्ञकुडाच्या उत्तर- दक्षिण दिशेस दोन आघारावाज्याहुति,‡ कुडाच्या मध्यभागीं आज्य भागाहुति,×

---

* ही एक मानसोपचारपद्धति आहे भावना तीव्र करून त्यायोगें इंद्रियें दृढ- बल करणें शक्य आहे

† मार्जनाने आळस जाऊन शान्ति येते बाप्तिस्म्यात शिरोमार्जन असतें.

§ रॉकेलचे दिवे वापरू नयेत तिळाच्या किंवा खोबरेलाच्या दिव्यापेक्षा तुपाचा दिवा अधिक लाभदायक आहे.

‡ ओ३म् अग्नये स्वाहा इदमग्नये इदन्नमम ॥-य०, २२।२७ ओ३म् सोमाय० -य०, २२।२८ [परमेश्वराप्रीत्यर्थ ]—

अखेरचे 'इंदन्नमम' हे परोपकारबुद्धि जागृत ठेवतें. ही आहुति कुंडाच्या उत्तरेस व दाक्षिणेस द्यावी अनेक मन्त्र म्हणण्याचें कारण, पहिली समिधा पेटण्यास अवसर मिळावा, तसेंच आत क्वचित् अडकलेल्या जतूस बाहेर पडता यावें

× ओं प्रजापतये०-य०, १९।२८. ओं इंद्राय०-य०, २२।२७. [प्रजापालक व ऐश्वर्यसपन्नाप्रीत्यर्थ ]

व्यांहृति आहुति, स्विष्टकृत् होमाहुति, प्राजापत्याहुति प्रधानहोमसंबंधी आज्याहुति, अष्टाज्योहुति, आणि सर्व वैपूर्ण ५ स्वाहा या मत्रानें पूर्णाहुति देऊन अखेर ओ भूर्भुवः स्वः । कं यां नश्चित्रे [६] [ सा० उत्तरा० अ० १ खं० ३ म १ ते ३ ] इत्यादि वामदेव्यगान करावें नतर तेथे जमलेल्या सर्व मंडळीचा यथोचित सत्कार करून समारभ समाप्त करावा कोणत्याही सस्काराच्या वेळीं शूद्रादि यजमानास मत्रोच्चार नीट करता येत नसेल तेव्हा त्यास क्रियेचे तंत्र सांगून मत्र पुरोहिताने म्हणावे विधीनतर भोजन दक्षिणादि ज्यास द्यावयाचें त्यास देऊन हुतशेष [ घृत, भात, मोहनभोग वगैरे ] सर्व स्त्रीपुरुषानीं सेवन करावे. होमहवनापासून हवा शुद्ध होते इंग्रजी हायजीन हा शब्द हवन यजन याचाच अपभ्रंश आहे

---

[१] ओंभूरग्नये० ओंभुवर्वायवे० ओंस्वरादित्याय० ओंभूर्भुवः०—पार० १।५।३–४ [ सर्वगुणसपन्न ईश्वराप्रीत्यर्थ ]

[२] ओं यदस्य कर्मणो०–शत० का० १४।८।७।५ [ भौतिक अग्निप्रीत्यर्थ ].

[३] ओं प्रजापतये०–य० १८।२८ [ प्रजापालकाप्रीत्यर्थ ].

[४] ओंत्वन्नो अग्ने०, ओ स त्वन्नो०, ऋ० ४।१।४-५ ओंइमंमे वरुण० ऋ० १।२५।१९, ओंतत्त्वायामि० ऋ० १।२४।११, ओं भवतन्न०य० ५।३, ओं येते शत०, ओं अयाश्चाग्ने, ओ उदुत्तम० ऋ० १।२४।१५ [ प्रकाशमान, प्रशंसनीय, राजन, जगदीश्वर व भौतिक अग्नि याची प्रार्थना].

[५] ओं भूर्भुवः स्वः अग्न आयूंषि० ओ भूर्भुवः स्व० अग्निर्ऋषि०, ओं भूर्भुवः स्वः अग्नेपवस्व० ऋग्वे०, ९।६६।१९–२१. ओं भूर्भुवः स्वः प्रजापते ऋ०, १०।१२१।१० [ अग्नि व प्रजापालकाची प्रार्थना ]

यातील दुसऱ्या आहुतीचा मत्र—'ओं भूर्भुवः स्वः । अग्निर्ऋषिः पवमानः पाचजन्यः=पुरोहितः । यातील पाचजन्य या शब्दावरून चातुर्वर्णिक आणि अति शूद्र, किंवा गोरे, पिवळे, काळे, ताम्रवर्णी आणि भुरे असे भूलोकचे सर्व लोक यज्ञाचे अधिकारी ठरतात तसेंच तिसऱ्या मत्रात "दधद्रयिं मयिपोष स्वाहा" असे शब्द आहेत. त्यावरूनही उपासक हा एक तुच्छही व्यक्ति असू शकतो असें दिसतें.

[६] वामदेव्यगानात श्रेष्ठ बुद्धियुक्त मनुष्यास परमात्मा अनुकूल होतो शारीरिक बळाचें मुख्य साधन अन्न आहे. सर्वांचा तारक एक ईश्वरमात्र आहे, दुसरा कोणी नाहीं असा भावार्थ आहे

मामवेदांतील मंत्राक्षरांवर जे अंक अक्षरें असतात, त्यावरून बीजगणिताची कल्पना पूर्वीची आहे हें सिद्ध होतें.

ह्याप्रमाणें सामान्य विधि प्रत्येक संस्काराच्या आरंभी करावयाचे असतात आतां गर्भादानापासून कर्णवेधापर्यंत प्राथमिक संस्कारांचा यापुढे निरनिराळा विचार करू

**गर्भादान**—सुप्रजाजननाकडे दयानंदाचें विशेष लक्ष दिसतें त्यांच्या मतें गर्भादान या पहिल्या संस्कारार्ची खरी फलश्रुति प्राप्त होण्यास वधू किमानपक्ष १६ वर्षांची व उत्तम पक्ष चोवीस वर्षांची, आणि वर किमानपक्ष २५ वर्षांचा व उत्तम पक्ष ४८ वर्षांचा असता, त्याचा विवाह झालेला असावा या बाबतींत सुश्रुत सूत्रस्थान, अ० ३५ व शारीरस्थान, अ० १० तसेच मनु अ० ३ यावर त्यांचा विशेष भर आहे रजस्वला स्त्रीस ते अस्पृश्यच मानतात पहिल्या चार व पुढे अकरावी आणि तेरावी आणि सतरापासून महिनाअखेर तसेच अष्टमी,चतुर्दशी,पौर्णिमा आणि अमावास्या या तिथींच्या,अशा रात्री त्यांच्या मतें ऋतुदानाला अयोग्य मानाव्या. दिवसास तर ऋतुदानाचा केव्हाही निषेधच आहे राहिल्या फार तर दहा रात्री त्यापैकी आठ, दहा, बारा, चौदा आणि सोळा या रात्री आणि त्यातही चौदा आणि सोळा या दोन रात्री पुत्रेच्छु स्त्रीपुरुषाना ऋतुदानास विशेष अनुकूल म्हणून सांगितल्या आहेत. ऋतुदानाची वेळ म्हणजे रात्री दुसरा किंवा तिसरा प्रहर अशी त्यांनीं निश्चित केली आहे ऋतुदानाच्या बाह्यक्रियेची माहिती उत्कृष्ट गर्भोत्पत्ती-करिता औषधि, आणि पुत्रलाभाकरिताही इलाज दयानंदानी सांगितले आहेत ते वाचकानी जरूर तर मुळातूनच पाहावे या विषयासंबधी माहिती देण्यात लज्जा आणि मुग्धता फारच हानिकारक झाली आहे असे ते मानतात विवाह, गर्भा-दान आणि गृहाश्रम यांतील सर्व क्रिया तरुणानी लग्नापूर्वीच अवश्य समजून घ्याव्या असे आर्यांचे मत आहे पण आम्हास ही मनाची संकोचवृत्ति सोडता येत नसल्यामुळे देहधर्माची अधिक परिस्फुटता न करता विशेषेकरून संस्काराच्या धार्मिक स्वरूपाचेंच दिग्दर्शन पुढे केलें आहे

गर्भादानाच्या रात्रीच्या अगोदरच्या दिवशी पूर्वी सांगितल्याप्रमाणे ईशस्तुति, प्रार्थना, उपासना, स्वस्तिवाचना, शांतिपाठ व सामान्य प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें हवन केल्यावर पतिपत्नीने वेदीच्या पश्चिमेस बसावे ऋत्विजानी चारी बाजूस

बसावें. पत्नीनें पतीच्या डाव्या बाजूस * बसून आपला उजवा हात (प्रेममर्यादा-दर्शक) वराच्या उजव्या खांद्यावर ठेवून नंतर उभयतांनी यज्ञकुंडांत वीस मंत्रांनी+ वीस आज्याहुति द्याव्या नंतर भाताच्या खिरीच्या दोन, भाताच्या सहा, देऊन अष्टाज्याहुति मागीलप्रमाणें देऊन खालील मंत्र म्हणून आणखीही आज्याहुति द्याव्या ‡ मग खालील नऊ मंत्रांनी आज्य किंवा मोहनभोग यांच्या आहुति द्याव्या § पुढें आणखी दोन आज्याहुति द्याव्या अखेरची स्विष्टकृत आहुति झाल्यावर हुतशेष घृत पत्नीच्या सर्वांगाला चोळून तिनें स्नान करावें नंतर स्वच्छ वस्त्र नेसून पतिसहित पत्नीनें (विधेसमाप्ति व गुणस्वीकृतीचें दर्शक म्हणून) यज्ञकुंडास प्रदक्षणा घालून सूर्यदर्शन करावें खालील मंत्रांनी परमेश्वराचें उपस्थान करून पतीसहित वडील मंडळींचें अभिवादन करावें. वेदीचे पश्चिम बाजूस बसून वामदेव्यगान करावें नंतर उभयतांनी सर्व मंडळींसह भोजन करावें आणि पुरोहितादि मंडळीस दक्षणा देऊन व त्यांचा सत्कार करून त्यांची रवानगी करावी रात्रौ गर्भधारणा झाल्याबद्दल उभयतांची समजुत असल्यास त्याच्या दुसऱ्या दिवशीं, किंवा गर्भधारणा न झाल्यास पुढल्या महिन्याच्या आरंभी, पुन्हा खालील मंत्रद्वारा× आहुति देऊन अग्निकार्य करावें आणि कृतकार्य झाल्यावर शान्त्याहुति आणि पूर्णाहुति सामान्य प्रकरणांत मागें सांगितल्याप्रमाणें द्याव्या याप्रमाणें गर्भधारणेच्या प्रत्येक क्रियेपूर्वी संस्कार करावयास पाहिजे. उत्तम आहार आणि शास्त्रोक्त हवन केल्या-वर झालेला समागम अपूर्व गुणयुक्त संतान उत्पन्न करील यांत शंका नाहीं. शृंग ऋषीनें दशरथ राजास हाच इलाज सांगितला असावा, असें आर्य मानतात

* कारण त्या बाजूला शरिराचें उत्तमांग जें हृदय तें असतें

+ मंत्र ब्राह्मण, प्र० १ ख० ४ मं० ५, पारस्कर गृ० कां०, ११ सू० २ यांत अग्नि, वायु, सूर्य, आणि चंद्र, यांच्या (किरणस्पर्श) नियतसेवनानें रोग आणि वंध्यत्व दूर होऊन गोधन पाळण्यास बळ येतें असें आहे

‡ पारस्कर गृ०कां०, १ कं० २ सू० ७

§ ऋग्वेद, मं० १० सू० १८४, मं० १ ते ३ यजु०, १९ मं० ७३. यजु०, ३६।२४. अथर्व०, ६।१७।१-४.

× ऋ०, मंत्र ५, सू० ७८, मं० ७-९. यजु०, अ० ८ मं० २८-२९. मंत्र-ब्राह्मण, १।४।८-९.

**पुंसवन**—गर्भधारणेनंतर दोन वर्षें कडकडीत ब्रह्मचर्य राखावें * पत्नीला दोनतीन महिने गेल्यानंतर तिने उजव्या नाकपुडीनें वडाची पारबी व पानें हुंगावीं §तसेच ब्राह्मी आदि पौष्टिक औषधींचें सेवन करावें त्यानंतर एक दिवस सामान्य विधीप्रमाणें ईश्वराची स्तुति, प्रार्थना, उपासना, स्वस्तिवाचन, शांतिपाठ आणि हवन झाल्यावर खालील मत्रांनीं ⊙ दोन आज्याहुति द्याव्या नतर एकातांत पत्नीचे हृदयावर हात ठेवून मत्र ⊖ म्हणावा मग महावामदेव्यगान करून वरीलप्रमाणे नस्य करावे ते झाल्यावर खालील मत्र+ म्हणून पत्नीचे ओटीपोटावर हात ठेवून पुन्हा मत्र † म्हणावा याप्रमाणें पुसवनाचा विधि झाल्यावर गर्भिणीने युक्ताहार विहार करून प्रसन्न चित्ताने असावे

या सस्काराचा उद्देश गर्भ वीर्यवान् व्हावा, गर्भपात न व्हावा अर्थात् पूर्ण दिवस गेल्यावर उत्कृष्ट सतान व्हावे, असा आहे पुत्र किवा कन्या होणे हे गर्भाशयांत वीर्यातत्व कमजास्त असण्यावर अवलबून आहे या विधीला उघड उत्सवाचें स्वरूप देण्यात भावना उल्हसित आणि अनुकूल व्हाव्या असा हेतु आहे

**सीमन्तोन्नयन**— हा सस्कार गर्भिणीच्या चवथ्या– महिन्यात शुक्लपक्षांत× चद्र मूलादि पुरुष नक्षत्रानें युक्त असेल तेव्हा अथवा सहाव्या किवा आठव्या

---

* पुमा॑ सौमित्रावरुणौ०–मं० ब्रा०, १।४।८–९ शमीमश्वत्थ–अथर्व०, ६।२।११.

§ अथास्य मडलागार० १ अथपुसवन पुरास्यद्गत०–पार०, १।१४

⊙ ओं आ ते गर्भो योनिमेतु०—म०ब्रा०, १।१।१०

⊖ ओ यत्ते सुसीमे०–मं० ब्रा०, १।५।१०.

+ हिरण्यगर्भ समवर्तताग्रे०–यजु०, १३।४, अद्भ्यःसंभृतः०–य०, ३१।१७.

† सुपर्णोऽसि०–य०, १२।४

+ लोकास येण्याजाण्यास रात्रीचें सोयीचें पडावें म्हणून

– या महिन्यात गर्भिणीची दोहृदावस्था सुरू होते. यास्तव तिचें चित्त प्रसन्न ठेवून गर्भाची मानसिक उन्नति साधावयाची असते

× चंद्रमा स्त्री संज्ञक ग्रह आहे. यासाठीं समता राखण्याकरितां पुरुष-नक्षत्राची अपेक्षा आहे.

महिन्यांत पुसवन संस्काराप्रमाणे करावा. प्रारंभीं सामान्य विधींतील प्राथमिक भाग झाल्यावर यज्ञकुंडाच्या चारी बाजूस जलसिंचन करून खालील मत्रे म्हणावा. नंतर पूर्ववत् आधारावाज्य भागाहुति, व्याहृति आहुति देऊन खालील मंत्रांनीं तादूळ, तीळ, आणि मूग यांच्या खिचडीच्या सात आहुति द्याव्या. नंतर (प्रजापते तत्त्व०) म्हणून आठवी, (ओं प्रजापतये०) म्हणून एक भाताची, (यदस्य कर्मणो०) म्हणून एक खिचडीची (ओंत्वन्नो अग्ने०) म्हणून आठ आज्याहुति आणि (ओ३म् भूरग्नये० ) म्हणून चार आज्याहुति देऊन पति पत्नीने एकान्तात जाऊन पतीने पत्नीच्या पाठीशी बसावे. आणि खालील मत्र म्हणून पत्नीच्या केशास तेल लावून ते विचरावे, भाग काढावा आणि केसाचा अबाडा बाधावा नतर उभयतानी यज्ञशालेत यावें मग वीणा आदि वाद्ये वाजवावीं. वामदेव्य गान करावे मग खालील मत्र म्हणावा. व इतरही मंत्र म्हणावे. त्यानतर हवन करून राहिलेल्या खिचडीत बरेंच कढन तूप घालून त्यांत पत्नीनें आपले प्रतिबिब पहावे पतीने तिला 'किं पश्यसि' असे विचारल्यावर

[१] पुरुषवाचक नक्षत्रे सूर्याप्रमाणे तेजोमय आहेत जल हे मृदु आहे. स्त्रीसज्ञक नक्षत्रे जल देणारी आहेत स्तन केशादि कोमल चिन्हे स्त्री बोधक आहेत गर्भिणीच्या सतानाच्या ठिकाणी कोमलतेपेक्षा ओजस्वितेची जरुरी असते.

[२] ओं देव सवितः•—यजु०, ११।७.

[३] ओं धाता ददातु० अ० ७।१७ —ऋग्वे०, २।३२।४-५

[४] ओ३म् सुमित्रिया०—यजु०, ६।२२ मूर्द्धान दिवो•-य०,७ २४ ओ३म् अयमूर्जावतो० इति० म० ब्रा०, १।५।१—२ ओ३म् राकामह०—ऋ०,२।३२।४ ५.

[५] स्त्रीच्या मस्तकाची जोपासना करण्याने गर्भाच्या मेंदूवर परिणाम होतो. आपलें सतान बुद्धिमान् निपजावे हा ध्यास गर्भिणीला राहील स्त्रियाचे केश हा त्यांचा एक उत्कृष्ट शृंगार आहे अर्थात् ते काम तिच्यासाठीं तिच्या पतीने करण्यांत तिच्यासबंधी प्रेमादर व्यक्त होऊन ती प्रसन्न होते आणि तिची प्रसन्नता सतानास अत्यंत लाभदायक होते

[६] ओ३म् सोमएव० —पार०, १।१४

[७] पतिपत्नी यांत स्वभावतः स्त्रीचें मुखच सुदर असते म्हणून तिनेंच आपलें प्रतिबिंब पहावें. तुपात तें दिसण्यास वेळ लागेल तितकें भावनादार्ढ्य होण्यास अवसर मिळेल शिवाय गरम तुपाची वाफ नाकातोंडांत जाण्यानें हित होईल. मातेचे सस्कार गर्भावर जें कार्य करतात तें पुढें कशानें व कोणाच्यानेंही होत नाहींत. यासाठीं गर्भिणीची भावना उज्ज्वल केली पाहिजे हाच ह्या संस्कारांतील हेतु आहे.

'प्रजा पश्यामि' असें उत्तर तिनें द्यावें मग अनेक वृद्ध सौभाग्यवती व पुत्रवती स्त्रियांचे आशीर्वाद घेत तिनें अंतर्गृहात त्या हुतशेष खिचडीचे सेवन करावे. भोजनोत्तर सर्वांची सत्कारपूर्वक रवानगी करावी.

जातकर्म—हा विधि स्त्रीप्रसूतीच्या वेळी करतात यात मुलभप्रसूति, बाळंतिणीचे आरोग्य, तिच्या सबंधी प्रेमदर्शन, आणि नवबालकावर प्रथम वदिक संस्कार आणि त्याचे रक्षण इत्यादि हेतु दिसतात स्त्रीच्या प्रसूतीच्या वेळीं स्त्रीच्या शरीरावर खालील मंत्राने मार्जन करावे स्त्री प्रसूत झाल्यावर दाईनें मुलाला निर्मल करून पित्याच्या मांडीवर द्यावे त्याने मुलाला घेऊन त्याचे एक वितीवर नालछेदन करावें नंतर त्यास किंचित उष्णोदकाने स्नान घालून यज्ञकुंडाजवळ न्यावें तेथ पूर्वोक्त अग्न्याधान, आणि समिदाधान झाल्यावर पुरोहितास आसन देऊन पित्याने (अयन्त इध्म इ०) तीन मंत्रांनी चंदनाचे समिदाधान करावे नंतर चार आधारावाज्य भागाहुति आणि चार व्याहृति मिळून आठ आज्याहुति द्याव्या. पुन्हा खालील मंत्राने दोन आज्याहुति द्याव्या मग वामदेव्यगान करावें पुढें ईश्वरोपासना केल्यावर मेधाजनन आणि आयुर्वर्धनासाठी तूप व त्याच्या तिप्पट मध एकत्र करून सोन्याच्या कांडीने त्याने नवीन बालकाच्या जिभेवर ओ३म् असें लिहावे त्याच्या उजव्या कानात 'वेदोसीति 'तुझें गुप्त नाव वेद आहे' असे सांगून, खालील मंत्र म्हणत त्याच सोन्याच्या कांडीने थोडथोडा तूपमध सात वेळा चाटवावा तांदूळ आणि यव स्वच्छ करून त्याच्या पाण्याचा एक थेंब मंत्रपूर्वक

---

(१) ओ३म् एजतु०—य०, ८।२८ ओ३म् अवैतु पृश्नि०—पा० गृ०, १।१६।२

(२) ओ३म् या तिरश्ची०—सा० वे० मं०—ब्रा० १।५।७ यात पत्नीची स्तुति आहे. हे धार्मिक नारीपूजन सुधारलेल्या नारीपूजनापेक्षा अधिक पवित्र आहे. ओ३म् विपश्चित्पुच्छम भरत्तद्धाता०—सा० वे० मं० ब्रा०, १।५।७ या मंत्रांत पत्नीची विद्वानांना प्रार्थना आहे की, संतान होणे ही मोठी स्पृहणीय गोष्ट आहे. तेव्हा माझ्या पतीस पुन्हा संतानलाभ होवो व तन्निमित्त तुमचेंही पुन्हा आगमन घडो.

(३) ओं प्र ते ददामि० १ मेधाते मित्रावरुणौ० २—मं० ब्रा०, १।५–६. ओं भूस्त्वयि ददामि०—पा० का०, १।१६ ओ३म् सदसस्पतिमद्भुतं० ऋ०, १।१८.

(४) ओ३म् इदमाज्य०—मं० ब्रा०, १।५।८.

बालकाचे मुखांत घालावा. मुलाच्या उजव्या कानाशीं खालील नऊ मंत्र म्हणावे. त्याचप्रमाणे डाव्या कानाशींही तेच मंत्र म्हणावे मुलाच्या खांद्यावर अलगज हात ठेवून खालील मंत्र म्हणावे आणि खालीलें मंत्राचा तीन वेळा जप करावा मग बालकाचे खांद्यावरील हात काढावे आणि जेथे मुलाचा जन्म झाला त्या खोलीत जाऊन दीर्घायूबद्दल प्रार्थना करावी आणि बाळंतिणीच्या शरिरावर समंत्रक मार्जन करावे मुलास आशीर्वाद द्यावे खालील मंत्र म्हणून त्याच्या मस्तकाचे अवघ्राण करावे मग ईश्वरप्रार्थना करून आणि प्रसूता स्त्रीस प्रसन्न करून तिने स्तन उष्णोदकाने धुऊन पुसावे मग एक मंत्र म्हणून तिचा उजवा स्तन बालकाचे मुखास लावावा पुन्हा दुसरा मंत्र म्हणून डावा स्तन बालकाच्या मुखास लावावा.* इतकें झाल्यावर एक मंत्र म्हणून पाण्याचा भरलेला एक कलश तिच्या उशागती उघडाच ठेवावा रोज त्यातील पाणी काढून पुन्हा तो भरून ठेवावा असें दहा रात्रीं केल्यानें हवेंतील दोष पाण्यात आकर्षित होऊन आरोग्यास मदत होईल तसेंच

[१] ओ३म् मेधान्ते देवः०—इ० पार० का०, १ क० १६

[२] ओ३म् इन्द्र श्रेष्ठानि०—ऋ०,२।२१. अस्मेप्रयन्धि०—ऋ०, म० ३।३६ ओ३म् अश्मा०—म० ब्रा०, १।५।१८

[३] त्र्यायुष जमदग्ने०—य०, ३।६२

[४] ओ३म् वेदते भूमि०—पार०, ७।१६

[५] यत्ते सुशीमे हृदयं हितमन्त०—म० ब्रा० ,१।५।१०—१३.

[६] कोसि कतमोस्ये०—म० ब्रा०, १।५।१४।१५

[७] अगादगात्स्रवसि०—म० ब्रा०, १।५।१६—१९

[८] ओ३म् इडासि०—पा०, १।१६

[९] ओ३म् इमं स्तन मूर्जस्वन्त०—य०, १७।८७

[१०] ओ३म यस्ते स्तन शशयो०—ऋ०, १।१६४।४९.

*मातेचें दुग्धप्राशन दहा महिनेपर्यंत उभय मायलेकास हितावह आहे पण. दयानद सत्यार्थप्रकाशात म्हणतात कीं, फक्त सहाच दिवस आईनें दूध पाजावे. पुढें दाईनें पाजावे. स्तनाच्या छिद्रावर औषधि लावून दुग्धस्राव बंद करावा, असें केल्यानें एक महिन्याच्या आंत स्त्री पुन्हा पूर्ववत युवती होते.

[११] ओ३म् आपोदेवेषु०—पा०, १।१६.

दहा दिवस रोज सकाळसंध्याकाळ खालील* मंत्राने (राक्षसबाधा) विषजंतु निवृत्ती-करितां भातशिरसाच्या दोन आहुति द्याव्या. नंतर पित्याने बाळतखोलींत आणि कांहीं धार्मिक विद्वानांनीं बाहेर उभें राहून खालील आशीर्वाद† मंत्र म्हणावे

**नामकरणसंस्कार**—नांव कर्णमधुर, उच्चारण्यास सुगम, स्त्रीपुरुषवाचक, जातिवाचक, इतकेंच काय, पण शक्य तो भावि व्यवसायोद्देश सूचकही असावें, हा ह्या संस्कारातील हेतु आहे बालकाचा जन्म झाल्यानतर अकरावे, एकशें-एकावे दिवशी किवा पुढील सालच्या वाढदिवशीं हा सस्कार करावा माता अशक्त असणे किवा पिता देशांतरी गेलेला असणे अशा अडचणीस्तव हा दिना-वधीचा विकल्प आहे ज्या दिवशी नाव ठेवावयाचे असेल त्या दिवशी रीती-प्रमाणे इष्टमित्र बोलावून प्रथम सामान्य विधीतील ईश्वरोपासना, स्वस्तिवाचन, शांतिप्रकरणादि सर्व कार्यक्रम करून नतर आधारावाज्य भागाहुति चार, व्याहृति आहुति चार, आणि (त्वन्नो अग्ने० इ०) मत्र म्हणून आठ, याप्रमाणे आज्याहुति दिल्यावर प्रथम पत्नीने पतीचे मांडीवर व पुन्हा पतीने पत्नीचे मांडीवर बालकास उत्तराभिमुख करून द्यावे. मग प्रधान होमास सुरुवात करावी ओ३म् प्रजापतये स्वाहा. म्हणून पहिली आहुति आणि त्यानतर ज्या तिथीस मूल जन्मले असेल ती तिथी, तिथीदेवता, तें नक्षत्र. ( त्याचे आकृति रूप नाव ) नक्षत्रदेवता याची ( ओ३म प्रतिपदे स्वाहा, । ओ३म् ब्रह्मणे स्वाहा । ओ३म् अश्विन्यै स्वाहा । ओ३म् अश्विभ्यां स्वाहा ।) याप्रमाणे नावे उच्चारून आहुति द्याव्या.§ मग स्विष्ट-कृत एक व व्याहृति चार आहुति दिल्यावर मातेच्या मांडीवरील मुलाच्या नासाग्रीं होणाऱ्या श्वासोच्छ्वासास पित्याने स्पर्श करावा हेतु हा की, मुलानें त्या स्पर्शानें

---

* ओ३म् शण्डामर्कोउपवीर'–पा०, १।१६

† मानोहासिषुर्ऋषयो०–अथर्व०, ६।४।४१ इदंजीवेभ्य'–अथर्व०, १२।२।२३. विवस्वान्नो०–अथर्व०, १८।३।६१

§ हवनाचे वेळी म्हणावयाचे मत्र कधी उपदेशार्थ, कधीं सन्मानार्थ व कधीं स्मरणार्थ म्हणावयाचे असतात म्हणजे हवाशुद्धि, आरोग्य इत्यादि हेतूंनीं हवन तर करावयाचेंच असतें पण त्या निमित्तानें वरील विविध हेतूंनीं मत्रही म्हणावे. अशी योजना आहे. त्याचप्रमाणे वरील आहुतींत जन्मस्थ तिथिनक्षत्रांचा पुनः-पुन्हा उच्चार होऊन ती गोष्ट सर्वांस विदित व्हावी हाच हेतु आहे.

हंसतमुख होत्सातें पित्याच्या तोंडून निघणाऱ्या पुढील+ मंत्राकडे अवधान द्यावें. नंतर बालकास आशीर्वाद द्यावा § पुढे महादेव्यगान, पाहुण्यांचा सत्कार आणि त्यांचा आशीर्वाद*याप्रमाणे समारंभ व्हावा ह्या संस्कारांत ब्राह्मणभोजनाचा विधि दयानदांनीं गाळला असला तरी पुरोहित, नेहमींचे वैद्य,धर्मोपदेशक, किंवा अशाच कर्मीत कमी तीन विद्वान् ब्राह्मणास भोजन द्यावे. असे संस्कारचंद्रिकाकार म्हणतात. नांव कोणतें ठेवावें यासबंधीं दयानदांनीं आश्वलायन गृह्यसूत्र ‡ व मनुस्मृत्यादिकांचे आधारे बरीच बारकाई सांगितली आहे त्यांतील ठळक गोष्टी मुलाच्या नावाचीं अक्षरें सम,मुलीची विषम असावी मुलीचे नाव अतिव्याप्ति दोषास्तव ताद्धित (जनकाची ती जानकी) असे नसावे तसेच नक्षत्र (रेवती), वृक्ष (चंपा),नदी(गंगा), अन्त्यज (चांडाळी), पर्वत (विंध्याचला), पक्षी (कोकिळा), अहि (नागी), प्रेष्य (दासी), भयंकर (भीमा), अशा अर्थाचीं नावें मुलींना ठेवूं नये ब्राह्मणाचे नांवापुढे शर्मा, क्षत्रियास वर्मा, वैश्यास गुप्त व शुद्रास दास असा अंती प्रत्यय असावा.

**निष्क्रमणसंस्कार**—ह्या संस्कारात रात्रीं चंद्रदर्शनाचा विधि असल्यामुळे हा संस्कार जन्मानंतर तिसऱ्या शुक्ल तृतीयेस किंवा चौथ्या महिन्यातील जन्म तीथ शुद्ध पक्षात नसेल तर शुक्ल पक्षातील त्या तिथीस करावा त्या दिवशी प्रातःकाळीं मुलाला न्हाऊ घातल्यानंतर त्याच्या मातेने विशिष्ट पद्धतीनें त्याला पतीच्या मांडीवर द्यावे या पद्धतींत, मुलाचे मस्तक उत्तरेस असावें, पत्नीने पतीच्या मागून जावें यावें, ह्या विशेष गोष्टी आहेत त्यानंतर खालील मत्रांनीं† पति पत्नीची स्तुति करीत असता जणु काय हीच ती आराध्यदेवता असे सर्वांस दिसण्यासाठीं तिनें पतीच्या डावे बाजूस पश्चिमाभिमुख उभे राहावें, असा विधि आहे नंतर पूर्वोक्त सर्व सामान्य विधि होतात मग खालील मंत्र× म्हणून पित्यानें पुत्राचे

+ हे बालक त्वमायुष्मान् वर्चस्वी तेजस्वी श्रीमान्भूयाः ।

§ अ. १ खं १ सूत्र ४–१०,

* कोऽसि कतमोऽसि कस्यासि कोनामासि०—य०, ७।२९ ओ३म् कोऽसि०—मं० ब्रा०, १।५।१४ ह्या मंत्रातील शेवटल्या असौ पदाचे ठिकाणीं मुलाच्या ठरविलेल्या नावाचा उच्चार करावा.

‡ ओ३म् सत्वाह्वे०—मं० ब्रा०, १।५।१५

† ओ३म् ओयस्ते सुसीमे०—मं० ब्रा०, १।५। १०–१२

× ओ३म्अङ्गादङ्गात्सम्भवसि०—पा०, १।१८

मस्तकास स्पर्श करावा खालील मंत्र मुलाच्या उजव्या व डाव्या कानांत म्हणावे. नंतर मुलाच्या मस्तकाचे आघ्राण करून खालील मंत्र म्हणून निमिषमात्र सूर्य-दर्शन करवावें थोडा वेळ शुद्ध हवेंत त्याला हिंडवून आणल्यावर त्वजीव शरदा शतं वर्धमान । असा तेथील मंडळींनीं आशीर्वाद द्यावा त्याचप्रमाणे रात्रीं चंद्रदर्शन करवीत असता परमेश्वराची स्तुति करून पतिपत्नींनी पृथ्वीवर अर्घ्यप्रदान करावें. ह्या गुरुत्वाकर्षणाच्या प्रयोगाप्रमाणे आमच्या शरिरातील जलांशाचे आकर्षण करणारा चंद्र आम्हांस आरोग्य देता होवो अशी प्रार्थना दोन वेळा केल्यावर मुलाला घरात न्यावे साहेबलोकांचीं तान्ही मुले हातगाड्यातून ज्याप्रमाणे दाया बाहेर नेतात त्याप्रमाणे शुद्ध हवापाणी व सृष्ट्यावलोकन याचे बाळकडू मुलाला दिले जावे सूर्यचंद्रदर्शन या गोष्टी निमित्तमात्र समजाव्या

**अन्नप्राशन**—मूल सहा महिन्याचें झाले किंवा त्यास अन्नपचन करण्याची शक्ति आली कीं, हा संस्कार करावा या वयात मुलाला माती खाण्याची चटक लागते कारण त्यात क्षार असतो. त्यास्तव त्यास टाकणखाराची लाही मधात चाटवावी, म्हणजे ही सवय मोडेल मुलानें रिंगणी वगैरे लाकडी किंवा रबरी चुफण्या चुंफल्याने दात बाहेर येण्यास मदत होते नऊ दहा महिन्याच्या नंतर मुलाला अंगावर पाजणे दोघांही मायलेकास घातक आहे, यासाठीं सहाव्या पासून दहाव्या महिन्यापर्यंत अन्नप्राशनसंस्कार करावा 'प्राशन' या शब्दात अन्न पातळ असावें हा हेतु आहे एक वर्षाच्या मुलाला क्षीरपा आणि दोन वर्षाच्या मुलाला क्षीरान्नाद म्हणतात ते सार्थ आहे.

अन्नप्राशनाकरिता चार तोळे भात शिजतानाच त्यात चार मासे तूप घालावें आणि मागून बारा मासे मध आणि एक मासा दहीं घालावे हे अन्न तयार करिताना सावधगिरीच्या सूचना लक्षात राहाव्या म्हणून खालील मंत्र म्हणावे मुलाच्य

[१] अस्मेप्रयन्धि०—ऋ०, ३।३६।१० इन्द्रश्रेष्ठानि०—ऋ०, २।२१।६

[२] ओ३म तच्चक्षुर्देवहित—य०, ३६।२४

[३] यददश्चंद्रमसि- म० ब्रा०, १।५।१३

[४] षष्ठे मास्यन्न प्राशनम०—आश्व०, १।१६।१,४—५.—पार०, १।१९।१

[५] सुश्रुत०, १ -।६४.

[६] ओ३म् प्राणाय त्वाजुष्ट प्रोक्षामि । ओ३म् अपानायत्वा । ओ३म चक्षुषेत्वा

जन्मदिवशीं सर्व आप्तइष्टांस बोलावून पूर्वोक्त सर्वसामान्य विधि झाल्यावर तयार झालेल्या भाताच्या दोन आहुति दोन मत्रं म्हणून द्याव्या नंतर त्या भातांत आणखी तूप घालावें खालील मंत्रांनी त्याच्या चार आहुति देऊन नतर पूर्वोक्त स्विष्टकृत, व्याहृति, आणि पूर्वोक्त दुसऱ्या आठ मिळून बारा आज्याहुति द्याव्या. मग हुतशिष्ट भातात आणखी सुगधियुक्त भात घालून त्याचे घास खालील मंत्रें म्हणत मुलास द्यावे नतर वामदेव्यगान आणि आलेल्याचा सत्कार झाल्यावर " त्वमन्नपतिरन्नादो वर्धमानो भूया " ॥ असा मुलाला आशीर्वाद देऊन विधि पुरा करावा हे सर्व मत्र अन्वर्थक असून मुलाच्या कानावर सस्कृत वाणीचे संस्कार व्हावे, असा त्यातील हेतु आहे

**चूडाकर्म**—बाराव्या महिन्यापासून तो छत्तिसाव्या महिन्यापर्यंत मुलाना दात येत असतात त्या वेळीं इतर विकारावरोबर डोक्यात खरूज वगैरे होण्याचा सभव असतो यासाठीं एक वर्षापासून तीन वर्षपर्यंत चूडाकर्म (चौल) करून डोकें साफ करण्याचा हेतु आहे मुडन करण्याने पुष्टि, वृष्यता, आयु, पवित्रता, सौंदर्य, सौभाग्य आणि संतान ह्याची वृद्धि होते, असे सागितले आहे क्षार करून मलई लावल्यानें मस्तकाला थडाई येते हा सस्कार शक्य तो उत्तरायणात शुक्र पक्षात एखाद्या मगलप्रसगीं करावा हा सस्कार मुलाप्रमाणे मुलींचाही करावा, असें चंद्रिकाकार सागतात. एकदा हा सस्कार केल्यावर पुढें पूर्वीच्या दक्षिणी ब्राह्मणाप्रमाणे शिखा ठेवावी कारण केस थडी, उष्णता व विद्युत् याचे अवाहक असून शेंडी हें एक सामाजिक चिन्ह आहे असेंही सागतात

आरंभीं सामान्य विधि संपूर्ण करून वेदीच्या उत्तरेस चार घट तादूळ, यव, उडीद आणि तीळ यानीं भरलेले ठेवावे " मग ओ३म् अदितेऽनुमन्यस्व०" इ० तीन मत्र म्हणून कुडाच्या तीन बाजूला आणि 'ओ३म देवसवित' ह्या मत्रानें कुंडाच्या चारी बाजूला जलसिचन करून अग्न्याधान व समिदाधान करावें नंतर आघारादि पूर्वोक्त आहुति द्याव्या पुढे ओंभूर्भुव. स्व· इ० मत्रांनी चार, व्याहृति

---

[१] ओ३म् देवी वाचमजनयन्त०—ऋ०, ८।१०० [ वाणीचें स्तवन ] वाजो नोऽद्य०—य०, १८।३३ [ अन्न हेच धन इ० अन्नस्तुति.]

[२] ओ३म् अन्नपतेऽन्नस्य०—य०, ११।८३

[३] आश्व० १।१७।१.—पार०, २।१।१

[४] चरक०, सू०५।९३

चार, स्विष्टकृत एक अशा आज्याहुति द्याव्या. मग न्हाव्याला उद्देशून एक मंत्र म्हणून दोन मंत्रांनीं मुलाच्या दीर्घायूचा संकल्प करून उष्णोदक आणि लोणी किंवा मलाई मुलाच्या डोक्यास लावावी मग केस एकत्र करून तीन दर्भांनीं उजव्या बाजूचे केस मंत्रे म्हणत दाबावे नंतर वस्तऱ्यास उद्देशून* व अखेर हे मुंडण तुझ्या हिताकरिताच करतों असे मुलास उद्देशून म्हणावें आणि खालील चार मंत्र म्हणून कुशासहित केस कापावे किंवा कातरावे आणि मग खालील मंत्राने न्हाव्यास वस्तरा नीट पाजवून क्षौरकर्म करण्यास सांगावें. क्षौर झाल्यावर कापलेले केस सर्व गोमयाने टिपून घेऊन एका शमी-पत्र घातलेल्या घटात टाकावे तो घट व बाकीचे धान्याचे घट व यथाशक्ति द्यावयाचे तें न्हाव्यास द्यावे न्हावी श्रीमंताचा कुशल पहावा. अखेर नेहमींप्रमाणें वामदेव्यगान आणि आशीर्वाद होऊन सर्वांचा सत्कार करून विधि पुरा करावा.

**कर्णवेध**—अंतर्गळ किंवा अंडवृद्धि होऊं नये म्हणून हा एक पूर्वोपाय करण्यात येतो. संस्कारविधींत दयानंदांनीं नासिकावेध हाही याच संस्कारात गोवला आहे;

---

१ ओ३म् आय मगन्त्सविता०—अ ६।६८।१.

[२] ओ३म् अदितिः श्मश्रु०—अ. ६।६८।२. आश्व०, १।१७।७.
ओ३म् सवित्रा प्रसूता०—पा०, २ २।१।९.

[३] ओ३म् ओषधे०—यु०, ६।१५।४।१

[४] ओ३म् विष्णो०-म० ब्रा०, १।६।४ ओ३म् स्वाधेते०—मं. १।६।६

[५] ओ३म् निवर्त०—य०, ३।३३

ओ३म् शिवोनामासि०—य० ३।६३ या मंत्रात वस्तऱ्याला आदरपूर्वक नमः असें म्हटलें आहे ती वस्तुपूजा नव्हे असें समजावें.

ओ३म् येनावपत्सविता०-अथर्व०, ६।६८. ओ३म् येनधाता०—आश्व०, १।१७।१२. ओ३म् येन भूयश्च० १।१७।१२. ओ३म् येनपूषा० १।६।७ ओ३म् येन भूरिश्चरादिव०—पार०, २।१।१६. ओ३म् त्र्यायुष जमदग्नेः-य०, ३।६२.

ओ३म् यत् क्षुरेण०—अथर्व०, ८।२।१७. शूद्रासमोर वेद म्हणूं नये हें म्हणणें येथे लटके पडतें. किंबहुना प्राचीन काळीं न्हाव्यानाहीं वेदार्थ कळत असावा असें उघड होतें.

[७] शखोपरि च कर्णान्ते०—सुश्रुन०, चि० १९।२१.

पण तो संस्कारचंद्रिकाकारास मान्य नाहीं. तसेंच मुलींचे बुगड्या, बाळ्या, कुड्ड्या वगैरे दागिने घालण्याकरितां कान टोंचतात तेंही त्यास मान्य नाहीं. मुलामुलींच्या कानाच्या पाळया मात्र अलंकार घालण्यासाठीं नव्हेत तर रोगनिवृत्तीकरिता अवश्य टोचाव्या असें ते म्हणतात. ह्या संस्काराचा काळ तिसऱ्या किंवा पाचव्या वर्षी सांगितला आहे[1] प्रथम एका प्रातःकालीं सर्व सामान्य विधि केल्यावर खालील मंत्र म्हणून उजवा,[2] दुसरा मंत्र म्हणून डावा कान चांगल्या अनुभवी वैद्याकडून टोंचवावा व तो बुजू नये म्हणून त्यात सुकलें वगैरे घालावें[3] कान टोंचणें महाराष्ट्रात आर्येतरात बाराव्या दिवशीही करतात. मराठींत 'सोनाराकडून कान टोंचवावा' ही एक म्हणच पडून गेली आहे. कान टोचणे म्हणजे कानउघाडणी होणें, अर्थात् वेळेवर उपदेश होणें असाही अर्थ होतो ह्या सर्व वाक्प्रचारानीं या संस्कारावर निरनिराळा प्रकाश पडतो कान टोंचणें हें हिंदुत्वाचे एक प्रमुख बाह्यलक्षण असावें मुसलमान कान टोंचीत नाहींत त्यास अविंध म्हणतात. ह्या विधीनें जो हिंदु ठरला, त्याचे हिंदूच्या चातुर्वर्ण्याप्रमाणे पुढें व्हावयाच्या संस्कारांबद्दल पुढील प्रकरणात विचार करू.

---

[१] अथकर्णवेधो०—कात्या०, १।२.
[२] ओ३म् भद्रकर्णेभिः०—ऋ०, १।८९.
[३] वक्ष्यन्तीवेदा०—ऋ०, ६।७५.

# प्रकरण चौदावें
# आश्रमसंस्कार

**ब्रह्मचर्यं समाप्य गृही भवेत् गृहीभूत्वा वनी भवेत् वनीभूत्वा प्रव्रजेत् ॥** —शत० का० १४.

**भावार्थ**—ब्रह्मचर्य समाप्त करून गृहस्थ व्हावें. नतर वानप्रस्थ आश्रम स्वीकारून अखेर सन्यास घ्यावा ह्या वरील उक्तीतील पुरुषार्थाचा पाया ब्रह्मचर्याश्रमात आहे उपनयन ह्या सस्काराचे माहात्म्य सर्वात अधिक आहे एकप्रकारें द्विजाचा तो जन्मसस्कारच आहे गर्भादान हा जन्माच्या पूर्वींचा आणि अंत्येष्टि हा मृत्यूच्या नतरचा असे दोन्ही सस्कार सोडले तर पुसवनापासून कर्णवेधापर्यंत असलेले सस्कार विशेषकरून जीवात्म्याच्या शरीररक्षणाकरितां आहेत त्याचप्रमाणें उपनयनापासून सन्यासापर्यंत सारे सस्कार विशेषकरून मानसिक उन्नती करिता आहेत आणि म्हणूनच दयानदांनी ह्या सस्कारात वर्णभेदाप्रमाणे अधिकारभेद मानला आहे दयानदास चातुर्वर्ण्याची विशेष आस्था दिसते खानेसुमारीच्या वेळीं आर्यांनीं आपले कसें वर्णन सागावे असें त्यांस विचारले असता वैदिक आर्य अमुक वर्ण अमुक गोत्र [स्मरत नसेल तर काश्यप किंवा पाराशर] असें सागण्याविषयीं त्यानीं कळविले होतें. चतुर्विध आश्रमांच्या सस्कारांपैकी उननयन हें धर्मराज्यात दाखल होण्याचे महाद्वार आहे. बौद्धाची प्रव्रज्या व उपसपदा, पार्शी लोकांची नवजोत, मुसलमानाची सुता, आणि ख्रिस्ती लोकांचा बाप्तिस्मा, हे सारे असलेच प्रकार होत दयानदानीं सर्व सस्कारांत गर्भादान, उपनयन आणि विवाह ह्या तीन सस्कारास विशेष महत्त्व दिलेलं आहे, तें योग्यच आहे. तरी आता आपण या ब्रह्मचर्यादि आश्रमसस्कारासबंधीं दयानंदाचा काय विधि आहे, तोच यथानुक्रम पाहूं

**उपनयन**—विद्यार्जनाकरिता मुलाचे नाव शाळेंत दाखल करावयाचें त्याच प्रमाणें मुलामुलींस उपनीत करावयाचें असतें त्रैवर्णिक होण्यासाठींच उपनयनसंस्काराची अवश्यकता आहे ज्यास शूद्र किंवा अतिशूद्रच रहावयाचें असेल त्यास उपनयन नको. दयानदांनीं आपल्या सस्कारविधीत केवळ त्रैवर्णिकांस उप-

नयनाचा अधिकार आहे असें दर्शविलें आहे पण स्वामी दर्शनानन्द यांनीं याचा खुलासा असा केला आहे कीं, त्रैवर्णिक म्हणजे केवळ जन्मतःच नव्हे तर जो गुणकर्मानें ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य यांपैकीं कोणत्याही पदाचा अधिकारी असेल, मग तो जन्मतः शूद्रच काय, पण अतिशूद्र कां असेना त्याचें उपनयन करावें आता या त्रैवर्णिकात अधिकारभेदपरत्वे काल आणि विधि यांत भेद करावा की नाहीं याबद्दल विकल्प आहे. तथापि भेद मानण्याकडेच दयानंदाचा कल दिसतो. उदाहरणार्थ, उपनयनाचा काल ठरविताना राम्य बुद्धीच्या ब्राह्मणाला समशीतोष्ण वसतऋतु, सहनशील आणि तेजस्वी क्षत्रियास ग्रीष्म-ऋतु आणि वैश्यास धनधान्यसमृद्धीचा व शीतल चंद्रिकेचा शरदृऋतु उक्त मानला आहे. तसेच उपनयनाचे वयमान ठरवितानाही ब्राह्मणास ( म्हणजे ब्राह्मण पदाधिकारी मुलास ) गर्भापासून किंवा जन्मापासून ५ ते ८ वे वर्ष उक्त काल आणि १६ वर्षानतर पतितकाल. तसेच क्षत्रियास ६ ते ११ वे वर्ष उक्त काल आणि २२ वर्षानतर पतितकाल, वैश्यास ८ ते १२ वे वर्ष उक्तकाल आणि २४ वर्षानतर पतितकाल दयानंदानी मानला आहे. मात्र पतिताच्या मुलास पुन्हा पूर्ववत् उपनयनाचा अधिकार मिळतो उत्तरायणकालांत मानसिक बलाची अधिक वृद्धि होते म्हणून तें उक्त धरले आहे. उपनयनाचे वेळीं यज्ञोपवीत धारण करावयाचे ते कापूस, रुई, गाईच्या शेपटीचे केस, ताग, लोंकर किंवा दर्भ इत्यादींपैकीं कशाचेही करावे असे शास्त्र आहे पण त्यातले त्यात ब्राह्मणाने कापूस, क्षत्रियाने ताग आणि वैश्यानें लोकर याचे यज्ञोपवीत घालावे. यज्ञोपवीत हे विद्या व वर्ण याचे चिन्ह आहे. यासाठी तें पारशी लोकाप्रमाणें कपड्यावरून घालावे. संस्कारचंद्रिकाकार म्हणतात कीं, ते मुलींनीही घालावें. बाणभट्टाने महाश्वेतेचें वर्णन करताना "ब्रह्मसूत्रेण पवित्रीकृतकायाम्" असें म्हटले आहे. परंतु कन्येचा उपनयन संस्कार करावा, आणि तिनेही यज्ञोपवीत घालावें असें दयानंदांनी कोठेही स्पष्ट म्हटलेलें आढळत नाहीं.

यज्ञोपवीतास ब्रह्मसूत्र म्हणतात येथें ब्रह्म याचा अर्थ वेद जाणावा यज्ञोपवीताचे तीन धागे म्हणजे वेदोक्त कर्म, उपासना आणि ज्ञान यांचें जेथें एकीकरण होतें तीच या ब्रह्मसूत्राची ब्रह्मग्रंथि होय ब्रह्मचाऱ्याने एकच यज्ञोपवीत घालावें, गृहस्थानें दोन घालावीं, उपवस्त्राच्या अभावीं आणखीही एक घालावे. आयुष्य-वर्धनाकरितां जास्तही घालतात. यज्ञोपवीत हें विद्याचिन्ह आहे म्हणून वर

सांगितलेंच. अर्थात् नानाप्रकारच्या विद्या, कला आणि भौतिकशास्त्र यांचें ज्ञान संपादन करून धन संपादन करावें आणि ब्रह्मचर्यादि व्रतपालनानें स्वावलंबन आणि आयुरारोग्य वाढवावें हीच महत्त्वाकांक्षा या संस्काराच्या बुडाशीं आहे. त्याचप्रमाणे गुरुशिष्यांचा पवित्र संबंध जोडणारा हा संस्कार आहे

ज्या दिवशीं संस्कार करणें असेल त्याच्या तीन दिवस किंवा एक दिवस पूर्वी संस्कार करावयाच्या मुलां(मुलीं)नीं व्रत करावे, ब्राह्मणाने केवळ दुधावर, क्षत्रियाने केवळ यवागू घेऊन आणि वैश्याने श्रीखंड खाऊन राहावें. नंतर संस्काराच्या दिवशी सकाळीं क्षौर करून स्नानानंतर मिष्टान्न खाऊन वेदीच्या पश्चिमेस येऊन बसावें मुलाने ब्रह्मचर्यमागाम्, ब्रह्मचार्यसानि ॥ [पा० का०, २।२] असें म्हणावें नंतर मुलास उत्तम पोषाख उपवस्त्रासह घालून त्यास आचार्यासमोर बसवावें. त्याने हातात यज्ञोपवीत घेऊन "ओ३म् यज्ञोपवीत० यज्ञोपवीतमासि० ॥ [पा० का०, २] याप्रमाणे मंत्र म्हणून यज्ञोपवीत घालावें. मग ईशस्तुतीपासून अष्ट आज्याहुतीपर्यंत सामान्य विधि करावा व्रतासंबंधीं प्रतिज्ञाबोधक पांच मंत्र म्हणून पांच आज्याहुति द्याव्या शिवाय पूर्वोक्त व्याहृति, स्विष्टकृत, प्राजापत्याहुति, मिळून १५ आहुति मुलाच्या हातून देववाव्या. पित्यानें बटूच्या कल्याणाकरता अग्नीची प्रार्थना करावी मग मुलानें "ओ३म् ब्रह्मचर्यमागामुपमानयस्व" [मं० ब्रा०, १।६।१६] अशी आचार्यास प्रार्थना केल्यावर त्यांनीं त्याचें नांव विचारावें व यानें सांगावें, मग ओ३म् आपोहिष्ठा० [ऋ० म०, १०।९] या मंत्राने मुलाने उजव्या हाताच्या ओंजळीत पाणी घ्यावें. आचार्यांनीही आपल्या हातांत पाणी घेऊन ओ३म् तत्सवितुर्वृणीमहे० [ऋ०, ५।८२] ह्या मंत्रानें तें पाणी मुलाच्या ओंजळींत सोडून मग त्याचा हात आचार्यांनीं आपल्या हातात धरून ओ३म् देवस्यत्वा० [य०, ५।२६] या मंत्रानें पाणी खालीं भांड्यांत सोडावें. याप्रमाणें तीन वेळा अवक्षारण करावें मग मुलास सूर्यदर्शन करवावें. तें झाल्यावर मुलानें आचार्यास प्रदक्षिणा घालून त्याच्या सन्मुख बसावें. आचार्यानें मुलाचे

---

[१] यज्ञोपवीत अभिमंत्रण प्रयोग नाहीं.

[२] ओ३म् सविता०, ओ३म् अग्निराचार्यस्तव—मं० ब्रा०, १।६।१५.

[३] ओ३म् देव सवितरेष०.

[४] ओ३म् युवा सुवासाः—ऋ०, ३।८.

उजवे खांद्यास, पोटास, छातीस, डावे खांद्यास स्पर्श करावा मुलाच्या काळजावर हात ठेवून आचार्यानें प्रतिज्ञा करावी. नंतर पुन्हा तुझें नांव काय? [ ब्रह्मचारी कोणाचा असे आचार्यांचे प्रश्न झाल्यावर आचार्योनीं त्यास उपदेश करावा मग त्याच दिवशीं किंवा दुसऱ्या दिवशीं वेदारभ करावा

**वेदारंभ**—सामान्य प्रकारोक्त विधि झाल्यावर व्याहृति, स्विष्टकृत, आणि प्राजापत्य अशा सहा आहुति मुलानें दिल्यावर वेदारभाची पहिली सूचक गोष्ट म्हणजे मनाची एकाग्रता, तद्दर्शक मुलानें कुडातील अग्नि प्रथम एकत्र करावा नंतर गुणस्वीकृतिदर्शक यज्ञकुडास प्रदक्षणा करून कुडाचे चारी बाजूस जलसिचन करावें मग तुपात भिजविलेल्या तीन समिधा अग्नीत टाकाव्या पुन्हा अग्नि एकत्र करून आणि जलसिचन करून आपले हाताचे तळवे अग्नीवर थोडे तापवून त्यास पाणी लावून मुखस्पर्श करावा समशीतोष्ण सहन करण्याची ही उपलक्षणात्मक क्रिया सात वेळा करावी ही करताना आपली तनु, आयु, कान्ति, शारीरिक अव्यगता, मेधा, वाणी, विद्वानाबद्दल आदरभाव ही वाढावी म्हणून प्रार्थना करावी

नतर सर्व इद्रियशक्ति चागल्या वाढाव्या म्हणून मुख, नासिका, नेत्र, कान, व बाहु यास स्पर्श करावा अर्थात् हा स्पर्श करताना इद्रियशक्ति वाढविण्यास कोणत्या साधनाचे अवलंबन करावे ते मनांत आणावयाचें आहे जसें सत्य व मधुर बोलण्याने वाणीचे तेज चढते, प्राणायामानें किंवा व्यायामाने श्वासोच्छ्वास-क्रिया बलदायी होते, शुभदर्शनानें नेत्राची सार्थकता होते वगैरे. नतर शारीरिक, आत्मिक, आणि सामाजिक उन्नतीचें साधन मला प्राप्त होवो, अशा भावनेनें

[१] ओ३म् प्राणाना० इ०—म० ब्रा०, १।६।२०—२४

[२] ओ३म् त धीरासः—ऋ०, ३।८

[३] ओ३म् मम व्रते०—पार०, २।२ कोनामासि, कस्य ब्रह्मचार्यसि, इद्रस्यब्रह्मचर्य, ओ३म् कस्य ब्रह्मचार्यसि,—पा०, २।२.

[४] ओ३म् अग्नेसुश्रवः०—पार०, २।४।२.

[५] अदितेनुमन्यस्व०

(६) ओ३म् अग्नये समिधमाहार्षं०—पा०, २।४।३.

(७) ओ३म् आर्युदा० इत्यादि य० ३।१७, ओ३म् मेधा मे० पा०, २।४।८.

[८] ओ३म् वाङ्मय आप्यायताम्—इ०—पा०, २।४.

परमेश्वराचें खालील मंत्रानें उपस्थान करून आचार्यांच्या सन्मुख कुंडाच्या उत्तर बाजूला गुडघे टेंकून पूर्वेकडे तोंड करून बसावे आणि आचार्यास गायत्रिमंत्र शिकविण्याविषयीं प्रार्थना करावी आचार्यांनीं एक वस्त्र उभयतांच्या खांद्या वर टाकून ह्या वस्त्राच्या आत मुलाच्या दोन्ही हातांचीं बोटे आपल्या हातीं धरून त्यास तीन तुकड्यांनी गायत्रिमंत्र म्हणण्यास शिकवावे विद्यार्थ्याला त्याचा अर्थही सांगावा विद्यार्थ्याचे हात आपल्या हातीं धरण्यांत एक प्रकारची बौद्धिक सत्ता प्रस्थापित होते वस्त्राचे आच्छादनानें गायत्रिमंत्राचें गूढत्व व पावित्र्य दर्शविलें जातें मेस्मेरिझमसारखाच पण फार गंभीर असा हा संस्कार आहे यात आचार्यानें आपलें सारे शील आणि अंतःकरणाचें पावित्र्य बटूच्या अंतःकरणात जणू कांहीं ओतावयाचें असतें अशीच आचार्यांची प्रतिज्ञा असते मग आचार्यांनीं बटूस वर्णबोधक अशी अनुक्रमें कुश, सण, किंवा लोकर याची मेखला बांधावी. व्यर्थ काम-चेष्टाचा संयम करून कमरेस जोर देणारी अशी तिला मानली आहे नंतर आचार्यांनीं बटूस गेरू किंवा मंजिष्ठाच्या रंगाचे दोन कौपीन, दोन पंचे, व उपरणें किंवा कपडे द्यावे तसेच वर्णभेदाप्रमाणे पळस, किंवा बेल, वड किंवा खैर आणि पीलू किंवा गुलर झाडाचे सरळ दंड,[स्वाभाविक मेलेल्या मृगाचे] मृगासन किंवा कुशासन, गडवाभांडे, ताम्हणपळी वगैरे वस्तु द्याव्या नंतर पित्यानें अगर मुंज करणाऱ्या पालकांनें बटूस ब्रह्मचर्याश्रमाचा साधारण उपदेश करावा तो असाः—तू ब्रह्मचारी हो दुष्ट कर्मे सोड व चांगली क्रिया कर, दिवसा निजूं नकोस; आचार्यांचे आधीन राहून सांगोपांग वेदाध्ययन कर, एकेक वेदाच्या अध्ययनासाठीं बारा बारा वर्षे ब्रह्मचर्य कर, आचार्य अधर्म करतील तर तू तसे करूं नकोस, क्रोध आणि मिथ्या भाषण सोडून दे, अष्ट प्रकारचें मैथुन वर्ज कर, भूमीवर निजत जा, गाणेबजावणे वगैरे

---

[१] ओ३म् मयिमेधां०–आश्वा०, २१।२१।४ यानंतर विभूति ग्रहण नाहीं
[२] अधीहि०–आश्वा०, ३।२१।४
[३] ओ३म् भूर्भुवः स्वः–य०, ३६।३.
[४] ओ३म् ममव्रते०–पा०, २।२
[५] ओ३म् इयं दुरुक्तं०–२।२।८ मं० ब्रा०, ६।१७
[६] ओ३म् युवासुवासा०–पा०, २।२।९,
[७] ओ३म् यामे दंडः पा०, २।२।१२.

विलासी कर्मे सोड; अतिस्नान, अतिभोजन, अधिक निद्रा, अधिक जागरण, निंदा, लोभ, भय, शोक कधीं करू नकोस, रात्रीच्या चवथ्या प्रहरीं उठून शौच-मुखमार्जन, स्नानसंध्या, ईश्वरोपासना आणि योगाभ्यास रोज कर, क्षौर करू नकोस, मद्यमांस किंवा शुष्क अन्न खाऊ नकोस, घोडा, हत्ती, उंट वगैरे वाहनांवर बसू नकोस, गावांत राहाणें किंवा जोडे अगर छत्री घेऊन हिंडणें सोड, लघुशंकेशिवाय इंद्रियस्पर्श करूं नको वीर्यस्खलन करू नकोस ऊर्ध्वरेता हो, अभ्यंगस्नान करू नको. अति तिखट, आंबट, तुरट, खारट किंवा सारक पदार्थ वर्ज्य कर, नित्य युक्त आहारविहार करून विद्योपार्जनाचा सतत यत्न कर, सुशील, मितभाषणी, आणि सभ्य हो. मेखला, दंडधारण, भिक्षाचरण, अग्निहोत्र, आचार्यांस प्रिय असें आचरण, प्रातःसकाळ त्यांचें वंदन, विद्यासंचय, इंद्रियनिग्रह इत्यादि विहित नित्यकर्मे व ज्यांचा निषेध केला ती निषिद्ध कर्मे समज असा सदुपदेश ऐकल्यावर बटूनें हात जोडून मी आपल्या उपदेशाप्रमाणें वागेन अशी प्रतिज्ञा करावी नंतर यज्ञकुंडाला प्रदक्षणा करून कुंडाचे पश्चिमेकडे उभें रहावें तेथें आईबाप भाऊ, बहीण, मामा मामी, आत्या, मावशी वगैरे ज्या भिक्षा घालण्यास नाकारणार नाहींत, अशांजवळ "भवती भिक्षांददातु" वगैरे वर्णभेदाप्रमाणें पाठभेदानें भिक्षा मागावी ती भिक्षा आचार्यांपुढें करून त्यांनीं त्यांतील अल्पांश घेऊन बाकीची बटूस द्यावी बटूनें मग आसनावर बसून वामदेव्यगान करावें नंतर भिक्षान्नाचें भोजन करावें तदनंतर सायंकाळपर्यंत आचार्यांनीं मुलास संध्योपासन शिकवावें मग पुन्हा तयार असलेल्या स्थालीपाकांत तूप घालून समिदाधान करावें नंतर आघारावाज्य भागाहुति चार आणि व्याहृति चार याप्रमाणें आज्याहुति द्याव्या मग "ओ३म् अग्ने सुश्रव" या मंत्रानें तीन समिधा द्याव्या. नंतरही पुन्हा कांहीं आहुति दिल्यावर बटूनें आपल्या गोत्राचा उच्चार करून गुरूचें अभिवादन करावें आणि आचार्यांनीं त्यास आशीर्वाद द्यावा नंतर हुतशेष हविष्यान्नासह इतर मिष्टान्नाचें सर्वांनीं भोजन केल्यावर मुलाला आशीर्वाद देऊन आपआपल्या घरीं जावें मुलानें त्यानंतर तीन दिवस व्रतस्थ राहावें भूमिशयन, प्रातःसायं समिधादान, अङ्गस्पर्श, स्थालीपात्रादि आहुति, व आळणी भोजन करावें, मग पाठशाळेंत जाऊन विद्याभ्यासासंबधी ब्रह्म-

---

[१] ओ३म् सदसस्पति०—य०, ३२।१३ तत्सवितुर्वरेण्य०—य०, २२।९. ओ३म् ऋषिभ्यः स्वाहाः—आश्वा०, १।२१।११।१२।१४येथें मेधाजनन प्रयोग नाहीं

चाऱ्यानें व आचार्यानें प्रतिज्ञा करावी ज्या वेळी मुलींचें उपनयन असेल त्या वेळीं आचार्यांचें वरील सर्व कर्म आचार्याणी हिनें करावें. असें संस्कारचंद्रिकाकार म्हणतात.

बालकानें पाच वर्षेपर्यंत आईच्या पुढे आठ वर्षेपर्यंत बापाच्या शिक्षेत असावें त्यानंतर अठ्ठेचाळीसाव्या वर्षापर्यंत किमानपक्ष पचवीसाव्या वर्षापर्यंत द्विजानें आचार्यांच्या शिक्षेत असावे मुलीनें आठवे वर्षापासून पुढें १६ ते २४ वे वर्षापर्यंत विद्यार्जन करावे. तोंपर्यंत मुलामुलींनी व तरुण तरुणींनी यमनियमादि पाळून ब्रह्मचर्य कसें आचरावे याबद्दल दयानंदांनी मन्वादिप्रमाणें दिली आहेत. विस्तारभयास्तव त्याचें वर्णन येथें करता येत नाही, दयानंदांनी आपल्या मताप्रमाणे ब्रह्मचर्याश्रमांतील अभ्यासक्रमही दिला आहे. त्याप्रमाणे वेदविद्यादि १४ विद्या व भौतिकविज्ञान एकतीस वर्षांच्या अध्ययनात पुरे केले आहे. स्त्रीशूद्रांचे उपनयन न झाले तरी त्यांनी काही वेदाध्ययन करावे असेंच दयानंदाचें म्हणणे आहे

मनुष्याची योग्यता जन्मावरून ठरत नसून गुणकर्मस्वभावावरूनच ठरते हा ज्यांचा मुख्य सिद्धान्त त्या दयानंदांनी प्रत्येकाच्या गुणकर्मस्वभावाच्या जोपासनेकडे विशेष बारकाईनें लक्ष देणे जरूर आणि स्वाभाविक होतें दयानंदांनी आपल्या सत्यार्थप्रकाशाचा आरंभच ह्या विषयाने केला आहे ब्राह्मणोऽस्य मुखमासीद् या ऋचेंतील ब्राह्मणाचे श्रेष्ठत्व दयानंदास मान्य आहे त्याचें म्हणणें इतकेंच की, जन्मगुणाने ब्राह्मणशरीर होत नाही तर ते गुणकर्मस्वभावानें अपूर्व बनतें ते तसें बनविणे हेच प्रत्येक मनुष्यमात्राचे ध्येय असून तें पुरुषप्रयत्नाधीन आहे, असे ते मानतात आणि त्यासाठीं त्यांनी सत्यार्थप्रकाशाच्या प्रथम समुल्लासात बालसंगोपन व शिक्षण या विषयांचें विवेचन केलें आहे.

विद्येचे संस्कार देताना, भूत, प्रेत पिशाच, ग्रह, दानें, मंत्र, तंत्र, शीतलादि देवता इत्यादि सारी खुळें पैसे उपटण्यासाठी ढोंगी लोकानीं काढलेलीं आहेत, अशा प्रकारचा उपदेश लहानपणीच मुलांना करावा म्हणजे पुढे तीं असल्या भ्रमजालांत फसून दुःख भोगणार नाहीत असे सत्यार्थांत सांगितले आहे फलज्योतिष, मृतात्मे, आणि तोडगे इत्यादि प्रकारांस सरसहा झूट ठरविण्यांत

[१] आचार्य उपनयमानो० इ० —अथर्व०, ११।३।५, मं० ३।४।६।१७।१०।०

[२] छांदोग्य० —मपा०, ३, खं० १६.

[३] तैत्तिरीयारण्यक—प्रपा०, ७।११ प्रपा०, १०।८, प्रपा०, ७।९

दयानंदांनीं महाराष्ट्रीय चिपळूणकर आणि आगरकर यांसही मार्गे टाकलेलें दिसतें. हें मागील प्रकरणांवरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल

पूर्ववयांत वीर्यरक्षणाकडे स्वामींचा विशेष कटाक्ष आहे त्यासाठीं स्त्रियांच्यागोष्टी, विषयी लोकांची संगति, विषयाचें ध्यान, स्त्रियांकडे कामुकतेनें पाहणें, एकान्तात राहणें, स्त्रियांशीं वारवार भाषण करणे व स्पर्शादि व्यवहार करणें इत्यादि कृत्यें सोडलीं पाहिजेत असे त्यांचें सांगणें आहे पाच वर्षांपर्यंत आईनें व आठ वर्षांपर्यंत बापाने मुलांना शिकवावें व पुढें विद्वानांच्या आचार्यकुलांत मुलांना व विदुषींच्या शिक्षणसंस्थेत मुलींना विद्याभ्यासासाठी पाठवावे विद्यार्थ्यांना योग्य प्रसंगी ताडणही केले पाहिजे शिष्यानीही ताडनाने प्रसन्न व लालनानें अप्रसन्न व्हावें, असें दयानंद सांगतात त्यांनीं स्वतः चाळिशीच्या घरात गेल्यावरही विद्यार्जनासाठीं गुरुजींच्या हातचें यथेच्छ ताडन सहन केले होते, हे वाचकांस आठवत असेलच.

तृतीय समुल्लासांत स्वामी म्हणतात की—"आठ वर्षांनतर मुलाना किंवा मुलींना शिक्षणासाठीं पाठशाळेंत अवश्य पाठवून द्यावें त्या पाठशाळा शहरापासून चार कोस दूर एकान्त जागीं असाव्या मुलामुलींच्या शाळात निदान दोन कोसाचे अंतर असावें स्त्रियांच्या पाठशाळेंत पाच वर्षांचेही मुलानें व मुलांच्या पाठशाळेंत पाच वर्षांच्याही मुलीनें जाऊ नये पाठशाळेंत चैन सोडून तपस्व्यांप्रमाणें राहून ब्रह्मचर्यपालन केले पाहिजे विद्यार्थिदशेत ब्रह्मचर्य संपेपर्यंत आईबाप व मुले यांची परस्पर भेट व पत्रव्यवहार होण्यासही मनाई असावी मुलाचा यज्ञोपवीतसंस्कार घरीं होऊन दुसरा पाठशाळेंत व्हावा. अर्थासह गायत्रीमंत्राचा उपदेश करावा स्नान, आचमन, प्राणायाम, मार्जनादि क्रियारूप संध्योपासनही शिकवावें तें एकांतस्थलीं एकाग्रचित्ताने दररोज करावें त्यासच ब्रह्मयज्ञ म्हणतात. ब्रह्मयज्ञात अध्ययन, अध्यापन, यांचाही अंतर्भाव होतो. देवयज्ञ म्हणजे सूर्योदयानंतर सकाळीं व सूर्यास्तापूर्वी सायंकाळीं अग्निकुंडात समिधा व तुपाची आहुति द्यावी. प्रत्येक मनुष्यानें एक वेळ निदान सोळा तरी आहुति दिल्या पाहिजेत प्रत्येक आहुति निदान सहा मासे तुपाची पाहिजे अधिकस्याधिकम् फलम् देवयज्ञांत अग्निहोत्रापासून अश्वमेधापर्यंत सर्व यज्ञ आणि विद्वानांची सेवा, संगति व परोपकार यांचा अंतर्भाव होतो.

ब्राह्मणानें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांचें, क्षत्रियानें क्षत्रिय व वैश्य

यांचें व वैश्यानें फक्त वैश्यांचें उपनयन करावें व त्यांना अध्ययन शिकवावें. तसेंच जो कुलगुणसंपन्न शूद्र असेल त्याचें उपनयन न करतां, त्याला वेदमंत्राशिवाय इतर शास्त्रें शिकवावी. [ या बाबतींत पाठभेद आणि मत आहेत ]

उत्तम ब्रह्मचर्य अठ्ठेचाळीस वर्षांचे आहे तें पालन केल्याने मनुष्य चारशें वर्षांचें पूर्णायुष्य व निरोगी स्थिति भोगून धर्म, अर्थ, काम व मोक्ष याना प्राप्त करून घेतात ज्या स्त्रीपुरुषाना विवाह करावयाचा असेल त्यापैकी स्त्रीनें चोविसाव्या वर्षी व पुरुषानें अठ्ठेचाळीसाव्या वर्षी विवाह करणे हे सर्वोत्तम होय. आणि स्त्रीनें १६ व पुरुषानें २५ वर्षेपर्यंत ब्रह्मचर्य पाळणे हा सर्वांत कनिष्ठ प्रकार होय

यमानियमाचें मारख्या प्रमाणानें सेवन करावें जो यम सोडून नियमाचें पालन करतो त्याची ससारात अधोगति होते सकल वेदाचें अध्ययन व अध्यापन, ब्रह्मचर्य, सत्यभाषणादि नियम, अग्निहोत्र, सत्याचे ग्रहण व असत्याचा त्याग, सत्यविद्याचें दान, वेदातील ज्ञान, कर्म व उपासना, पक्षातील इष्टी, सुसतानोत्पत्ति, ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ व नृयज्ञ हे पंचमहायज्ञ, अग्निष्टोम व शिल्पविद्या विज्ञानादि यज्ञ या सर्व साधनाच्या योगानें ब्रह्मप्राप्तीला सानुकूल असे मनुष्यशरीर तयार केलें जाते —मनु०, २।२८

जो विषाप्रमाणें प्रतिष्ठेला भितो व अपमानाला अमृताप्रमाणे मानतो तोच ब्राह्मण वेद व परमेश्वर याना जाणूं शकतो —मनु०, अ० २।१६२.

याप्रमाणें उपनयनादि करून द्विज ब्रह्मचारी कुमार व कुमारिका यानी हलके हलके वेदाच्या अर्थज्ञानरूपी तपाला वाढवावे. जो वेद न शिकता अन्यत्र श्रम करतो तो आपल्या पुत्रपौत्रासह शूद्रत्वाला प्राप्त होतो —मनु०, अ० २।१६८

ज्या वेळी कर्म, शील, उपासना व ज्ञान इत्यादिकांविषयी सशय उत्पन्न होईल, त्या वेळा जे योगी, आर्द्रचित्त धर्मात्मे पक्षपातरहित, विचारशील लोक असतील व ते जसे वागत असतील व सागत असतील त्याप्रमाणे वागावे —तैत्तिरीय०, प्रपा ७ अनु ११ क ४

वेद, वेदानुकूल आप्तपुरुषप्रणीत मनुस्मृत्यादिक शास्त्रें, सदाचार, (सत्पुरुषांचा आचार, जो सनातन वेदद्वारा परमेश्वरप्रणीत कर्माचरणरूप आचार तो—सदाचार) आपल्या आत्म्याला जें प्रिय अर्थात् सत्यभाषणादिक, हीं चार धर्माचीं लक्षणें आहेत —मनु०, अ० २।१२

क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना उपदेश करून सुनियमांनीं चालावयास लावणारे सन्यासी व ब्राह्मण होत व तसेंच ब्राह्मण, संन्यासी वगैरेंना सुनियमाप्रमाणें वर्तन ठेवण्यास लावणारे क्षत्रियादिक होत म्हणून सर्व वर्णांच्या स्त्रीपुरुषांनीं अवश्य विद्या शिकून धर्माचा प्रसार केलाच पाहिजे जे शिकावयाचें ते नीट परीक्षा करून शिकावें.

**पंचविध परीक्षा**—[१] वेद व ईश्वराचे गुण कर्म स्वभाव याना जें अनुकूल असेल ते सत्य व त्याच्या विरुद्ध जे असेल तें असत्य समजावें [२] सृष्टिक्रमाच्या अनुकूल जे असेल ते सत्य व त्याच्या विरुद्ध सर्व असत्य जसे "आई बापाशिवाय मुलगा झाला" हें असत्य [३] धार्मिक, विद्वान्, सत्यवादी व निष्कपटी अशा आप्त पुरुषाच्या उपदेशाला अनुकूल ते सत्य. [४] दुसऱ्याने आपणाशीं जसें वागावे असें वाटत असेल तसे आपण दुसऱ्याशीं वागावे [५] प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, ऐतिह्य, अर्थापत्ति, सभव व अभाव या आठ प्रमाणानीं जे ठरेल ते सत्य व इतर असत्य आहे असे समजावें.

**अध्ययन-अध्यापन**—प्रथम पाणिनीय शिक्षा, नतर अष्टाध्यायी (व्याकरण), नंतर महाभाष्य याप्रमाणें तीन वर्षांत उत्तम वैय्याकरणी होता येतें व्याकरण जसें आर्ष पद्धतीनें लवकर समजते तसें तें सारस्वत, चद्रिका, कौमुदी, मनोरमा इत्यादि कुग्रथ पन्नास वर्षे शिकल्यानेही समजणार नाहीं. व्याकरणानतर यास्काचार्यकृत निघण्टु व निरुक्त हे दोन्ही ग्रथ सहा आठ महिन्यात अर्थासह शिकावे. अमरकोशादि ग्रथामध्यें कालक्षेप करू नये नतर पिंगलाचार्यकृत छन्दग्रथ सार्थ चार महिन्यात शिकावा वृत्त-रत्नाकरासारखे ग्रथ वाचू नयेत मनुस्मृति, वाल्मीकि रामायण, महाभारत किंवा विदुरनीति असे ग्रथ शिकवावे मग पूर्व-मीमासा, न्याय, योग, साख्य व वेदान्त दर्शने हीं शिकवावीं वेदान्तपढण्यापूर्वी ईश, केन, कठ, प्रश्न, मुण्डक, माडूक्य, ऐतरेय, तैत्तिरीय, छान्दोग्य व बृहदारण्यक हीं दहा उपनिषदे शिकवावीं. हीं दर्शने व उपनिषदें शिकण्यास दोन वर्षे पुरीं आहेत नतर सहा वर्षांत ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद व त्याचीं ऐतरेय, शतपथ, साम, व गोपथ हीं ब्राह्मणे, स्वर, शब्द, अर्थ, सबध व क्रिया यासह शिकवावीं. अशा रीतीनें शिकून जो तयार होईल तो खरा दशग्रथी होईल ह्याप्रमाणें वेदाचें अध्ययन झाल्यावर चार वर्षांत आयुर्वेद शिकवावा. नतर धनुर्वेदाचें साग्र अध्ययन करावें. तसेंच प्रजापालन, न्याय, प्रजावृद्धि वगैरे प्रजेच्या हिताचे सर्व व्यवहार शिकवावे.

त्याचें अध्ययन करण्यास दोन वर्षें पुरीं आहेत नंतर गांधर्व वेदाला आरंभ करावा. नारदसंहितेचें अध्यापन करून सामवेद गातां येतील इतकी तयारी करावी. अथर्ववेदाच्या अध्ययनांत शिल्पविद्या, पदार्थगुणविज्ञान, इत्यादि शिकवावें. यापुढें दोन वर्षांत सूर्यसिद्धान्तादिक ज्योतिष ग्रंथ, बीजगणित, अंकगणित, भूगोल खगोल विद्या, भूगर्भविद्या योग्य रीतीनें शिकवाव्या नंतर हस्तक्रिया, व यंत्र-रचना याविषयीं शक्य तेवढें ज्ञान द्यावें पण फलज्योतिष मिथ्या असल्यामुळें ते ग्रंथ शिकवू नयेत. अशा रीतीने जितकी विद्या वीस-एकवीस वर्षांत येऊं शकते तेवढी अन्य पद्धतीनें शंभर वर्षांतही येणार नाहीं

**ग्रंथप्रामाण्य**—ऋषि लोक महान् विद्वान्, शास्त्रज्ञ व धर्मात्मे असल्यामुळें त्यांच्याच ग्रंथाचे अध्यापन करावे अनार्य असल्यामुळे अल्पलाभ देणारे परित्यागार्ह कोणते ग्रंथ आहेत त्यांचा संक्षेपाने निर्देश करतातः [१] व्याकरण, कातंत्र, सारस्वत, चंद्रिका, मुग्धबोध, कौमुदी, शेखर, मनोरमा, इ०, [२] अमरकोश वगैरे, [३] वृत्तरत्नाकरादि छन्दोग्रंथ, [४] अपाणिनीय शिक्षाग्रंथ, [५] ज्योतिषात शीघ्रबोध, मुहूर्तचिंतामणि इ०, [६] काव्यनायका भेद, कुवलयानंद, रघुवंश, माघ किरातार्जुनीयादिक, [७] मीमांसा धर्मसिंधु, व्रतार्क इ०, [८] वैशेषिकात तर्कसंग्रह वगैरे, [९] न्याय जगदीशी वगैरे, [१०] योग, हठयोग प्रदीपिकादिक [११] सांख्य सांख्यतत्त्व कौमुदी वगैरे, [१२] वेदान्त योगवाशिष्ठ, पंचदशी इ० [१३] वैद्यक शार्ङ्गधरादिक, [१४] स्मृतिग्रंथांपैकी मनुस्मृतींतील प्रक्षिप्त श्लोक व अन्यस्मृतिग्रंथ, [१५] सर्व तंत्रग्रंथ, [१६] सर्व पुराणे, [१७] सर्व उपपुराणे, [१८] तुलसीरामायण, रुक्मिणीमंगलादि भाषाग्रंथ, विषयुक्त अन्नाप्रमाणे त्याज्य आहेत जर कोणी हे असत्य ग्रंथ शोधू लागेल तर त्याच्या मनावर त्यांतील असत्याचा डाग लागल्याशिवाय राहणार नाहीं "असत्यमिश्रं सत्यं दूरतस्त्याज्यं।"

षड्दर्शनात विरोध नाहीं त्यांत सृष्टि ह्या एकाच विषयाचें प्रतिपादन आहे घट बनवावयाचा तर त्याला [१] कर्म, [२] समय, [३] माती, [४] पुरुषार्थ, [५] प्रकृतीचे गुण व [६] कुंभार अशीं सहा कारणे लागतात त्याचप्रमाणें सृष्टीच्या कर्म या कारणाविषयी मीमांसा, कालाविषयी वैशेषिक, उपादान परमाणूंविषयीं न्याय, पुरुषार्थाविषयीं योग, तत्त्वांचे परिगणनासाठीं सांख्य, व निमित्तकारण परमेश्वराविषयीं वेदान्त ह्याप्रमाणें षड्दर्शनांत एक सृष्टिकथनच सांगितलें आहे

**अध्ययनांत विघ्नें**—[१] विषयी-संगत, [२] व्यसनें, [३] अप्रौढ-विवाह,

[४] ब्रह्मचर्यापालन, [५] राजा, माता-पिता, विद्वान् यांचें वेदशास्त्रांत अप्रेम, [६] आचारात अतिरेक, [७] आळस, कपट, [८] विद्येवर अश्रद्धा, [९] ब्रह्मचर्यावर अश्रद्धा, [१०] प्रतिमापूजा [११] मातापिता, अतिथि, आचार्य व विद्वान् याची सेवा व सग न करणे, [१२] वर्णाश्रमधर्म सोडून व्रताचरण, [१३] तीर्थ व नामस्मरणनिष्ठा, [१४] पाखंड, [१५] भागवतादि ग्रंथविश्वास, [१६] धनलोभ, विद्येवर अप्रीति व [१७] व्यर्थ कालहरण अशी ही विघ्ने आहेत.

**वेदाध्ययनाचा अधिकार**—सर्व स्त्रीपुरुषाना ( मनुष्यमात्राला ) वेदाध्ययनाचा अधिकार आहे [ यथेमा वाचं कल्याणी मावदानिजनेभ्यः । ब्रह्मराजन्याभ्या ँ शूद्राय चार्यायच स्वाय चारणाय ॥–यजु०, २६।२ ] परमेश्वराचा अभिप्राय शूद्रानी शिकू नये असा जर असता तर शूद्रांना त्यानें वागिन्द्रियें, कान वगैरे अवयव कशाला दिले असते ? ज्या कोणत्या ग्रथात शूद्रानी वेद म्हणू नये असा निषेध केला असेल तेथे त्याचा असा अभिप्राय समजावयाचा कीं, शिकले व शिकवले असता ज्याला काहींच ज्ञान होत नाही, अशा निर्बुद्ध शूद्राला शिकविणे व्यर्थ आहे, इतकाच समजावा, पण ज्यास ग्रहणशक्ति आहे अशा स्त्रीशूद्राना न शिकवणे ही मूर्खता आहे [ ब्रह्मचर्येण कन्या ' युवान विन्दते पतिम् ॥–अथर्व०, ११।२४।३।१८ इम मन्त्र पत्नी पठेत् श्रौतसूत्रम् ]

ब्राह्मणाच्या व क्षत्रियाच्या स्त्रियाना सर्व विद्या आल्या पाहिजेत वैश्याच्या स्त्रियाना सर्व व्यवहारविद्या, व शूद्र स्त्रियाना पाकादिक सेवाविद्या अवश्य आल्या पाहिजेत तसेच स्त्रियाना व्याकरण, धर्म, वैद्यक, गणित, शिल्पविद्या, पाकविद्या इत्यादि अवश्य आल्याच पाहिजेत

आठ वर्षांनतर, मुलगा किवा मुलगी याना घरीं ठेवूं नये त्याना आचार्यकुलामध्ये पाठवून द्यावे तेथेच त्याचा समावर्तनसस्काराचा समय होईपर्यंत ठेवावे तोपर्यंत कोणाचा विवाहही करू नये ह्याप्रमाणे स्थूलमानाने दयानदाचे शिक्षणविषयक विचार होते व त्यास अनुसरून ठिकठिकाणीं पाठशाळा काढण्याचा त्यांनीं आपल्या हयातींत पुष्कळ प्रयत्न केला. पण त्या सर्व संस्था अल्पायुषी होऊन आणि त्यातही मतभेद उत्पन्न होऊन स्वामींस मुळींच यश लाभलें नाहीं. परतु दयानदांच्या पश्चात् त्यांच्या अनुयायांनीं जी शिक्षणविषयक चळवळ केली, त्याला जें यश आलें तितकें यश उत्तरभारतात किंबहुना सर्व भरतखंडांत

दुसऱ्या कोणत्याही समाजाला मिळालें नाहीं. आर्यांच्या या प्रचंड चळवळीचें गुणदोषविवेचन थोडें बारकाईनें करणें जरूर आहे. तें पुढील भागांत करूं.

**समावर्तन**—वर सांगितल्याप्रमाणे ब्रह्मचर्यव्रत, साङ्गोपाङ्ग वेदविद्या, उत्तम शिक्षा, आणि पदार्थविज्ञान पूर्ण रीतीने प्राप्त करून विवाह करून गृहाश्रम चालविण्याच्या इच्छेने स्नातक ज्या वेळी विद्यालय सोडून घरीं येतो, त्या वेळचा हा प्राचीन संस्कार आहे. ब्रह्मचर्य आणि विद्यार्जन हीं दोन्ही व्रत ज्यास सोडावयाचीं असतात त्यास विद्याव्रतस्नातक म्हणतात यापैकी एकच सोडावयाचें असतां त्यास व्रतस्नातक किंवा विद्यास्नातक म्हणतात गृहाश्रमाची इच्छा करणाऱ्या कोणाही स्नातकाने चार सभ्य लोकांबरोबर सहकारितेने काम करण्याचें व्यवहारचातुर्यही संपादन केलेले असले पाहिजे

समावर्तनसंस्कार विवाहापूर्वी आचार्यांच्या घरीं किंवा स्वगृहीं करावयाचा असतो. स्नातक प्रथम घरीच गेल्यास त्यास पाद्य, अर्घ्य, आचमन, मधुपर्क, स्नान इत्यादि विधि असतो आचार्यांच्याच घरीं असल्यास सामान्य प्रकरणातील प्राजापत्याहुतीपर्यंत सर्व विधि झाल्यावर, कुंडातील अग्नि एकत्र करणें, तीन समिधा देणे, सात वेळा मुखस्पर्श, नंतर अंगस्पर्श वगैरे पूर्वोक्त क्रिया करून वेदीच्या उत्तरेस पूर्वीच ठेवलेल्या आठ घड्यांपैकी एका घडयातील पाण्यानें स्नान करावें मग त्याचप्रमाणे दुसऱ्या घडयातील पाण्याने स्नान करावे याप्रमाणे सर्व घडयातील पाणी घ्यावे मग ब्रह्मचाऱ्याने मेखला व दंड सोडून सूर्याची प्रार्थना करावी दहीं किंवा तीळ सेवन करून स्मश्रु करावी औदुंबराचे दातवणाने दात घासावे पुन्हा सुगंधित जलाने स्नान करुन चंदनाचे गंध लावून चक्षु, मुख नासिकादिकांस स्पर्श करावा. हातात पाणी घेऊन अपसव्य करावे पाणी खाली सोडून सव्य करावें.

---

[१] ह्या संस्कारात व आपल्याकडील सोडमुंजीच्या संस्कारात साम्य फारच थोडें आहे.

[२] तानिकल्पद०—अथर्व०, ११।२४।१६।२६

[३] ओं ये अप्स्वन्तरग्नयः०—पार०, २।६।१०।११ १२

[४] ओं उदुत्तम०—ऋ०, १।४२

[५] ओं उधन्०—पा०, २।६

[६] ओं अन्नाद्याय०—पार०, २।६

[७] ओं प्राणापानौ०—इ०—पा०, २।६

[८] ओं पितरः—पा०, २।६

नंतर निरनिराळे मंत्र म्हणत[1] वस्त्रें, पुष्पमाला, अंजन वगैरे घालून दर्पण पाहावा. जोडा छत्री घ्यावी[2] नंतर स्नातकास मोठया सन्मानानें घरीं नेऊन त्याचा मधुपर्कादि विधीनें सत्कार केल्यावर विद्यादान दिल्याबद्दल आचार्यांचे परोपरीनें आभार मानून व त्यांचा आशीर्वाद घेऊन संस्कार पुरा करावा

**विवाहसंस्कार**—ज्या स्त्रीपुरुषांना विद्या व धर्म यांची वृद्धि करावयाची असेल व जगावर उपकार करावयाचा असेल त्यांनीं विवाह करू नये, असेंच दयानंद सांगतात पण विद्यावृद्धीप्रमाणें सुप्रजावृद्धि ही पण गोष्ट ते विशेष महत्त्वाची समजत असल्यामुळें, विशेषेंकरून त्याच दृष्टीने त्यांनीं विवाहसंस्काराचा विचार केला आहे ब्रह्मचर्यव्रत, विद्या आणि बल हीं ज्यांनी संपादन केलीं आहेत, ज्यांचे शुभगुणकर्म स्वभावतुल्य आहेत, ज्यांची परस्परांवर प्रीति आहे, अशा स्त्री व पुरुषाचा, संतानोत्पत्तीसाठीं आणि वर्णाश्रमाचे उत्तम कर्मासाठीं, पुढील नियमानुसार होणारा जो संबंध तो विवाह होय अर्थात हा संबंध जुळण्यापूर्वी वधूवरांचें वय[3], कुल, वास्तव्य, शरीर, आणि स्वभाव याची योगपरीक्षा झाली पाहिजे यास्तव दोघेंही सज्ञान आणि विवाहेच्छु असलीं पाहिजेत सामान्यतः वधूपेक्षा वराचें वय दिढीपासून दुपटीपर्यंत असावें शरीर मात्र वरापेक्षा वधूचें सडपातळ असावें वराच्या खांद्यास लागेल इतकीच वधूची उंची असावी. शील, बुद्धि आचाररूपादि गुण तुल्य असावे वधूचें नाव ऋक्ष पर्वतादींचें निंद्य नसावें वधूचे डोळे पिंगळे नसावे फार केंस नसावेत कमीही नसावेत तसेंच वधूच्या ठिकाणीं अहिंसकता, सत्य, मधुर भाषण, कृतज्ञता, दयाळुता, देशभक्ति गृहकार्यदक्षता इत्यादि गुण पाहावे कन्या जन्मभर अविवाहित राहिली तरी चालेल, पण असदृश वराशी लग्न करू नये. ही वधूवरपरीक्षा चतुर स्त्रीपुरुषांच्या द्वारें करावी[4] आणि नंतर चार मंडळी बोलावून त्यांच्या देखत वधूवरानीं परस्परांशीं संभाषण करावे. अशी ही वधू गुणकर्मस्वभावानें वराच्याच वर्णाची

[१] ओं परिधास्यै०-इ०-पा०, २।६

[२] ओं विश्वाभ्यो०-पा०, २।६.

[३] (१६×२४ कनिष्ठ पक्ष, २४×४८ उत्तम पक्ष.)

[४] तमस्मेरा युवतयो०-ऋ०, २।३५।४-६, ५।३७।१, ५।४१।७.

[५] ओ३म् ऋतमग्ने०-आश्व०, १।५।५

[६] धर्मचर्य या०-आप०, २।५।११.

असावी ती आईकडून निदान सहा पिढ्यांतील व बापाच्या गोत्रांतील नसावी. कुलपरीक्षेसबंधीं मनुस्मृतींत म्हटलें आहे कीं, ज्या कुलात अकर्तृत्ववान्, अविद्वान, क्रियानष्ट, केंसाळ, कुष्ठादि असाध्य रोगी माणसें असतात अशा कुळातील वधू करू नये [मनु०, ३।२।४–१०] विवाहप्रकार मनूनें आठ सांगितले आहेत त्यापैकीं ब्राह्म, दैव, आर्ष किंवा प्राजापत्य या पद्धतीने लग्न करावे त्यात ब्राह्म उत्तम आणि गांधर्व कनिष्ठ होय. ते आवसथ्य अग्नि स्थापन करून करावे येथें अग्नीच्या विशिष्ट नावाचा उल्लेख आढळतो

विवाह करावयाचा तो दूर देशातील असपिंड व असगोत्र अशा तरुणतरुणींचा करावा. कारण जवळच्या माणसात परिचयामुळे अनादर असतो, प्रेम उत्पन्न होत नाहीं. रजवीर्याचा बदल झाल्यानें संतति सशक्त व बुद्धिमान् होते. यास्तव भिन्न कुलगोत्र व देश पाहावा भिन्न देशातील संबंधानें हवापालट हितकारक होतो बायकोंचे माहेर गरीब असले तर तें जवळ असल्यानें नवराही भिकेस लागतो, तें श्रीमंत असले तर बायको डोईजड होते मानापमान, रुसवेफुगवे वगैरे अनेक संकटें जवळच्या सोयरिकींत येतात. रत्नें, विद्या, उत्तम स्त्री इ० सर्व देशांपासून व सर्व लोकांपासून ग्रहण करावीं असें मनु सागतो [मनु०,२।२२] दूरदेशीं विवाह झाल्यानेंच कन्येचें हित होतें म्हणून तिला दुहिता (दुरेहिता) म्हणतात कन्या ऋतुमती झाल्यानंतर तीन वर्षेंपर्यंत योग्य वराचा शोध करून नंतर (छत्तीस वेळा रजोदर्शन झाल्यावर तिनें विवाह करावा) विवाह करणें वधूवराच्याच स्वाधीन असावें तें चांगले [मनु०, ९।८९।९२ ] प्रौढ विवाह आणि त्यातही स्वयंवरपद्धति चांगली.* तरुणींनीं पूर्ववयात चुकून सुद्धा पुरुषाचें चिंतन (ध्यान) करू नये. इतकेंच काय, पण विवाह होण्यापूर्वी कन्या व वर यांची एकान्तात गाठ पडू देऊ नये. कारण यौवनावस्थेंत अविवाहित स्त्रीपुरुष एकांतात असणे फार दूषणावह आहे वधूवराचा ब्रह्मचर्याश्रम आणि विद्याभ्यास संपण्याच्या अगोदर वर्षसहा महिने एकमेकांची चित्रें व जीवनवृत्तें परस्पराकडे त्यांच्या अध्यापकामार्फत पाठवावीं. अध्यापकानीं त्यांचें मत विचारावें. दोघांच्याही मनात विवाह करावा असें असेल, तर उभयतांचा समावर्तनसंस्कार एकाच वेळीं करावा. वधूवराच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या अध्यापकाच्या समक्ष किंवा आई बापाच्या घरीं त्यांचा विवाह व्हावा विवाहेच्छु स्त्रीपुरुषांनीं

* आधेनवो०–ऋ०, ३।५५।१६.

एकमेकांस कांहीं प्रश्न विचारावयाचे असल्यास, किंवा शास्त्रार्थ करावयाचा असल्यास, अध्यापक, आई-बाप व इतर सभ्यगृहस्थ, यांचे समक्ष प्रश्न विचारावे. कांहीं गुप्त गोष्ट विचारावयाची असल्यास लिहून विचारावी. विवाहनिश्चय झाल्यावर दोघाच्या खाण्याचा विशेष बदोबस्त ठेवावा विवाहापूर्वी वधूवरांस कामशास्त्र आणि गर्भादानविधि याबद्दल ज्ञान असावे

ह्या संस्कारात सर्व वऱ्हाडी मडळीस प्रवासात वस्त्र-प्रावर्ण इत्यादि गोष्टीत सोयीचें पडावें म्हणून साधेल तों जेव्हा थडी वगैरे नसून मानसिक बल ठीक असतें अशा उत्तरायणात चादण्यापारवात (पुण्य नक्षत्रे) एखाद्या चागल्या सोयीच्या दिवशी (तिथी, मास, नक्षत्र, ग्रहबळ, मुहूर्तादि योग काही एक न पाहता) हा संस्कार करावा कन्या रजस्वला होऊन शुद्ध झाल्यावर ज्या दिवशीं गर्भादान व्हावयाचे असेल त्याच्या अगोदर तीन दिवस सायकाळीं किंवा तिसऱ्या प्रहरीं वधूवरानीं आपआपल्या घरीं सस्कारविधीस सुरुवात करावी. ती अशी कीं, विवाहाची वेळ मध्यरात्री येईल सस्काराच्या आरंभी वधूवरांनी आपआपल्या घरीं काम हा गृहस्थाश्रमपूर्तीकरिता आहे, असा कामाग्नि स्वस्त्री शात करते, ती पुरुषाला स्ववश करते वगैरे अर्थाचा मत्र म्हणत, सुगंधित पाण्यानें स्नान करावे. नतर ईश्वरस्तुति, प्रार्थनोपासना, स्वस्तिवाचन, शांतिपाठ म्हणून पूर्वोक्त सामान्य विधीप्रमाणे अग्न्याधान व समिदाधान, स्थालीपाक इ० कर्म करावे. वधूकडील कार्यकर्त्या पुरुषानें वरास समारभानें वधूच्या घरीं आणावें. यासच ते वरात म्हणतात घराशीं आल्यावर वरानें पूर्वाभिमुख वधू आणि तिच्याकडील मंडळीनें उत्तराभिमुख उभें रहावे वधू व वधूकडील मंडळीनें वरास, आपण बसावें आम्ही आपला सत्कार करतो, असें म्हटल्यावर वरानें त्यास रुकार द्यावा नतर आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, मधुपर्क, गोदानादि द्रव्य, असें आपण घ्यावें असा

---

[१] उदगयन० आश्वा०, १।४।१–२. पा०, १।२।१. गोभि०, २।१।१–२

[२] आर्यांच्या सर्व संस्कारांत पूर्व आणि उत्तर या दिशा शुभ आणि तेजस्वी मानलेल्या आहेत

[३] विष्टरो विष्टरो विष्टर प्रतिष्टेह्यताम्.

[४] ओ३म् देवस्य त्वा०–य०,१।१० ओ३म् भूर्भुवः स्वः मधुवाता०–य०, १३।२७–२९. ओ३म् नमः श्यायास्या–पा०,१।३।९. ओ३म् वसवस्त्वा० इ. ओ३म् भूतेभ्यस्त्वा०–आश्वा०, १।२४।१४।१५. ओ३म् यन्मधुनो०–पा०, १।४.

प्रत्येकाचा आदरार्थी त्रिवार उच्चार करून वधूनें म्हणावें व वरानें मी घेतों असें उत्तर द्यावें. मग वराला घरांत नेऊन पूर्वाभिमुख बसवावें वधूनें त्याच्यासमोर बसावें. कार्यकर्त्यानें वधूवराचा पिता, पितामह, प्रपितामह याचें गोत्रोच्चारण-पूर्वक नांव घेऊन, ह्या सालकृत कन्येचा स्वीकार करा, असें म्हणून वधूचा उजवा हात वराच्या उजव्या हातावर ठेवावा, आणि वराने ओ३म् प्रनिगृह्णामि असें म्हणावें नतर हे दीर्घायु पतिव्रते, हे वस्त्र व देशी स्त्रियांनीं विणलेलें हें उपवस्त्र (शाल् वगैरे) घे असें सांगून तिला वरानें वस्त्रें द्यावी व स्वतांही धारण करावीं. हें होत असता पुढील होमाच्या तयारीसाठीं वरपक्षाकडील एकानें ( आगीचे निवारणासाठी ) पाण्याचा घडा घेऊन व दुसऱ्याने पशुपक्ष्यांचे निवारणासाठी दंड घेऊन यज्ञसमाप्तीपर्यंत वेदीशीं उभें रहावे त्याचप्रमाणे वधूच्या जवळच्या अगर दूरच्या भावानें तांदूळ व शमीपत्र सुपांत घालून त्यानींही लाजाहोमाच्या तयारींत असावे, तसेच वधूकरिता एक शिळा व वधूवरांकरितां कुशासने मांडून ठेवावीं नतरं वधूवरानीं सभामडपातील वेदीजवळ येऊन तेथे जमलेल्या सर्व सज्जनांची व परमेश्वराची प्रार्थना करावी वराने वधूस आपल्या कर्तव्याची जाणीव देन तिचा हात धरून तिला वेदीजवळ आणावे.नतर आपण वधूच्या डावे बाजूस आसनावर बसावें. तेथे वधूची मगलप्रार्थना, पुरोहितनियुक्ति होऊन आचमन घेतल्यावर १६ आज्या-हुति, प्रधानहोमाच्या पांच आहुति, नतर राष्ट्रभृत होमाच्या बारा आहुति, जयां

---

[ मागील टीप चालू ]

हे मग म्हणून चारी दिशास मगल आणि आबादानी असावी म्हणून मधुपर्क चारी दिशांस व वरखाली सिचन करावा आणि तो सेवन करताना हा तुमच्या कृपेने मी सेवन करीत आहें ही सर्वांविषयी भावना ठेवावी यानतर दोन आचमनें व नेत्रस्पर्श करावा.

[१] ओ३म् जरा गच्छ०—पा०, १।४ ओ३म् या अकृन्तन्नवयन्०—म० ब्रा०, १।३।६.

[२] ओ३म् परिधास्यै०—मा० गृ०, ९।२७ ओ३म् यशसा०—पा०, २।६.

[३] ओ३म् यदैषि०—पा०, १।४. [४] ऋ०, १०।८५

[५] म० ब्रा०, १।१।८ [६] ऋ०, ५।३।२.

[७] पा०, १।७ [८] पा०, १।५.

होमाच्या तेरा आज्याहुति, अभ्यातन होमाच्या अठरा आज्याहुति, आठ विशेष आज्याहुति, चार³ साधारण आज्याहुति दिल्यावर वरानें वधूस डाव्या हातांत तिचा उजवा हात धरून आदरार्थी तिला आणखी आपल्या उजव्या हातानें उठवावें. मग मूळ विवाहाचा आरभ होऊन पाणिग्रहणाचे सहा मत्र वरानें उभें राहून म्हणावे नतर जलकलश एकानें घेऊन वधूवरानीं यज्ञकुडास प्रदक्षणा करावी. आणि वरानें मत्रोच्चाराने वधूसबधीं कर्तव्याबद्दल प्रतिज्ञा करावी नतर वधूकडून शीलारोहण करवावें विवाहाचें जे मुख्यांग त्या लाजाहोमाचे मंत्र वधूने म्हणावें व वरानें धान्याच्या आहुति द्याव्यां पुढे वधूवरांनी होमकुडास चार प्रदक्षणा केल्यावर सुपातील राहिलेले हवनीय वधूच्या हातावर ओतून त्याची शेषाहुति द्यावी नतर एक आज्याहुति दिल्यावर एकातात जाऊन वराने दोन मत्र म्हणून वधूचे केश सोडावे (अबाडा सैल करावा) मग सभामडपात येऊन विवाहविधीचें अखेरचें प्रधान अग सप्तपदी करण्याकरिता वधूवराच्या उपवस्त्राना गाठ द्यावी. वधूचा उजवा हात आपल्या उजव्या हातात धरून वधूवरानी यज्ञकुडाच्या उत्तरेकडे जावे वराने आपला उजवा हात वधूच्या उजव्या खांद्यावर ठेवून उत्तराभिमुख उभे रहावे आणि वधूचा उजवा पाय उचलून चालण्यास सांगावें. मग ईशान्य दिशेस तिला एक पाऊल घेऊन जावे याप्रमाणे अखेर “ओ३म् सखे

---

[१] पा०, ११५ [२] म० ब्रा०, ११११–३ [३] गो०, २।१।२५,२६

[४] ऋ०, १०।८५।३६ अथर्व०, १४।१।५१–५७ पाणिग्रहणाच्या पहिल्या मत्रांतील भग=सकल ऐश्वर्ययुक्त, अर्यमा=न्यायकारी, सविता=जगत्कर्ता, पुरन्धि=जगत्धर्ता, परमेश्वर, देवा=सभामडपांतील विद्वान् लोक, असे अर्थ केले आहेत.

[५] पा०, ११६ [६] पा०, ११७. [७] पा०, ११६.

[८] पा०, ११७ या मत्रात पत्नीला प्रकृति म्हटलें आहे सर्व मत्रांतून पतीच्या अकित पत्नीनें असावे असाच भाव आहे. समान हक्काचा किंवा स्त्री-स्वातत्र्याचा भाव नाहीं.

[९] म० ब्रा०, ११२।५.

[१०] ऋ०, १०।८५।२४ २५ वधूस प्रेमानें आपल्या विश्वासांत घेऊन “तुझें मी रक्षण करीन. तू भिऊ नकोस ” असा तिला एकांतात प्रेमानें धीर देण्यासाठीं या विधीची योजना आहे असें सस्कारचंद्रिकाकार म्हणतात.

सप्तपदी भव" असें म्हणेपर्यंत सात पावलें ईशान्य दिशेकडे तिला न्यावें. परत आसनावर येऊन बसल्यावर जवळ असलेल्या पाण्याच्या घड्यांतून वधूवराचे मस्तकावर जलसिंचन करावें नतर वराने उठून सूर्यदर्शन करावे वधूवरानीं परस्पर एकजीव होण्याच्या मिषाने एकमेकाचा हृदयस्पर्श करावा मग वरानें वधूच्या मस्तकावर हात ठेवून सर्व लोकाकडे पहावे त्यावर सर्व लोकांनीं "ओ३म सौभाग्यमस्तु। ओ३म शुभभवतु" असा आशीर्वाद द्यावा ह्याप्रमाणें विवाहाचा पूर्ण विधि समाप्त होतो

पुढें वधूवर पुन्हा आज्याहुति देऊन काहीं वेळ आराम केल्यानतर सायकाळीं पुन्हा ईशान्य दिशेस अग्न्याधान, समिधादान, आघारावाज्यभागाहुति, व्याहृति आहुति, आज्याहुति, नतर प्रधान होमासबधीं सहा आहुति. पुन्हा चार व्याहृति आहुति झाल्यावर वरानें उत्तरेकडे मडपाबाहेर जाऊन ध्रुव अरुधति दर्शन करावे "मी ध्रुवाप्रमाणेच पतिकुलात निश्चल राहीन अरुधति तू जशी सप्तर्षीजवळ आहेस तशीच मी पातिव्रत्यधर्माने बाधली राहीन" अशी वधूने प्रतिज्ञा करावी तेव्हा वराने वधूच्या मस्तकावर हात ठेवून तिला उद्देशून एक उपदेशमत्र म्हणावा त्यावर वधूने प्रतिज्ञाबोधक दुसरा मत्र म्हणावा मग वेदीजवळ बसून दोघानीं तीन तीन आचमने करावीं व पुन्हा होमहवन करावे मागून हुतशेष भातापैकीं थोडा वराने भक्षण करून उच्छिष्ट थोडा वधूस खाण्यास

---

[१] पा०, ११८ या सप्तपदींत येथे उपलक्षणाने पुरुषार्थयुक्त सात साधने (अन्न, शारीरिक बल, ज्ञान, सुख, दीर्घजीवी अनेक पुत्र, ऋत्वनुसार वर्तन आणि मैत्रि) जाणावीं. पूर्वेस सूर्य आणि उत्तरेस धन विद्युत् आणि ध्रुवतारा आहे ईशान्य दिशेंत पूर्व आणि उत्तर या दोन्ही शुभ दिशाचे गुण एकत्र होतात म्हणून ती दिशा सागितली उजवा पाय उचलून सांगण्यात प्रपचातील सावधानता ह्या गुणाकडे लक्ष दिलें आहे

† पा०, ११८

[२] सुमङ्गलीरिय०—ऋ०, १०।८५।३३.

[३] म० ब्रा०, १।३।१—६.

[४] गो० गृ० सू०, २।३।८—१०.

[५] ओ३म् ध्रुवा० म० ब्रा., १।६।६ ओ३म १५ वमसि०—पा०, ११८.

घ्यावा मग वामदेव्यगान केल्यावर वधूवरानी पुरोहितासह मिष्टान्नभोजन करावें. आलेल्या मडळीचाही भोजनादि साधनानी सत्कार करावा दहा घटका-रात्र झाल्यावर वधूवरानी भूमीवर वेगवेगळे बिछाने घालून त्यावर निजावे. याप्रमाणे तीन रात्री ब्रह्मचर्य व्रत पाळावें आणि चौथ्या दिवशी गर्भादानसस्कार करावा. किंवा त्या दिवशी अडचण आल्यास गर्भादानसस्कार होईपर्यंत उभयतानी व्रतस्थ रहावे लग्नाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशी प्रातःकाळी वराकडील मडळीनी वधूवराना थाटाने वराच्या घरी न्यावें घर सोडताना वधूच्या डोळ्यास पाणी आल्यास निचें सात्वनार्थ मत्र म्हणून पुढे जावे वाटेत काही कारणामुळे मुक्काम झाल्यास बरोबर नेलेल्या विवाहाग्नीवर अग्निकार्य करावें, नाही तर वराचे घरी गेल्यावर तेथें अग्निकार्य करावे नतर वामदेव्यगान वगैरे, मग वधूवरासहित सर्वांनीं स्वस्तिवाचन, वडील मडळीस वधूवराचे नमस्कार व सर्वांचे आशीर्वाद, भोजनदक्षणादि सत्कार होऊन विधि पूर्ण करावा

सस्कारचद्रिकाकारानी विवाहसस्कारासबधी काही प्रश्नाचा खुलासा केला आहे. ते म्हणतात.—काही लोक समजतात की, विवाह म्हणजे कन्यादान, पण तसे नव्हे विवाहात देणारा आणि घेणारा एक कामच असतो [य०, ७।४८] विवाह वधूवराच्या स्वच्छनें (अर्थात वडिलाच्या अनुमतीनें) व्हावयाचा असतो कन्येचें दान करण्याचा हक्क मातापित्यास नाहीं दुसऱ्या एका रूढ होत चाललेल्या गोष्टीचा ते निषेध करतात ती गोष्ट म्हणजे विवाहविधींत नवीन पद्धतीची उपदेशपर व्याख्यानाची पद्धत ते म्हणतात कीं, संस्कारात मत्र हे अर्थपूर्ण आहेत अर्थात् त्या मत्राच्या श्रवणमननास प्रत्यवाय येईल अशी व्याख्याने, गाणीबजावणी ही सारी या गभीर प्रसगी वर्ज करावीं

**वानप्रस्थसंस्कार**—मुलाला मुलें झाल्यावर मुलाच्या अगावर सर्व ससारभार टाकून आत्मचितनाकरिता व परमात्मचितनाकरिता हा आश्रम आहे हा पन्नास वर्षाच्या पुढे स्वीकारावा. पन्नास वर्षानतर वैद्यकाचे दृष्टीनें स्त्रीसभोग वर्ज आहे.

---

[१] ओ३म् अन्नप्राशेन०—म० ब्रा०, १।३।८—१०.

[२] ऋ०, म० १०।४०।१० तसेंच खालील मत्राचा येथें यथाक्रमविनियोग करावा १।८५।२६ २७।३२३३ १०।८५।३।८

[३] अथर्व०, २०।१२७ म० ब्रा०, १।६।१।४ ऋ०, १०।७।८५।४३-४६ १०।८५।४७ याचा विनियोग आहे.

पत्नी असल्यास तिला वडील मुलाच्या स्वाधीन करावी किंवा आपल्याबरोबर न्यावी आणि भिक्षा मागून उदरनिर्वाह करावा सत्संगतींत रहावें अध्ययन-अध्यापनादि व्यवसायही करावे ह्याप्रमाणे आश्रम घेतांना पूर्वोक्त अग्न्याधान, समिदाधान, जलप्रोक्षण, आघारावाज्य भागाहुति, आज्याहुति, स्वस्तिवाचन, शांतिपाठ आणि स्थालिपाक झाल्यावर त्याच्या ओ३म् काय स्वाहा इ० [—य०,२२।१०।३३।३८] त्रेचाळीस आहुति द्याव्या नंतर व्याहृति आहुति व सामगान झाल्यावर अग्निहोत्राची सामग्री बरोबर घेऊन एकान्त सेवन करण्यास जावें

**सन्यास**—मोहादि आवरण आणि पक्षपात सोडून सर्व पृथ्वीवर परोपकारार्थ संचार करणे यास दयानद सन्यास म्हणतात तो वानप्रस्थानतर, गृहाश्रमानतर, किंवा ब्रह्मचर्यानतरही पुढील आश्रम न घेता एकदम घेता येतो त्यास मुख्य गोष्ट म्हणजे वैराग्य आणि यथार्थज्ञान पाहिजे + पन्नास वर्षांपासून पचाहत्तर वर्षांपर्यंत वानप्रस्थात राहून आयुष्याच्या चवथ्या भागात सर्वसगपरित्याग करून सन्यासी व्हावे द्विजासच फक्त सन्यास घेता येतो. वास्तविक ब्राह्मणासच तो अधिकार आहे ज्या दिवशी प्रसन्न चित्त असेल त्या दिवशीं सस्कारासबधीं व्रताला सुरुवात करावी तीन दिवस दुधावर रहावे जमिनीवर निजावे प्राणायाम, ध्यान, एकान्तात प्रणवाचा जप करावा ज्या दिवशी सन्यास घ्यावयाचा त्या दिवशी अगोदर प्रहर रात्र असता उठून चार विद्वानांस बोलावून पूर्वोक्त सामान्य विधि करावे नतर ओ३म् भुवनपतये स्वाहा०इत्यादि अकरा आज्याहुति द्याव्या. नतर सन्यास घेणारे आणि दोन ऋत्विज यानी स्वाहान्त मत्रानें भाताच्या पधरा आहुति द्याव्या आणि बाकीच्या ऋत्विजानी तुपाच्या आहुति देत जाव्या ×नतर डोकीचे पाच सहा केंस ठेवून सर्व मुडन व क्षौर करावे पुढें स्नान करून आपल्या मस्तकावर पुरुषसूक्ताचा एकशेंआठ वेळा अभिषेक करावा; पुढें आचमन व प्राणायाम करून ओ३म् ब्रह्मणेनमः इ०मत्राचा सहा वेळा जप करावा मग ओमात्मने स्वाहा इ मत्रानीं चार आज्याहुति द्याव्या मधुपर्क करावा

---

+ शर्यणावति०—ऋ०,९।११३।१-२ ४-११ यद्देवायतयो०—ऋ०,१०।७२।७. भद्रामिच्छन्त०—अथर्व०, १९।४१।१.—मनु०, अ० ६

× ओ३म् ब्रह्म होता ०—अथर्व०, १९।४२।४३.ओ३म् प्राणापान०—तैत्तिरीय०, प्र० १०।५१—६० ओ३म् अग्नयेस्वाहा—तैत्तिरीय०, १०।६७

प्राणायाम करावा. ओ३म् भूःसावित्रीं इ० मंत्राचा जप करावा. आमभये स्वाहा इ० मत्रानें आज्याहुति देऊन ओ३म् भूःस्वाहा या मंत्राने पूर्णाहुति द्यावी. नंतर " पुत्रैषणा वित्तैषणा लोकैषणा मया परित्यक्ता मत्तः सर्वभूतेभ्योऽभयमस्तु स्वाहा " असें म्हणून सर्वासमक्ष पाणी सोडावें मग नाभीपर्यंत पाण्यात उभें राहून ओ३म् भूः सावित्री इ० मत्राचा जप करावा, प्रणवार्थ परमात्म्याचे ध्यान करून पूर्व प्रतिज्ञा पुन्हा म्हणून ओ३म् भूः सन्यस्त मया० इत्यादि मत्राचे मनांत उच्चारण करून पूर्वाभिमुख होऊन दोन्ही हातानीं पाणी घेऊन ते मत्रोच्चारपूर्वक सोडावे नतर मौन धारण करून शिखेचे राहिलेले केश उपटावे आणि यज्ञोपवीत काढून हातात घ्यावें मग पाणी हातात घेऊन त्याचा केश व यज्ञोपवीतासह जलातच होम करावा इतकें झाल्यावर पाण्यातून बाहेर येऊन कौपीनादि वस्त्रे घ्यावीं. आणि दड धारण करून, आत्माच्या ठिकाणीं आवहनीयादि अग्नींचें आरोपण करावे यापुढे स्वामी दयानदानीं सन्याशाचीं कर्तव्याकर्तव्यें सागितली आहेत ती विस्तारभयास्तव देता येत नाहींत तथापि संन्याशाच्या सर्वसगपरित्यागाबद्दल दयानदाचे विचार थोडक्यात असे आहेत की, सत्योपदेश व वेदादि शास्त्राचा विचार व प्रचार न करणारे संन्यासी जगामध्यें व्यर्थ जिवत रहात असून ते भारभूत आहेत जे जीवाला ब्रह्म मानतात व मिथ्या वादाचा प्रसार करतात ते पापी व अविद्येमध्यें बुडालेले असतात. संन्याशानें एकरात्रीपेक्षा जास्त कोठें वस्ती करू नये तसेंच त्यानें दान घेऊ नये, वगैरे मतें स्वार्थसाधु पुराणिकानीं स्वतःचे पाखड बाहेर फुटू नये, व आपली मिळकत कमी होऊ नये, म्हणून लबाडीने पसरविलीं आहेत. श्राद्धात जर सन्याशी जेवले तर पितर नरकात जातात हाही लोकप्रवाद वेदविरुद्ध आहे कारण मेलेले पितर जर येऊच शकत नाहीत, तर ते नरकात जाणें कसें शक्य होईल!

**अंत्येष्टि**—यास नरमेध किंवा नरयागही म्हणतात हा सस्कार शरीराचें भस्म होईपर्यंतच आहे मृतक जीवासबधीं गरुडपुराणातून जें पुढें श्राद्धादि कर्म सागितले आहे. तें सर्व खोटें आहे त्याचप्रमाणें यमलोकही मिथ्या आहे. जीव मरणोत्तर अतरिक्षात जातो.

मरणानतर शरीरास स्नान घालून चंदनादि सुगधलेपन करून नवीन वस्त्र

[१] यो विवाद ब्रह्म०—अथर्व०, ९।३।१–३. तस्यैवं विदुषो०—तैत्ति० प्रपा०, १०।६४.

घालावें. निदान मृत शरीराच्या भारंभार तूप घ्यावे. तसेंच शक्य तर शरीराच्या भारंभार चंदन घ्यावें. त्याचप्रमाणें एक शेर तुपांत कस्तुरी व केशर घालावें अगर, तगर, चंदनाचा चुरा, कापूर वगैरे वस्तु घ्याव्या· पळसाचीं लांकडे न्यावीं. वस्तीच्या नैर्ऋत्य किंवा आग्नेय कोपऱ्यांत वेदी खणावी. मृतकाचे पाय दक्षिण आग्नेय किंवा नैर्ऋत्येस असावे मस्तकाचा भाग उंच असावा घृताच्या दिव्यानें डोक्यापासून पायापर्यंत कापरानें अग्नि पेटवीत जावें ओ३म् अग्नये स्वाहा इत्यादि मंत्रानीं तुपाच्या आहुति द्याव्या मग चार माणसांनीं खालील ऋ॰ मंत्रोच्चारांतील स्वाहा शब्दाबरोबर तुपाच्या सतरा सतरा आहुति द्याव्या मग त्रेसष्ट आहुति यजु॰ मंत्रानीं, दहा आहुति अथर्व मंत्रानीं आणि २६ आहुति तैत्तिरीय मंत्रानीं मिळून १२१×४, किंवा तूप जास्त असल्यास पुन्हा इतक्याच द्याव्या मग मृताच्या घरीं जाऊन तेथें पूर्वोक्त शान्तिपाठाचे स्वाहान्त मंत्र म्हणावे व घृताहुति द्याव्या ह्या योगाने मृतकाच्या घरातील वायु शुद्ध होऊन घरातील माणसाचें चित्त प्रसन्न होईल मग तिसरे दिवशीं कोणी मृताच्या संबंधी माणसाने अस्थि गोळा करून तेथेंच बाजूला ठेवाव्या याप्रमाणें अस्थि-संचयन झाल्यावर मृतकासंबंधी श्राद्धादि कोणतेही कर्तव्य उरत नाहीं मग त्याच्या स्मरणार्थ वेदोक्त धर्माच्या प्रचारासाठीं कोणी धर्मादाय केल्यास तो उत्तमच आहे

याप्रमाणें आर्यांच्या आश्रमसंस्काराबद्दल थोडक्यात माहिती दिली आतां सर्व आश्रमांना आधारभूत जो गृहस्थाश्रम त्यासंबंधीं दयानंदाचे विचार काय आहेत, ते सांगितल्यावाचून या श्रीमद्दयानंद भागाची पूर्तता होणार नाहीं. वस्तुत· या विषयाचे (१) गृह आणि गृहाश्रमसंस्कार, (२) सामान्य नित्यनैमित्तिक कर्म, (३) स्त्रियांविषयीं विचार, (४) पुरुषाविषयीं विचार आणि (५) सामान्य विचार, असे अनेक विभाग पाडता येतील परंतु विस्तारभयास्तव आम्ही या सर्व विभागांचा विचार थोडक्यात पुढील एकाच प्रकरणांत निरनिराळ्या सदरा-खालीं करीत आहोत.

---

[१] सूर्यचक्षुर्गच्छतु॰ इ॰—ऋ॰, म १०।१६।३–५–७,१३–१०।२०।९.
[२] अ॰, ३९.
[३] का॰, १८।२.
[४] प्रपा॰, ६ अ॰ १–१०.

## प्रकरण पंधरावें

# गृहाश्रम

**इ॒हैव स्तं मा वि यौ॑ष्टं विश्वमायु॒र्व्य॑श्नुतम्। क्रीळ॑न्तौ पु॒त्रैर्नप्तृ॑भि॒र्मोद॑मानौ॒ स्वे गृ॒हे ॥** —ऋ०, १०।८५।४२

**भावार्थ**—हे स्त्री पुरुषहो, तुम्ही पूर्वी विवाहाचे वेळीं केलेल्या प्रतिज्ञा पाळण्यात तत्पर असा त्या मोडू नका वीर्यरक्षण करून निदान शतायु व्हा. तसेंच पूर्वोक्त धर्मरीतीनें वागून पुत्र-पौत्रासह आनदानें गृहाश्रम चालवा

**स्त्रियांचे कांही धर्म**—

आर्यांचें असें मत आहे कीं, प्राचीनकाळीं आर्यभूमींतील स्त्रियांचा दर्जा पुरुषांसमानच असे किंबहुना पुरुषापेक्षाही श्रेष्ठ गणला जात असे उदाहरणार्थ, बापापेक्षां आईचे श्रेष्ठत्व हजारपटीनें जास्त आहे असे मनूनें स्पष्ट म्हटलें आहे आजच्या हिंदुसमाजात स्त्रियाचा पूर्वीचा दर्जा जरी राहिला नसला, तरी पृथ्वीवरील इतर स्वतंत्र देशात स्त्रियाचा दर्जा वाढत्या प्रमाणावर आहे, इतकेंच नव्हे, तर जगांत सर्वत्र समानता नांदण्याचा जो सुवर्णकाळ लवकरच यावयाचा आहे, तो घनघोर महायुद्धाच्या पाशवी शक्तीने उत्पन्न व्हावयाचा नसून, भावनाप्रधान अशा स्त्रियांच्या मार्दवशक्तीनेंच उदयास यावयाचा आहे, असें कित्येक तत्त्ववेत्त्यांनीं प्रतिपादलें आहे भावी सुवर्णयुगास जन्म देणाऱ्या या स्त्रीवर्गास स्वातंत्र्य व शिक्षण देण्याच्या कामात इतर राष्ट्रे चढाओढीने झटत असता जेथें दैवीशक्तीपूजन किंवा व्यावहारिक नारीपूजन (यत्र नार्यस्तु पूज्यन्ते) अत्यन्त प्राचीन काळापासून होत असे तो मागें राहूं नये म्हणून त्या भारतवर्षांतील आर्यांनी या स्त्रियांच्या जयजयकारांत अगदी पुढाकार घेतला आहे पूर्वाभिमुख मार्गाचें अंतिम टोंक ज्याप्रमाणें अखेर पश्चिमेस येऊन भिडतें, त्याप्रमाणें जगाच्या उन्नतीच्या प्रगतीचें अंतिम ध्येय प्राचीन वैदिक भारतवर्षाच्या अनुभवातच येऊन मिळतें, हें सिद्ध करण्याची महत्त्वाकांक्षा आर्यांनीं धरली आहे. शिक्षण व विवाह या महत्त्वाच्या बाबतींत स्त्रियांना पुरुषांप्रमाणें समान हक्क दयानदांनीं दिले आहेत, इतकेंच नव्हे; तर स्त्री-शिक्षण सक्तीचें मानून आणि स्त्रियांची लग्नाची वयोमर्यादा

चोविसाव्या वर्षापर्यंत नेऊन दयानंदांनीं स्त्रियांच्या कैवाऱ्यांत अग्रस्थान मिळविलें आहे. दयानदाचे हे स्त्रीविषयक विचार इतरत्र विषयानुसार दिलेच आहेत. यास्तव याचा येथें अधिक विस्तार करीत नाहीं.

तथापि पुनर्विवाह आणि नियोग हे विषय सुप्रजाजनन आणि स्त्री-पुरुषसबंध या बाबतींत फारच जवळचे व महत्त्वाचे आहेत. ते सस्कार या सदरात येत नसल्यामुळें त्याचा विचार यापूर्वी सस्कारप्रकरणीं करता आला नाहीं. म्हणून त्या-सबधी दयानदाचें मत थोडक्यात येथेच देत आहोंत

## पुनर्विवाह व नियोग—

सा चेदक्षतयोनिः स्याद्गतप्रत्यागतापि वा
पौनर्भवेन क्षत्रा सा पुनः संस्कारमर्हति ॥ —मनु०, ९।१७६.

" ज्या स्त्रीचें पाणिग्रहण मात्र झालें असेल व पुरुषसंयोग झाला नसेल, अशा अक्षत-योनि विधवेचा पुनर्विवाह व्हावा हें योग्य आहे " त्याचप्रमाणें जो विधुर अक्षत-वीर्य असेल त्यानेंही दुसरा विवाह करावा. त्रैवर्णिकांनीं क्षतयोनि झाल्या-वर स्त्रीनें व क्षत-वीर्य झाल्यावर पुरुषानें पुनर्विवाह करू नये, करणें असेल तर नियोग करावा वास्तविक विधवा स्त्रीनें व विधुर पुरुषानें आमरणान्त ब्रह्मचर्य धारण करून राहणें हें फारच चांगलें.

नियोग, विधुर व विधवा याच्यांतच होतो प्रतिमासीं ऋतुकालीं ऋतुदान समयापुरताच त्या दोघाचा एकत्र वास असावा दुसऱ्या कोणत्याही वेळीं त्यानीं एकत्र होऊ नये गर्भधारण झाल्यानतर नियुक्त पतीशीं सबंध ठेवू नये विधुर व विधवा प्रत्येकीं फार तर चार स्त्री-पुरुषाशीं नियोग करू शकतात. स्त्री आपल्या-करता दोन, व चार नियुक्त पुरुषाकरता प्रत्येकी दोन, याप्रमाणें फार तर दहा मुलें होईपर्यंत नियोग करू शकते त्यापुढें नाहीं स्त्रीनें नियोग करावयाचा तो आपल्या वर्णांतील किंवा आपल्या वर्णाहून श्रेष्ठ वर्णांतील पुरुषाशीं करावा. विवाह मात्र द्विज स्त्री-पुरुषास फक्त एकदाच वेदसंमत आहे. स्त्री वंध्या असेल, किंवा तिला मुलीच होत असतील किंवा ती अप्रिय भाषण करणारी असेल, तर ती जिवत असतांही पुरुषाला नियोग करतां येतो. त्याचप्रमाणें पति परागंदा असेल किंवा संतानोत्पत्तीस असमर्थ असेल, तर स्त्रीनेंही पति जिवंत असतां नियोग करावा. नियोगाला वैदिक दाखले आहेत त्यांपैकीं काहीं पुढें दिले आहेतः—

**इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु ॥**
**दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि॥** —ऋ०, म०६०।५५।४४.
**कुहस्विद्दोषा कुह वस्तारश्विना कुहाभिपित्वं करतः कुहोषतुः**
**को वां शत्रुया विधवेव देवरं मर्यं न योषा कृणुते सधस्य**
—आ०ऋ०, म० १०।४०।२.
**उदीर्ष्व नार्यभि जीवलोकं गतासुमेतमुपशेष एहि**
**हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनि त्वमभि सं बभूथ**
—ऋ०, म० १०।१८।८.

व्यभिचाराबद्दल स्त्रीला कुत्र्याकडून खाववून ठार मारावी व पुरुषाला तापलेल्या लोखंडी पत्र्यावर निजवून त्याच्या देहाचें भस्म करावें —मनु०,३७१।३७२

वरीलप्रमाणे दयानंदाचे विचार सारे आर्य आज आचरणात आणीत असतील असे नाहीं. दयानंदाची नियोगपद्धति कित्येक आर्यांस अनीतिमय तर कित्येकांस आजच्या कालास अव्यवहार्य वाटत आहे. उलटपक्षीं कित्येक त्यास ख्रिस्ती व मुसलमानी धर्मातील आधार दाखवून ही पद्धत वाटते तितकी निंद्य किंवा त्याज्य नाहीं, असेंही समर्थन करतात. तथापि सामान्यत्वें नियोगाचे बाबतींत दयानंदांचे अनुयायी आज त्याच्या फारच मागें असले तर विधवाविवाहाच्या कामीं ते त्याच्या पुष्कळच पुढे गेले आहेत. प्रियाराधन, वल्लभोपासना, प्रीतिविवाह, विधवाविवाह, स्त्रीस्वातंत्र्य, स्त्री-शिक्षण इत्यादि स्त्री-पुरुषसंबंध जोडणारे किंवा तोडणारे आजच्या आधुनिक आर्य सुधारकाचे आचार दयानंदास पटण्यासारखे नाहींत. त्यासंबंधीं येथे अधिक विस्तार न करतां पुढील भागात त्याचा विचार करूं.

**पुरुषांचे कांही धर्म—**

पुरुषानें धनधान्य, राज्यसमृद्धि संपादण्याचा पुरुषार्थ करावा. घरांत प्रेमानें तसेंच बाहेर सर्वांशीं सहकारितेनें व एकजुटीनें वागावें घरींदारीं कोठेंही द्वेष नसावा. चक्राच्या आऱ्याप्रमाणें सर्व धर्मकर्में एकजुटीनें करावीं. लहानमोठ्या कार्यांत निर्णय करण्यासाठीं ऋग्वेदज्ञ, यजुर्वेदज्ञ, सामवेदज्ञ, नैय्यायिक, तार्किक, मीमांसक, नैरुक्त, धर्माध्यापक, ब्रह्मचारी, स्नातक किंवा वानप्रस्थ विद्वान् अशा दहा जणांची—निदान तीन वेदज्ञ पुरुषांची—सभा असावी. धर्मदंडाचें भय सर्वांनीं बाळगावें. सकाळसंध्याकाळ इष्टमित्रांनीं एकत्र जमावें. सर्वसुखसाधनांचें साधन जो वेदोक्त धर्म त्याचें उत्कृष्ट पालन करावें. ज्यानें त्यानें वर्णविहित

कर्में करून धन आणि कीर्ति संपादन करावी. निरलस वृत्तीनें व परोपकार बुद्धीनें इष्टापूर्तीचीं कामें करून आपली व दुसऱ्याची उन्नति साधावी. खाणेंपिणें, बसणें-उठणें वगैरे सर्वांचीं एकत्र व्हावींत. गृहस्थांनीं अकारण दुसऱ्याकडे जेवण्यास जाऊं नये पण आल्या अतिथीचा त्याच्या योग्यतेप्रमाणे सत्कार करावा अतिथि अपात्र असेल तर त्याच्याशीं भाषणही करूं नये उलटपक्षीं कुंभार, धोबी, कोळण, वेश्या, पुजारी आणि अन्यायी राजा यांच्या घरचें अन्न सेवन करू नये.

## कांहीं सामान्य धर्म—

श्रीमद्दयानंदांनीं गृहाश्रमास सस्कारच म्हटले आहे ऐहिक आणि पारलौकिक सुखप्राप्तीसाठी विवाह करून आपल्या सामर्थ्यानुसार परोपकार करावा, नेमल्या वेळीं आणि यथाविधि आपली ईश्वरोपासना व गृहकृत्ये करावीं; सत्यधर्मात आपले तनमनधन अर्पण करावें आणि धर्मानुसार संतानोत्पत्ति करावी, ही गृहाश्रमाची व्याख्या आहे त्या गृहाश्रमासबंधीं स्त्री पुरुषाचीं विशेष कर्तव्ये कोणतीं तें दयानदांनीं प्राचीन शास्त्र प्रथाधारे सागितले आहे. त्यातील ठळक गोष्टी तेवढ्या पुढे नमूद केल्या आहेत पतिपत्नीनें एक-मेकासबधी प्रेम व अगत्य बाळगून शभर वर्ष सुखाने ससार करावा व सुप्रजा निर्माण करावी पत्नीनें सासुसासरा व पति याची सेवा करावी घरातील पुरुषांनीं स्त्रियास प्रेमाने व आदराने वागवावे असे जेथे नसेल, तेथें सुख व यश यांचा लाभ घडणार नाही स्त्री पुरुषानीं घरींदारीं प्रथम भेटीच्या वेळी किवा एक-मेकापासून पृथक होताना लहानमोठेपण न पाहता एकमेकास नमस्ते म्हणावें

महात्मा हसराज याच्या दयानदऋषिदर्शनात गृहस्थधर्मातील स्त्री पुरुषा-सबधी व पूजाधर्मासबंधी त्याचीं सहस्रावधि सुभाषिते दिलीं आहेत हसराजानीं निवडलेली हीं रत्ने उत्कृष्टच आहेत पण त्यात पैलूची चमक नसून तीं फार गोल आहेत त्याचा साराशही येथे देता येणें शक्य नाहीं शिवाय पिजऱ्यांतील पोपटाच्या उड्या ज्याप्रमाणे मर्यादेबाहेर जातच नाहीत, अथवा मल्लाच्या उड्या ज्याप्रमाणे मलखाबास कधींच सोडीत नाहीत. त्याप्रमाणें हंसराजाच्या विविध उक्ति वेदोक्त ऋषिदर्शनास फारशा सोडून असणें शक्य नसल्यामुळें त्यांत चमत्कृतिजनक किंवा नवीन असें कांहींच नाहीं. तेव्हा मानवधर्मशास्त्र किंवा हें ऋषिदर्शन येथे कोठवर वर्णावें ? जिज्ञासूंनीं मूळ ग्रंथच पाहावे हें बरें. तथापि गृहस्थाश्रमाचें महत्त्व लक्षांत घेऊन त्यासंबंधीं दयानंदांचे विचार अत्यंत संक्षिप्त रीतीनें पुढें देत आहोंत.

**रोटी-बेटी-व्यवहार—**

भिन्न धर्मातील लोकांशीं आर्यांनीं रोटी-बेटी-व्यवहार करावा ही गोष्ट दयानंदांस मान्य नाहीं. इतकेंच नव्हे तर हिंदूंची चातुर्वर्ण्यव्यवस्था अबाधित राहिलीच पाहिजे असा त्यांचा विशेष आग्रह असून भिन्न वर्णांत सरसहा रोटी-बेटी व्यवहार व्हावा ही गोष्ट त्यांस समत नाहीं रोटीव्यवहारात खरकटें, निर्लेप, सोवळें-ओवळें, स्पर्शास्पर्श वगैरे अनेक निर्बंध पाळण्यात कर्मठ हिंदूचा अतिरेक होत असतो, तो न व्हावा असें ते म्हणतात तसेंच राजकारणातील युद्धादि प्रसंगीं आणि सामाजिक उन्नतीला विशेष अडथळा येईल अशा प्रसगीं, रोटी व्यवहारांतील निर्बंध सैल सोडावे, असेंही त्यांचें मत दिसते पण मद्य, मास, मलिन पदार्थांच्या संसर्गापासून उत्पन्न झालेलीं कदमूल शाकफले, मादक पदार्थ, बुद्धिनाश करणारे व कुजलेले पदार्थ ह्यांचे त्यांच्या मतानें सेवन करता कामा नये त्याचप्रमाणे एकाच पात्रातील अन्न अनेकांनीं खाणे, मित्र, बधु, पति, गुरु इत्यादि कोणाचेंही उच्छिष्ट खाणे, याचाही त्यानी निषेध केला असून हिसा, चोरी, विश्वासघात, छळ कपट इत्यादि साहमानी जे प्राप्त होते, तेंही अभक्ष्य होय असेंच त्यानी ठरविलें आहे या अभक्ष्यापैकी विशेषेकरून मद्यमास सेवन करणाऱ्याच्या हातचेंही अन्न सेवन करू नये, अशी त्याची आज्ञा आहे आपस्तबधर्मसूत्रातील “ आर्याधिष्ठिता वा शूद्राः संस्कर्तारः स्युः [ प्रपा० २ पटल २ खंड २ सूत्र ४ ] ह्या सूत्राच्या आधारें दयानंद असे म्हणतात कीं, आर्यांच्या—अर्थात ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य याच्या—देखरेखीखाली शूद्रानी आर्यांच्या घरीं पाकादि सस्कार करावे तरी या ठिकाणीसुद्धां पुढे ते असे सागतात की, आर्यांच्या घरी जेव्हा शूद्र अन्न तयार करण्यास येतील तेव्हा त्यानीं तें काम करते वेळीं आपलें तोंड बाधलें पाहिजे तसेंच शूद्राच्या घरीं शूद्रांनी शिजवलेलें अन्न आपत्कालाशिवाय द्विजानी खाऊ नये पाहिजे त्यांच्या हातचें खाण्यात पुष्कळच दोष आहे विचारानेंच या सर्व गोष्टी केल्या पाहिजेत. ज्याअर्थी चाडालादिकाचीं शरीरें अभगल असतात, त्याअर्थी त्यानीं तयार केलेलें अन्न उच्चवर्णीयानीं खाण्यास योग्य नसतें आपल्या पूर्वेतिहासाकडे लक्ष देऊन ते असें म्हणतात कीं, जर सर्व आर्य शुद्ध धार्मिक पद्धतीनें वागत असते, तर सर्व आर्यांच्या हातचें आर्यांनीं खाण्यास कोणताच प्रत्यवाय नव्हता. कारण, ब्राह्मणादि तीन वर्णांचीं स्त्री-पुरुषे चौका करणे, भांडीं घांसणें हीं कामें करू लागलीं तर विद्यावृद्धि व ज्ञानप्रसार कोणीं करावा ? पूर्वी

युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांत सर्व भूमंडळावरील राजे महाराजे, ऋषिमहर्षि अनेक आलेले होते ते राजाच्या एकाच पाकशाळेंतील अन्नाचें सेवन करीत असत. जेव्हापासून ख्रिस्ती व मुसलमान वगैरे मतमतातरें निघून वैर वाढलें व मद्यगोमांसादिकाचा प्रचार सुरू झाला, तेव्हापासून भोजनामध्ये स्पर्शास्पर्शाचा बखेडा सुरू झाला आहे प्राचीन काळीं काबुल, कदाहार, इराण, अमेरिका, युरोप इत्यादि ठिकाणच्या राजाच्या गाधारी, माद्री, उलूपी वगैरे मुली आर्यावर्तातील राजानीं केल्या होत्या व भोजनादि व्यवहार याचे व त्याचे होत असत. शकुनि वगैरे तद्देशीय राजपुरुषाचा खानपानादि व्यवहार कौरवपांडवांशीं बिनबोभाट होत असे, त्याच्यात मुळींच विरोध नव्हता कारण त्या वेळीं सर्व भूमडळावर एकच वैदिकमत होतें तात्पर्य, दयानदाचें मत असें दिसतें कीं, प्राचीन काळची वैदिक निष्ठा व वैदिक आचारशुद्धि पुन्हा पूर्णपणे प्रस्थापित होईपर्यंत तरी आजच्या ह्या भ्रष्ट युगात अन्नपानादि व्यवहारात वर्णभेद पाळणें, निदान त्रैवर्णिक व शूद्र, मासाहारी व शाकाहारी, शुचिर्भूत व अमंगळ हे निर्बंध पाळणें, आवश्यक आहे.

**वर्णव्यवस्था—**

बेटी-व्यवहाराचा विचार करतानाही दयानद हे ब्राह्मादि इतर सुधारकांपेक्षा सनातनी हिंदूशीं पुष्कळच अधिक मिळते आहेत. आजच्या जातिभेदास वेदप्रामाण्य नसल्यामुळें ते जरी जातिभेदाचे कट्टे विरोधि आहेत, तरी ब्राह्मप्रमाणे चातुर्वर्ण्याचे ते वैरी नसून कट्टे पुरस्कर्ते आहेत. प्राचीन काळीं सत्यकाम, जाबाल, कवश, ऐतरेय, व्यास, पराशर, वशिष्ठ, याच्या माता शूद्र व अतिशूद्रही होत्या. तसेंच विश्वामित्र, अरिष्ट, श्येन, सिंधुद्वीप, देवापि आणि कपि हे सारे जन्मतः क्षत्रिय होते, असें असता हे सर्व ब्राह्मणाच्या योग्यतेचे वेदवेत्ते ऋषि मानण्यात आले यावरून प्राचीन काळची वर्णव्यवस्था जन्मसिद्ध नसून प्रत्येकाच्या गुणकर्मस्वभावावर ठरत असे, असें त्याचें म्हणणे आहे. आणि त्यावरून दयानदानुयायी आर्यांचें असें मत बनलें आहे कीं, पूर्वजन्मसंस्कार, आनुवशिक सस्कार, जन्मवर्णसस्कार व परिस्थितीनें उत्पन्न होणारे संस्कार किंवा उच्चनीचभाव याचे भेदामुळें मनुष्यामनुष्यात जरी जन्मतःच भेद असतो, तरी तो न्यूनाधिकभाव आपल्या पुरुषार्थानें घालवून आपली उन्नति पहिल्या प्रतीची करण्याचा किंवा व्यावहारिक भाषेंत बोलावयाचें तर ब्राह्मण होण्याचा मार्ग

सर्वांना सारखाच मोकळा आहे यांप्रमाणें अज्ञातकुल जाबाल, क्षत्रियकुल विश्वामित्र व चांडालकुल मातंगऋषि हे सर्व पूर्वी ब्राह्मण झाले. सध्यांही जे उत्तम विद्या, स्वभाव व आचरण यांनी युक्त असतील ते सारेच ब्राह्मण होत. जे मूर्ख दुराचारी असतील ते सारेच शूद्र होत रजवीर्याच्या योगाने ब्राह्मणशरीर होत नाहीं तर–" स्वाध्यायेन जपैर्होमैस्त्रैविद्येनेज्यययासुतैः ॥ महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीय क्रियते तनुः ॥ मनु० ॥ " स्वाध्याय, जप ( विचार ) इष्टि, विधिपूर्वक संतानोत्पत्ति, महायज्ञ व श्रेष्ठाचार ह्यांनीं हे शरीर ब्राह्मण वर्णाचे होते " उलटपक्षीं धर्मांतर झाल्यावर रजवीर्याची तनु बदलत नाहीं. पण ब्राह्मणादि वर्णाचा लोप झाला असें सर्व मानतात आता 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्' इत्यादि ऋचेवरून वैदिक कालींही वर्णांचें वैशिष्ट्य जन्माबरोबरच ठरत असे, असें मानण्याचे कारण नाहीं दयानंदांच्या मताप्रमाणें ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् इत्यादि ऋचा वरील वर्णव्यवस्थेस विरोधी नाहींत. वरील ऋचेचा अर्थ पूर्व मंत्रातून अनुवृत्त असलेल्या सर्वव्यापक पुरुष शब्दावरून लावला पाहिजे निराकार पुरुषाला तोंड आणि हात कोठचे ? यास्तव त्या ऋचेचा अर्थ मुखाप्रमाणे मुख्य, बाहुप्रमाणे बलिष्ट, उरूप्रमाणे देशदेशांतर करणारा व पायांप्रमाणे बुद्धिहीन नीच असा अर्थ करावा आणखी ते म्हणतात कीं, मुखापासून उत्पन्न होणारे ते ब्राह्मण म्हणावे तर गर्भाशयातून उत्पन्न होणाऱ्यास ब्राह्मण कसें म्हणता येईल ?

**शूद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम् ॥**
**क्षत्रियाज्जातमेवन्तु विद्याद्वैश्यात्तथैव च ॥** —मनु०, १०।६५

" शूद्रकुलात उत्पन्न होऊनही ज्याच्या अंगीं ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांच्याप्रमाणे गुण, कर्म व स्वभाव असतील ते ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य आहेत असें समजावें "

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्णांचीं कर्तव्ये व गुण पुढे दिल्याप्रमाणें आहेत

**ब्राह्मणाचे गुण, कर्म व स्वभाव—**

**अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा ॥**
**दानं प्रतिग्रहश्चैव ब्राह्मणानामकल्पयत् ॥** —मनु०, १।८८.
**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ॥**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥**—गी०,१८।४२.

[१] निष्कपटपणानें स्त्रियांनीं स्त्रियाना व पुरुषांनीं पुरुषास शिकवावें,

(२) पूर्ण विद्या शिकावी, (३) अग्निहोत्रादि यज्ञ करावे, (४) यज्ञ करवावे, (५) विद्या-सुवर्णादिकाचें सुपात्रीं दान करावे (६) न्यायार्जित धनाचें दान घ्यावें, यापैकीं २, ३, ५ हे ब्राह्मणाचे धर्म आहेत आणि इतर त्याच्या जीविकेचीं साधने आहेत त्यात दान घेणे हें नीच कर्म आहे [२] अधर्म व अधर्मासबंधीं वासनानिरोध, इंद्रियनिरोध, ब्रह्मचर्य, विद्या, योगाभ्यास याच्या सिद्धीसाठीं शीतोष्ण, मानापमान इ० द्वंद्वे सहन करणे, अतर्बाह्यशुद्धि, निंदास्तुतीनें विकारी न होणे, निरभिमानता, पृथ्वीपासून परमेश्वरापर्यंत पदार्थज्ञान, क्रिया-कौशल्य, योगाभ्यासानें विद्या साक्षात्कृत करून घेऊन उपकार करणें व करवणें आणि परमेश्वर, वेद, धर्म इ० नवकासबधीं आस्तिक्यभाव या उत्तम गुणकर्म-स्वभावानें युक्त असलेला किंवा असलेली ब्राह्मण किंवा ब्राह्मणी होय

त्याचप्रमाणें शुद्धीसबधीं मनु म्हणतोः

**अद्भिर्गात्राणि शुध्यन्ति मनः सत्येन शुध्यति ॥**
**विद्यातपोभ्यां भूतात्मा बुद्धिर्ज्ञानेन शुध्यति ॥**—मनु०, ५।१०९.

"पाण्यानें शरिराची, सत्याचारानें मनाची, विद्या व धर्मानुष्ठान याच्या योगानें जीवात्म्याची व ज्ञानानें बुद्धीची शुद्धता होते"

**क्षत्रियाचे गुण, कर्म व स्वभाव—**

**प्रजानां रक्षणं दानमिज्याध्ययनमेव च**
**विषयेष्वप्रसक्तिश्च क्षत्रियस्य समासतः** —मनु०, १।८९.
**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्** —गी०, १८४३

**वैश्याचे गुण, कर्म व स्वभाव—**

**पशूनां रक्षणं दानमिज्याध्ययनमेव च**
**वणिक्पथं कुसीदं च वैश्यस्य कृषिमेव च**
**कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्** —गी०,१८४४.

---

[१] वेदादि शास्त्रें पढणे आणि अग्निहोत्रादि यज्ञ करणें हें त्रैवर्णिकाचे धर्म समान आहेत. त्यात वैश्यापेक्षा क्षत्रियाना व त्याच्यापेक्षा ब्राह्मणावर जबाबदारी जास्त आहे इतकेंच.

[२] नाना देशच्या भाषा, हिशेब, भूगर्भविद्या, भूमि बीजआदींचे गुण जाणणें.

[३] सव्वा रुपया शेंकड्यापेक्षा जास्त आणि चार आण्याहून कमी व्याज घेऊं नये. व्याज दामदुपटीहून जास्त घेऊं नये.

**शूद्राचे गुण, कर्म व स्वभाव—**

**एकमेव तु शूद्रस्य प्रभुः कर्म समादिशत्**
**एतेषामेव वर्णानां शुश्रूषामनसूयया** —मनु०, ११९१.
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम्** –गी०,१८।४४

अशा रीतीनें गुणकर्मावरून वर्णव्यवस्था मानीत गेल्यास उत्तम वर्णांतील मुलास दुर्वर्तनाने आपण शूद्र होऊ असा धाक राहील व कनिष्ठ वर्णांतील मुलास सद्वर्तनाने उत्तम वर्णयुक्त होण्यास उत्साह येईल, असें दयानदाचे मतव्य आहे

**धर्मचर्यया जघन्यो वर्णः पूर्वं पूर्वं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ ॥ अधर्मचर्यया पूर्वो वर्णो जघन्यं जघन्यं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ ॥** —आप०, ध०सू०

"धर्माप्रमाणे आचरण करून निकृष्ट वर्णात उत्पन्न झालेला मनुष्य उच्च वर्णात जाऊ शकतो व अधर्माचरणाने उत्तम वर्णातील मनुष्य हीनवर्णाचा होतो"

गुणकर्मस्वभावावरून जो वर्ण ठरवावयाचा तो कन्याचा सोळाव्या वर्षी व पुत्राचा पचविसाव्या वर्षा परीक्षा करून निश्चित करावा आणि मग सवर्ण विवाह करावे, तरच स्त्री पुरुषामध्यें परस्पर प्रीति राहील

आतां वरील प्रकारें वर्णनिश्चय होईपर्यंत प्रत्येक आर्य मुला-मुलींची काहीं तरी जाति मानलीच पाहिजे त्या जात्यनुरूप मुलाच्या नावापुढे शर्मा, वर्मा, गुप्त वगैरे वर्णबोधक पदेंही जोडली पाहिजेत त्याचप्रमाणे जात्यनुरूप त्याचा उपनयनाचा कालही निश्चित केला पाहिजे अशा अनेक कारणास्तव आर्य एका मनु वचनास [२-१४८] अनुसरून मातृपितृकृत व आचार्यकृत अशा दोन जाति मानतात त्यापैकी पहिली अनित्य व दुसरी नित्य होय अशा रीतीने आचार्यकृत जाति ठरल्यावर जर त्या योगाने वर्णांतर झालें, तर पूर्व वर्णांतील आईबाप व भावंडे यांचा सबध तुटून निरनिराळी आपत्ति ओढवते. ती दूर करून असवर्ण झालेल्या मुला मुलींची स्ववर्णाला योग्य अशा मुली मुलाशीं लग्नें लावून देण्याची तजवीज करण्याकरिता व योग्य वेळीं वर्णनिश्चय करून वर्णांतर घडवून आणण्यासाठीं विद्या-सभा व राजसभा अशा दोन संस्थाची योजना दयानदानीं केली आहे. त्रीणि राजाना विदेथ पुरूणि परि विश्वानि भूषथः सदांसि ॥ –ऋ०, म०३।३८।६.

महान् विद्वानांना विद्यासभेचा अधिकार द्यावा. धार्मिक विद्वानांना धर्मसभेचा अधिकार द्यावा, प्रशसनीय धार्मिक पुरुषांना राजसभेचे सभासद बनवावे. त्यांमध्यें सर्वोत्तम गुणानीं जो उत्तम महान् विद्वान् पुरुष असेल त्याला सभापति किंवा लोकनियुक्त राजा करावा. याप्रमाणें सर्वांनीं आपली उन्नति करावी.

**प्राचीन गृहाश्रम—**

दयानदाच्या उपदेशाचें ब्रीदवाक्य [Back to the Vadas] वैदिक युगास आरभ करा हें मानण्यात येतें आणि तें प्रागतिकांच्या दृष्टीनें उपहासास्पद ठरतें. याचें कारण वैदिककालीन सस्कृतीबद्दल त्यास यथातथ्य कल्पना नसते हेंच होय, असें आर्य मानतात. गृहाश्रमप्रकरणात शालाकर्मविधि हा संस्काराचा एक भाग आहे. त्याचें वर्णन करताना सस्कारविधिकारानीं व सस्कारचद्रिकाकारानी माणसाचीं व पशूचीं वसतिस्थाने व पदार्थांचीं कोठागारे कशीं असावीं, ह्याबद्दल पूर्वींची शास्त्र-प्रमाणे दिलीं आहेत. त्यांवरून आपल्या प्राचीन सस्कृतीवर चागला प्रकाश पडतो प्राचीनकाळीं [१] मन्दिर (चिरेबंदी), [२] वास्तु (विटांचे), [३] सुमन्त (कच्च्या विटेचे), [४] सुधार (मातीचे), [५] मानस्य (लांकडी), [६] नन्दन (कळकाचे), [७] विजय (कापडाचे) आणि [८] कालिम (गवताचें) अशा प्रकारचीं घरें पूर्वीं असत तीं द्विपक्ष म्हणजे मधें एक व पूर्वपश्चिम एकेक अशा दालनांचें घर, याप्रमाणे चतुष्पक्ष, षट्पक्ष, अष्टपक्ष किंवा दशपक्ष म्हणजे मध्यवर्ति दोन दालने असून त्याच्या चारी बाजूला दोन दोन दालनें असत बाजूचीं दालने निदान दोन आणि मधलीं निदान सहा गज प्रमाणाचीं असत त्यात हवनीय द्रव्ये ठेवण्याकरिता, अग्निहोत्राकरिता, स्त्रियाना राहण्याकरिता, एक देवांकरिता ( म्हणजे आर्यमतानें विद्वान् मडळींकरिता), एक मडळींच्या बैठकीकरिता, त्याचप्रमाणे स्नान, ध्यान, भोजन इत्यादि व्यवहाराकरिता निरनिराळीं दालनें असत याशिवाय स्त्रिया व अशक्त रोगी माणसाकरितां संडासही घरापासून अलग असे असत. बाकी मंडळींनीं शौचशुद्धीस बाहेर जावें असा प्रघात असे. गावांतून कितीही जोरानें तीर मारला तरी तो लागू नये इतक्या दूर जाण्याची मर्यादा असे

त्याचप्रमाणें घरात शारीरिक आणि मानसिक स्वास्थ्यासाठीं सर्व तजविजी केलेल्या असत. तत्सबधीं प्राचीन शास्त्राचे नियम पाहतां, घरात सूर्यप्रकाश भरपूर असावा आणि हवा खेळती रहावी म्हणून समोर दरवाजे ठेवावे, निजण्यास

पलंग असावे, वरतीं छत असावें, घरांत थुंकण्याची बंदी असावी. त्यासाठीं पिकदाण्या ठेवाव्या. घरांत खुंटीवर सतार, बीन इत्यादि ततुवाद्यें टांगलेलीं रहावीं. कीटकांचा त्रास होऊ नये म्हणून दरवाजाना आणि खिडक्याना पडदे असावे, बाहेर स्वच्छ आगर्णीं असून त्याच्या बाजूस फलपुष्पांचे वृक्ष असावे. एखाद्या वृक्षास झोला टागलेला असावा, इत्यादि प्रकारचे मोठे रमणीय वर्णन आढळतें.

**शालाकर्मविधि—**

अशा प्रकारच्या सर्व सुखसोयींचें घर तयार झाल्यावर त्याच्या चारी दिशांस चार व मध्यें एक याप्रमाणे वेदी तयार कराव्या मग ज्या दिवशीं गृहपतींचें मन प्रसन्न असेल अशा दिवशीं गृहप्रतिष्ठेची सर्व सिद्धता करावी चागल्या विद्वान् धर्मात्म्यास बोलावून होत्याचें आसन पूर्वाभिमुख, अध्वर्यूचे दक्षिणाभिमुख, उद्गात्याचे पश्चिमाभिमुख, आणि ब्रह्म्याचें उत्तराभिमुख घालावें. मग घराच्या बाहेरच्या मुख्य दरवाजाशी सर्वांनी जाऊन 'ओ३म् अच्युताय भौमाय स्वाहा' असें म्हणून एक आहुति द्यावी. गृहपतीनें ध्वजस्तभ उभारून त्याच्या खालीं जलसिंचन करावे. घराच्या चारी कोपऱ्यावर चार ध्वज लावावे मग घराच्या चारी दिशात समंत्रक जलप्रोक्षण करावे जिकडे तिकडे पुष्पपल्लवमाला लावाव्या. दाराशी केळी उभ्या कराव्या मग ज्या दरवाजानें प्रथम गृहप्रवेश केला असेल या दिशेच्या वेदीवर पूर्वोक्त अग्न्याधान, समिदाधान, जलप्रोक्षण, आचमन इत्यादि विधि करून सामान्य प्रकरणात सांगितल्याप्रमाणे चार आघारावाज्यभागाहुति, चार व्याहृति, एक स्विष्टकृत आहुति, याप्रमाणें पुढें पूर्वादिक्रमानें सर्व वेदींवर अग्निकार्य करावें मग मध्यवेदींतही आहुति द्याव्या स्थालिपाकाच्याही आहुति द्याव्या. मग उबर, गूलर, पळस यांचीं पानें, शाडवल् तृण, गोमय, दहीं, मध, तूप, कुश, यव असे पदार्थ एकत्र करून ते निरनिराळ्या मत्रांनीं चारी दिशांस फेंकून जलप्रोक्षण करावें चारी दिशांस उभें राहून परमेश्वराचें उपस्थान करावें. शेवटी ब्राह्मण, सुवासिनी, आप्तइष्ट यांचा दक्षिणाभोजनादिकांनीं सत्कार करून पुरुषांनीं पुरुषाची व स्त्रियानीं स्त्रियांची बोळवण करावी. इतकेंच काय पण वेदींची मांडणी अशी करावी कीं, त्यांच्यांतून निघणारा सुगधित घृताचा धूप बगिच्यांतील सर्व वृक्षांसही पोचेल. असो. याप्रमाणे हा शालाकर्मविधि संपवून मंडळींनीं घरीं जातांना गृहपति व गृहपत्नी यांस आशीर्वाद द्यावा तो असाः—भवन्तोऽप्यानन्दिताः भूयासुः ॥

**प्राचीन दिनचर्या—**

त्याचप्रमाणे ऋतुभेदाने आणि वर्णव्यवसायभेदानें दिनचर्येचे नियमही फार अनुकरणीय असे असत उदाहरणार्थ, दांतवण कडूनिंब किंवा खैराचें घ्यावें. औषधी दंतमंजन वापरावें, जीभ साफ करण्याची पट्टी सोन्याचांदीची किंवा लांकडी घ्यावी, मुखशुद्धीकरिता तेल तुपाच्या गुळण्या कराव्या, झिल्लोदकानें तोंड धुवावें, आवळकाठीच्या काढ्याने डोळे साफ करावे, सिंधू नदीचा श्रोत्रांजन सुरमा घालावा. डोकीला तेल लावावे. कानातही घालावें व अंगास मर्दन करावें. व्यायाम करावा, उबटन (उटणे लावणें) उद्घर्षण (कपड्यानें किंवा समुद्रफेसानें चोळणें) उत्सादन (साबू वगैरे लावून धुणे) आणि स्नान अशा क्रियानीं शरीर-शुद्धि करावी. नंतर चंदनादींचें अनुलेपन, पुष्पमाला, वस्त्र आणि रत्नाभरणधारण, नंतर भोजन, हस्तपादप्रक्षालन षोडशगुणी तांबूलग्रहण, इत्यादि प्रकारें प्राचीन काळच्या दिनचर्येचें वर्णन वाचले म्हणजे हे स्वास्थ्यविज्ञान आजही शक्य तों अनुकरणात आणावें असें कोणासही वाटेल.

दिनचर्येतील ह्या लौकिकाचारांपेक्षा प्राचीन धार्मिक आचारांचें महत्त्व अर्थात् अनेक पटींनीं जास्त आहे ह्या मुख्य धार्मिक आचारांचें एकाच शब्दांत वर्णन करावयाचें तर तें पंचमहायज्ञ ह्या सामासिक शब्दाने होईल.

**नित्यकर्मे—**

**पंचमहायज्ञ**—[१] ऋषियज्ञ म्हणजे अध्ययन-अध्यापन [२] देवयज्ञ म्हणजे सकाळसंध्याकाळ संध्या व हवन. माध्यान्हसंध्या करू नये. [३] भूतयज्ञ वैश्वदेवास म्हणतात [४] नृयज्ञ योग्य अतिथीस अन्नदान दिल्यानें होतो. [५] पितृयज्ञ म्हणजे श्रद्धेने विद्यमान पितराची म्हणजे देव, विद्वान्, ऋषि, शिक्षक, मातापिता, ज्ञानी, योगी व वृद्ध पुरुष यांची प्रत्यक्ष किंवा इतर संस्थांच्या द्वारें सेवा करणे पितृयज्ञ मेलेल्या माणसांसंबंधानें करावयाचा नसतो.

ब्रह्मयज्ञाच्या योगानें विद्या, धर्म, सभ्यता इत्यादि गुणाची वृद्धि होते. देवयज्ञातील हवनात वायूची शुद्धता हा मुख्य गुण आहे. पितृयज्ञानें सेवाज्ञान व सत्यासत्यविचार वाढतो. भूतयज्ञातील बलिदानानें, अदृष्ट जीवाची हत्या होत असते, तिच्याबद्दल त्यांच्यावर प्रत्युपकार होतो. नृयज्ञात धार्मिक उपदेशकाचा सत्कार होतो.

**संध्योपासना हें ब्रह्मयज्ञाचें मुख्यांग आहे.** त्यास स्वाध्यायाचीही आवश्यकता

आहे. हीं दोन्ही धर्मकर्में सामुदायिक रीतीनें आर्यसंध्यामंदिरांत करावीं. समष्टि संध्येंत समष्टि-संकल्प उत्पन्न होतात आणि समष्टि-संकल्पानें सर्वांचें आत्मिक बल वाढून एक ऐक्यवर्धक महान् शक्ति निर्माण होते, तथापि संध्योपासना सामुदायिक रीतीनें करण्यापेक्षां ज्यानें त्यानें एकान्तात आपल्या घरच्या संध्यालयात करणें हें एका अर्थी जास्त हितावह होते त्याचा विधि पुढें देत आहों.

**संध्योपासना**—रात्रीं दहा वाजता निजावे व सकाळीं चार वाजता उठावें. उठताच आपल्या हातून धर्मयुक्त पुरुषार्थ घडावा म्हणून ईश्वराची स्तुति-प्रार्थना व उपासना करावी नंतर शौचमुखमार्जन व स्नान करावें नंतर कोस दीड कोस गावाबाहेर एकान्तात जाऊन योगाभ्यासपूर्वक परमेश्वराची उपासना करावी. सूर्योदयाच्या सुमाराने घरीं येऊन संध्योपासन करावे. ते असें[1]:—ओ३म् अमृतोपस्तरणमासि स्वाहा, ओ३म् अमृतापिधानमसि स्वाहा, ओ३म् सत्यं यशः श्रीर्मयि श्रीः श्रयतां स्वाहा, यातीन मंत्रानीं तीन आचमनें करावीं नंतर हात, कान, डोळे व नाक यास जलस्पर्श करून, पवित्र आसनावर ज्या दिशेचा वारा असेल त्या दिशेस तोंड करून बसावे. नंतर अंतःकरणात परमेश्वराची स्तुति-प्रार्थनोपासना करीत निदान तीन वेळा प्राणायाम करावा. तो नाकास हात वगैरे न लावता प्रथम रेचक, बाह्यकुंभक, पूरक, अंतःकुंभक याप्रमाणे तीन वेळा तरी करावा. नंतर ओ३म् शन्नो देवीरभिष्टय आपो भवन्तु पीतये। शंयोरभिस्रवन्तुनः [ य०, ३६।१२]

---

[१] पं०चमूपति म्हणतातः—प्रथम प्रणवपूर्वक गायत्रिमंत्रानें शिखाबंधन करावें. प्रणव परमात्मवाचक आहे. त्यातील अ=अग्नि, विश्व, उ=वायु, तैजस, म= आदित्य, प्राज्ञ. गायत्रीमंत्रातील भूः=प्राण जगत्प्राण, भुवः=अपान=दुःखाचें अपनयन करणारा जगदीश, स्वः=व्यान=सर्वव्यापक प्रभु, किंवा भूः=ऋग्वेद, पृथ्वी, भुवः=यजुर्वेद, अन्तरिक्ष, स्वः=सामवेद आणि तिन्ही विद्यानीं पूर्ण अथर्ववेद किंवा द्युलोक मंत्रार्थ—जगत्प्राण दुःखविनाशक, सुखस्वरूप, सर्वव्यापक, प्रेरक आणि उत्पादक, प्रकाशस्वरूप, ओ३मच्या प्रसिद्ध तेजास आम्ही पृथ्वी, अंतरिक्ष आणि द्युलोकातील प्राणी ऋगादि चार वेदांच्या द्वारें प्राणायामानें मनात धारण करून ध्यानात घेत आहों तो ओ३म् आमच्या बुद्धीला चतुर्विध पुरुषार्थांत प्रेरित करो. याप्रमाणें मनाचें संकुचित व्यक्तित्व दूर करून त्यास विशाल करावें केवळ आपल्याकरतांच नव्हे तर त्रैलोक्यांतील प्राणिमात्राच्या हितासाठीं ही उपासना आहे.

या मंत्रानें तीन वेळां आचमन करावें. नंतर मध्यमा आणि अनामिका यांनीं जलस्पर्श करून ओ३म् वाक् वाक् इ० पासून ओ३म् खंब्रह्म पुनातुसर्वत्र० पर्यंत अनेक मंत्रांनीं शरीराच्या निरनिराळ्या भागांवर मार्जन करावें मग ओ३म् ओंभुवःदि मंत्रांनीं जप करीत पूर्वोक्त तीनपासून एकवीस वेळपर्यंत प्राणायाम करावा. मग ओंऋतञ्च सत्यञ्चा० या मंत्रानें सर्वव्यापक परमेश्वराचें चिंतन (अघमर्षण) करावे, पुन्हा शन्नोदेवि० या मंत्रानें तीन आचमनें करून ओ३म् प्राची० इत्यादि मंत्र म्हणून आपल्या सभोंवार आणि सबाह्यांतर परमात्मा संचरला आहे अशी त्याची (मनसापरिक्रमा) स्तुति करावी अशा

---

[१] या मंत्रात शान्तिस्वरूप परमेश्वराजवळ त्रिविध तापाचा नाश मागितला आहे आचमनाने आळस आणि कंठस्थ कफपित्ताची निवृत्ति होते. तीन आचमनांनी वरील त्रिविध तापाची शान्ति होते जल हें ईश्वरस्मरण करून देणारे आहे. जलसंबंधी सारें विज्ञान आणि जलचिकित्सादि साऱ्या विद्या ह्या मंत्रांत बीजरूपाने आहेत.

[२] इंद्रियस्पर्शाचे विधींत आत्मिक उन्नतीची पहिली पायरी शरीरस्वास्थ्य आहे हे दर्शित केले आहे. ही एकप्रकारची सॅण्डोची पद्धति मानावी. किंवा हिला कोणी बालबोधिनी चेष्टा म्हटलें तरी हा बालस्वभाव उपासकास योग्यच होईल

[३] मार्जनांत बाह्यशुद्धीचे महत्त्व दर्शवून इंद्रियनिग्रहासबंधी ही प्रार्थना आहे उदा०—मस्तकात सुविचार, नेत्रात शुभदर्शन, हृदयात प्रेम, नाभींत पचन इत्यादि.

[४] मार्जन ही जशी जलचिकित्सा ( Equopathy ) त्याचप्रमाणे प्राणायामही त्याहून सूक्ष्म अशी प्राणचिकित्सा ( Oxipathy ) आहे. आगगाडींतील वाफेप्रमाणे शरीरांतील प्राणशक्ति आहे

[५] अघमर्षणात, परमात्मा, सृष्टिकर्ता, प्रकृति आणि जीव अनादि आहेत आणि सृष्टि प्रवाहरूप आहे हें दर्शविले आहे. पापाचे मूळ आपल्या स्थितीच्या व स्वरूपाच्या अज्ञानात आहे या मंत्रांतील शेवटल्या स्वः शब्दाचा अर्थ सुख केला आहे.

[६] मनसा परिक्रमा–या विधींत आपल्या समोरची दिशा प्राची समजावी. प्रत्येक दिशेचे स्वामी वेगळे नाहींत. सर्व दिशाचा स्वामी एक ओ३म् हाच होय. दिशापतीच्या नावांचा त्या त्या दिशाशीं परिमित असा कांहींच संबंध नाहीं.

रीतीनें परमेश्वर आपल्या अतिनिकट आहे अशी भावना करून, जातवेदसे सुनवाम इ० [ऋ०, १।९९।१] चित्रंदेवानामुदगादनीकं०, उदुत्यं जातवेदसं०, उद्वयन्तमसस्परि० तच्चक्षुर्देवहित० [य०, १३।४६; ३३।३१, ३५।१४, ३६।२४] या मन्त्रांनीं परमेश्वराचें उपस्थान करावें मग पुन्हा शन्नोदेवि० मन्त्रानें तीन आचमनें करून आणि ईशकृपेनें चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त व्हावे म्हणून गायत्रिमन्त्रानें अर्थविचारपूर्वक परमेश्वराची स्तुतिप्रार्थनोपासना करावी. शेवटीं ओ३म् नमःशंभवायच [य०, १६।४१] ह्या मन्त्रानें वंदन करून पुन्हा शन्नोदेवि० या मन्त्रानें आचमनपूर्वक अग्निहोत्राला आरंभ करावा

वरील संध्योपासनेचा क्रम दयानंदाच्या 'संस्कारविधि' या पुस्तकावरून दिला आहे. त्या विधीशीं ऋग्वेदी संध्येचा कांहीं नामसादृश्यापलीकडे मुळींच मेळ नाहीं हें तर उघडच दिसून येईल पण श्रीस्वामी परमानंद, पं० चमूपति, आणि म० दुर्गाप्रसाद ह्या आर्यविद्वानांच्या पुस्तकांतूनही क्वचित् पाठभेद आहेत ह्या बारीकसारीक गोष्टी सोडून दिल्या तर सामान्यत्वें आर्यांच्या संध्येच्या रहस्यांत फारसा भेद आढळणार नाहीं

**संध्या-रहस्य—**

ह्या नाशवंत संसारांत केव्हां तरी शरीरास मृत्यु हा ठरलेलाच आहे. यास्तव अपघातापासून आपलें नुकसान न व्हावें म्हणून ज्याप्रमाणें व्यवहारी चतुर मनुष्य विमा उतरून निर्घोर राहतो त्याप्रमाणे मृत्यूसारख्या आपत्तीनेंही आपलें मुळींच अनहित होऊं नये म्हणून जो पुरुष नित्यनैमित्तिक कर्मांचे हप्ते वेळच्या वेळीं भरीत असतो तो कायमचा निश्चिंत होतो यासाठीं ज्यानें त्यानें आपली आत्मिक वही वरचेवर पडताळून पाहिली पाहिजे. आपल्या कर्मांच्या जमा खर्चांतील तूट भरून काढण्यास मुख्य साधन परमेश्वरचिंतन हें होय. त्या सर्वशक्तिमानाच्या स्मरणानें साधकही शक्तिमंत होतो त्यासाठीं वनांतरास जावयास नको किंवा कर्मसंन्यासही करावयास नको. चारी आश्रमांचा यथास्थित अनुभव घेण्यास सांपडेल असा आयुष्याचा जिम्मा कोणीं घेतला आहे ? यास्तव या गृहस्थाश्रमांतच राहून आत्मसंयमनादि गुणांनीं चारी आश्रमांचा अनुभव घ्यावा आणि चारी पुरुषार्थ साधावे. सवितृमंत्राच्या स्मरणाची प्रथम शेंडीला गांठ द्यावी; मग शन्नो देवि० ह्या मन्त्रानें मनाला निर्विकार करावें; इंद्रियस्पर्श आणि मार्जनद्वारा शरीरशुद्धीची आस्था असूं द्यावी. प्राणायामानें मानसिक बल

धाव्यावें, अघमर्षणानें पापाचा नाश करावा. मनसापरिक्रमानें साऱ्या जगास आपल्या प्रेमाचा विषय करून निर्वैर बनावें. उपस्थान करून त्या अदर्शनीयाच्या दर्शनाचा हव्यास धरावा. ह्या संध्येनें सारा गृहस्थाश्रम पावन होतो. संध्येंतील प्रार्थना हीच प्रतिज्ञा होय प्रातःसंध्या हेंच ब्रह्मचर्य आणि सायंसध्या हाच संन्यास मानावा आपल्या जीवनापासून सध्या ही अलग मानणें हा अविचार आहे तसेंच मी पापी आहें आणि तू पतितपावन आहेस ह्याचा जन्मभर नुसता जप करून काय होणार ? अशा भावनेनें उपास्य उपासकांत एकस्थायि सबंधच स्थिर होऊन बसतो अशानें साधक पाप्याचा पापीच राहून पतितपावनाच्या ब्रीदाची सद्यःप्रतीति कधींच अनुभवण्यास मिळणार नाहीं यासाठीं सध्येतील प्रार्थना प्रतिज्ञारूप मानून पुरुषार्थ सिद्ध करावा आता ही गोष्ट त्वरित सिद्ध होते असे नाहीं यासाठी उतावळीने निराश होऊन नित्यकर्माबद्दल अश्रद्धा होऊ देऊ नये सध्योपासना संस्कृत भाषेत आहे ती भाषा समजत नसली तरी त्या देववाणीचें महत्त्व जाणून आपली कर्मनिष्ठा राखली पाहिजे. आबालवृद्धास साऱ्या जन्मभर हे एकच साधन कसे, ही शकाही व्यर्थ आहे हा धर्माचा आदश आहे या एकाच आदर्शात सर्व आबालवृद्धास आपले प्रतिबिंब पडताळून पाहता येतें द्रष्टा आणि श्रोता याचे अनुभव वेगळे असले तरी दृष्टश्रुतवस्तु एकच असण्यास हरकत नाहीं स्वच्छ जलवायु रोग्याचे रोग निवारण करतील तसे जो निरोगी आहे त्याचेंही स्वास्थ्य वाढवतील जी सध्योपासना ब्राह्मणास हितावह आहे ती शूद्रासही ब्राह्मणत्व देईल. शूद्र आणि ब्राह्मण हे जगत्पित्याला सारखेच स्त्री ही जर पुरुषाची एक उपास्यदेवताच आहे तर मग ती पुरुषाहून अनधिकारी कशी ? वृद्धाहूनही परमात्मा अतिवृद्ध आहे. आणि नवजात बालकाहूनही त्याची कोमलता अधिक आहे

आता काय करावें, मन निश्चल होत नाही ही एक साधकाची तक्रार असते; परंतु हा भ्रम आहे मनाची निश्चलता ही इष्ट नसून उलट मनाची जितकी तीव्र गति होईल तेवढी ती अधिक तत्त्वाचे ग्रहण करील समाहित आणि स्तब्ध या मनःस्थितींत फार अंतर आहे नियमारूढ परंतु अनिरुद्ध अशी जी मनाची गति ती समाहित होय. स्तब्ध म्हणजे गतिच नव्हे ती मनाची मूढ स्थिति आहे. साकाराच्या पूजनांत मनाची गति कुंठित होते, हाच दोष आहे. परमेश्वराचे गुण अनंत आहेत. त्या "सदावृधा"च्या ध्यानानें बाहुबल, विद्याबल,

बुद्धिबल, समाजबल व आत्मिक बल यांचा विचार मनांत सारखा वाढत राहतो. मनानें निःसंकल्प व्हावें, अशी वेदांत प्रार्थना नसून मनानें शिवसंकल्प व्हावें, असें मागितलें आहे. संध्येंत जी एकाग्रता पाहिजे ती मंत्रार्थाच्या साऱ्या विस्ताराला मनाने व्यापलें पाहिजे ही आहे. जोंपर्यंत मन असें वाढत नाहीं तोंपर्यंत तोच तोच मंत्र पुनःपुन्हा म्हणून त्याच्या अर्थानुसधानाचा अभ्यास करावा. तात्पर्य, मनाच्या चांचल्यास भिण्याचें कारण नाहीं. उलट ती गति जितकी तीव्र होईल तितकी ती अधिक गुणव्यापी बनेल

वैदिक प्रार्थनाचें हेंच वैचित्र्य आहे कीं, त्यांत जीवनाच्या सर्वांगांकडे लक्ष पुरविले आहे प्रजा, पशु, ब्रह्मवर्चस् आणि अन्न या सर्वांचें मागणें एकाच प्रार्थनेंत असतें. नवीन वेदान्तांत हाच मोठा दोष आहे त्यानीं सर्वच मिथ्या ठरवून मागणेच बद केले लोकास आळशी आणि पुरुषार्थहीन केलें प्रकृतीचें प्रभुत्व हेच परमेश्वराचे परम ऐश्वर्य आहे प्रकृतीवांचून परमात्मा मिळणार कसा ? चक्रवर्ति राज्य मागणे अथवा वैभवाच्या सिद्धीकरिता प्रयत्न करणे, हें वास्तविक विभूच्या प्राप्तीचें साधन आहे सांसारिक वढाई हेय नाहीं, उपादेय आहे जितके आपण मोठे होऊ तितके परमेश्वराजवळ जाऊ धनाचे दास होऊं नये, पण धनाचा जो स्वामी तोच खरा धार्मिक आज आपण धनतृष्णा सोडणें म्हणजे भारताचे मरण आहे भुकेला भ्रान्ति म्हणून तिची तृप्ति कशी होईल ? परमात्म्याजवळ परमात्मपद मागावयाचें तर ते स्पष्ट मागावें धर्म-ज्ञान, धन, वल, ऐश्वर्य हीं सपादन करणें म्हणजे परमेश्वरप्राप्तिच होय त्यांचा अनादर म्हणजे परमेश्वराचाच अनादर होतो

**अग्निहोत्र**—संध्योपासनेप्रमाणें अग्निहोत्रही स्त्री-पुरुषांनीं रोज दोनदा करावें. एखाद वेळीं पति-पत्नीपैकीं एक त्या वेळीं हजर नसेल तर दुसऱ्याला दोहोंकरितां दोन दोन वेळा मंत्र म्हणून अग्निकार्य करतां यते

अग्न्याधान व समिदाधान याचा विधि पूर्वी संस्कारप्रकरणांत सागितलाच आहे त्याप्रमाणें विधि झाल्यावर ओ३म् अदितेऽनुमन्यस्व० इ० चार मंत्रांनीं जल-प्रोक्षण करावें व मग सुगंधिक तयार केलेलें तप ऊन करून पूर्वोक्त आघारावाज्य भागाहुति देऊन ओ३म् सूर्योज्योतिर्ज्योतिः सूर्य स्वाहा ॥ इत्यादि मंत्रांनीं प्रातःकाळीं आणि ओ३म् अग्निर्ज्योतिर्ज्योतिरग्निः इत्यादि मंत्रांनीं सायंकाळीं अग्निहोत्र करावें. ओ३म् सजूर्देवेन्० या मंत्रानें तिसरी आहुति द्यावी. ओ३म् भूरग्नये प्राणाय स्वाहा०

[य०,३२।१४] ओ३म् विश्वानि देव सवितर्दुरितानि० [य०, ३०।३] ओ३म् अग्नेनय सुपथा [य०, ४०।१६] या मंत्रांनीं आठ आहुति द्याव्या. अखेर ओ३म् सर्वं वै पूर्ण ४ स्वाहा या मंत्रानें तीन पूर्णाहुति द्याव्या.

अग्निहोत्रास देवयज्ञ असेंही म्हणतात, यानें हवा शुद्ध होते, यामुळे वादळ उत्पन्न होऊन परपरेनें जलवृष्टीस मदत होते मनुष्यमात्राच्या ठिकाणीं मैत्री व परोपकार इत्यादि भाग उत्पन्न होतात त्याचप्रमाणें त्या योगानें तपस्या, ऐक्यता आणि आत्मसमर्पण हे गुणही वद्धि पावून मनुष्याचें पारमार्थिक कल्याण घडतें.

**बलिवैश्वदेवविधि**—घृतमिश्रित भात किंवा त्याचे अभावीं क्षारलवण-रहित जो पदार्थ शिजला असेल त्याच्या ॐ अग्नये स्वाहा. [मनु०, ३।८५।८६] इत्यादि मंत्रानीं दहा आहुति द्याव्या नतर ओं३म् सानुगायेंद्रायनमः (पूर्व) इत्यादि मंत्रांनीं चार दिशा, ओ३म् मरुद्भ्योनमः इ०मत्रानीं द्वार, जल, मुसळ किंवा उखळ ईशान्य, नैर्ऋत्य, मध्य, ऊर्ध्व, पृष्ठ, आणि दक्षिण या दिशाना एका थाळींत बलिदान करावें. त्या वेळीं कोणी अतिथि आल्यास त्यास अन्न द्यावे. नाहींतर अग्निस अर्पण करावें [मनु०, अ. ३।८७–९१] नतर घृतसहित लवणान्न घेऊन शुनांच पतितानांच० [मनु०, ३।९२] याप्रमाणे ६ भाग पृथ्वीवर ठेवावे आणि सहा भाग ज्याचे त्यास द्यावे. ह्या हवनातील रहस्य असें सागतात कीं, जें अन्न मनुष्यास पोषक असतें तेंच मनुष्यास हानिकारक असणाऱ्या क्षुद्र कृमिकीटकास मारक होतें यामुळें त्यांच्या आहुतींनीं पाकशाळा शुद्ध होते बलिदानात दुसरा असा विचार आहे कीं, ज्या दिव्य पदार्थांकरिता बलिदान सागितलें आहे ते उपकारक असल्यास त्यांची आपल्याला अनुकूलता राहील तसें नसल्यासही त्याची पीडा टळेल. आपल्या प्राप्तींत इतराचेही भाग असतात, यास्तव असें बलिदान करून किंवा आपल्या प्राप्तीचा काहीं अश अनाथालयासारख्या दीनोद्धारक संस्थास देऊनही बलिवैश्व-देव यज्ञ साधता येतो.

**अतिथियज्ञ**—धार्मिक, परोपकारी, सत्योपदेशक, पक्षपातरहित, शान्त, सर्वहितकारक अशा विद्वानांची अन्नादिकानीं जी सेवा त्यास अतिथियज्ञ म्हणावें.

**पितृयज्ञ**—म्हणजे जीवमान मातापितादि वडीलधाऱ्या माणसाची सेवा होय. तीं जेवल्यावाचून आपण न जेवणें, त्याच्याशीं मधुर भाषण करणें, त्यांची शुश्रूषा करणें इत्यादि प्रकारें कौटुबिक व सामुदायिक पद्धतीनें ह्या पितृयज्ञाची सिद्धि होत असते.

**नैमित्तिक कर्मे—**

याशिवाय दर पौर्णिमा-अमावास्येस पक्षयज्ञ करावा. रोजचें अग्निहोत्र झाल्यावर स्थालीपाक तयार करून ओ३म् अग्नये स्वाहा० इत्यादि तीन मन्त्रांनीं तीन आहुति द्याव्या नंतर पूर्वोक्त व्याहृति, आज्याहुति चार द्याव्या. ज्याच्या घरी रोजचे अग्निहोत्र नसतें त्यानीं पक्षयागाच्या दिवशीं तरी सामान्य विधीप्रमाणें अग्निकार्य करावें त्याच-प्रमाणें ज्या दिवशीं नवान्न येईल त्या दिवशीं नवसस्येष्टि आणि संवत्सराचा आरंभ होतो त्या दिवशीं संवत्सरेष्टि करावी ज्या दिवशी मनास प्रसन्नता वाटेल तोच शुभदिन समजावा. त्या दिवशीं गावाबाहेर यज्ञमंडप घालून सामान्य विधि व त्यानंतर आघारावाज्यभागाहुति, व्याहृत्याहुति आणि अष्टाज्याहुति द्याव्या. नंतर कार्यकर्त्यानें ओ३म् पृथिवी द्यौः [पार०, २।१७] मंत्रांनीं प्रधान-होमाच्या पांच आज्याहुति देऊन ओ३म् सीतायै स्वाहा इ० [पा०, २।१७] चार मंत्रानीं चार व स्विष्टकृत देऊन पुन्हा वरील बारा आहुति द्याव्या व मग वाम देव्यगान, ईश्वरोपासना, स्वस्तिवाचन आणि शान्तिप्रकरण होऊन यज्ञ समाप्त करावा

आर्यांचे सण आणि वार्षिक उत्सव हेही नैमित्तिक कर्मांपैकींच विधि आहेत, पण त्यांचा विचार या भागात न करिता पुढें करू.

---

## प्रकरण सोळावें

# व्यक्तिमाहात्म्य आणि कार्य

इन्द्र वर्धन्तो अप्तुरः कृण्वन्तो विश्वमार्यम्
अपघ्नन्तो अराव्णः ॥ —ऋग्वेद०, ९।६३।५.

"प्रभूचें यश वाढवीत, प्रशस्त कर्में करीत, सर्व जगाला आर्य बनवून हिंसकाना दूर करा"

नव युग धर्म–मालेपैकी "नव वैदिकधर्म किंवा आर्यसमाजाचा विवेचक इतिहास" या पुस्तकाचा उपसंहार आर्यमतसमीक्षा ह्या तिसऱ्या भागात व्हावयाचा आहे अर्थात् ह्या पहिल्या भागाच्या अखेरीस उपसंहारादाखल कांहीं लिहिणें अप्रस्तुतच होईल तरी पण या भागाचा समारोप करणें हेंही क्रमप्राप्त असल्यामुळें श्रीमद्दयानंद यांचे व्यक्तिमाहात्म्य आणि कार्य याची त्रोटक माहिती देऊन या भागाची पूर्तता करावी हेंच उचित दिसतें

कोणत्याही ऐतिहासिक विवेचनात ऐतिहासिक व्यक्तींचें गुणदोषविवेचन येणें स्वाभाविकच असते आमच्या ह्या नवयुगधर्ममालेचा मुख्य उद्देश निरनिराळ्या धर्मपंथाचा तुलनात्मक दृष्टीने विचार करून तात्त्विक विवेचन करणे हाच जरी असला तरी त्यामुळेच त्यात व्यक्तिविषयक भाग येणें अपरिहार्य झालें आहे कारण नवधर्मपंथाचा व त्याच्या संस्थापकाचा नेहमींच जिव्हाळ्याचा संबंध असून त्या व्यक्तीच त्या धर्मापेक्षां त्याच्या अनुयायांना अधिक मार्गदर्शक व ध्येयरूप झालेल्या असतात त्याचप्रमाणे धर्मपंथाचा सर्व तऱ्हानीं विचार करतांना, ज्याच्या कर्तृत्वाची छाप त्यांच्या इतिहासावर व रचनावर पडली आहे, त्या थोर व्यक्तींविषयीं विवेचन करणे जरूर होते निदान आधुनिक हिंदुस्थानांतील धार्मिक चळवळीच्या बाबतीत तरी हे अतिशय खरे आहे जसें, राष्ट्राचा इतिहास म्हणजे त्यांतील संस्थांचा इतिहास, तसेच धर्माचा, धर्मपंथाचा किंवा कोणत्याही संस्थांचा इतिहास म्हणजे त्यांतील जीवनभूत अशा प्रेरक व्यक्तींचाच इतिहास होय. म्हणूनच अशा ऐतिहासिक विवेचनांत व्यक्तींचें विवेचन करणें जरूर पडतें; फक्त

त्यांच्याविषयीं व त्यांच्या कार्याविषयीं सहानुभूति व आदर ठेवून तें केलें, म्हणजे ग्रंथकारानें आपलें कर्तव्य योग्यप्रकारें बजावलें असें होतें.

सांप्रदायिक लेखकांच्या लेखांत स्वाभाविकच त्यास मान्य असलेल्या व्यक्तीं-च्या गुणांचा उत्कर्ष दाखविला जाऊन दोषाकडे दुर्लक्ष होतें इतकेंच काय, पण संप्रदायाच्या बाहेरच्या लेखकासही परसांप्रदायिक पुस्तकांची प्रस्तावना अथवा परसांप्रदायिक पुढाऱ्याचा मृत्युलेख लिहिण्याचा प्रसंग आला असता, तो फार तर आपल्या मतभेदाचा नुसता उल्लेख करून जास्त टीका करण्याचे टाळतो. हा एक शिष्टाचार आहे पण विवेचक ऐतिहासिक लेखनात तोच शिष्टाचार पाळणें सर्वस्वीं कसे अशक्य होतें, हें सुज्ञ वाचकांस सागावयास नकोच.

केवळ व्यक्ति या दृष्टीनें पाहतां दयानद हे काही सामान्य पुरुष नव्हते. विषय-सुखाकरितां आपला जन्म नव्हे अशी वृत्ति बाळपणापासून अखेरपर्यंत बाणलेले असे थोर पुरुष विरळा श्रीसमर्थ रामदास याची उपमा दयानदास आम्ही मागें दिलीच आहे ह्या उभयताच्या आचारात बरेच साम्य दिसतें दोघाच्याही वृत्तीत लहानपणीच प्रौढपणा आलेला दिसतो बळदात बसून विश्वाचें कोडें उलगडीत बसणाऱ्या बाल रामदासाच्या डोक्यातील प्रौढ विचाराप्रमाणे, दयानदाची बहीण आणि चुलता हीं त्याच्या डोळ्यादेखत गेलेली पाहून दयानदाच्या पुढेंही गभीर विचारतरग उभे राहिले त्यानतर विवाहशृखलेचे वे पुरे गुफून होण्याऱ्या आतच घरांतून निसटून जाण्यात दोघानींही अलौकिक मनोधैर्य दाखाविलें पुढें अन्न आणि वस्त्र याशिवाय हिमालयातील दुर्लंघ्य वर्फाच्या कड्यावरून फुटून भेगाळले-ल्या पायानी तत्त्वजिज्ञासेसाठीं भटकणाऱ्या दयानदाचे वर्णन वाचले,कीं जलचरानीं मांसाचे लचके तोडल्यामुळें अस्थिपजर राहिलेली, नदीच्या प्रवाहात जपयज्ञ करणारी श्रीसमर्थांची मूर्ति डोळयासमोर येते पूर्ववयात इतके असह्य ताप सहन करूनही या दोघां योग्यांनीं कमावलेलें शारीरिक बल मोठमोठ्या बलिष्ठाचीही रग जिरवील असें होते. त्याच्या नुसत्या हुकारानींच सामान्य लोकाची गाळण उडे राव कर्णसिंह तलवार घेऊन अगावर धावून आला असतां त्याची तलवार हिसकून तिचे दोन तुकडे करून टाकताना दयानदानीं जे विलक्षण अवसान आणले तेंच उग्रस्वरूप समर्थांनीं एक दिवस कपाळी मळवट भरून हातांत नंगी समशेर घेऊन आणल्याचें वाचकास ठाऊक असेलच. समर्थांची उंच कुबडी आणि दयानंदांचा बडगा पाहून हिंस्रपशूही पळून जात, दोघांचेंही ब्रह्मचर्याचें

तेज आणि बल झांकलें जात नसे. ब्रह्मचर्यव्रताचें सामर्थ्य दाखविण्याकरितां दयानंदानीं एकदा एका राजाच्या दोन घोड्यांच्या गाडीचें चाक हातांनीं धरलें तर गाडी जागची हालू दिली नाहीं. वादविवादाच्या वेळीं प्रतिपक्षावर छाप टाकताना राजा राममोहनाप्रमाणें दयानदाची धिप्पाड शरीरयष्टि फार परिणामकारक होई. वारा, ऊन, पाऊस अशा महाभूताच्या जरबेलाही ते दाद देत नसत कोणतेंही लहानमोठें काम स्वताच करण्यास त्याची तयारी असे. चाळीशीच्या घरात गेल्यावरही त्यानीं गुरुगृहीं झाडण्या–पाणी भरण्यापासून काबाडकष्ट केले. तसेंच एकदा त्याच्या पाठशाळेची भिंत पडल्यामुळें त्याच्या विद्यार्थ्यांना त्रास होई असें पाहून त्यानीं स्वताच सामान जमवून आपल्या हातानें शाळेचा कूड घालून दिला. स्वावलबन हें दोघांच्याही ठिकाणी मूर्तिमत दिसून येतें असल्या स्वैर आणि फटिंग वृत्तीच्या पुरुषाच्या ठिकाणीं काहीं विलक्षण तलफीही असतात. समर्थांना विड्याची मोठी तलफ होती त्याबद्दल त्यांच्या दतकथा आहेत त्याचप्रमाणें दयानंदाना भागेची तलफ फार होती. एकदा भागेच्या निशेंत ते रात्रीं एका शिवालयात गेले. तेथील धातूच्या पोकळ नदींत कोणी एक मनुष्य निजला होता. त्यास हुसकावून दयानदाची स्वारी आत घुसली व निजली. पुढें प्रातःकाळीं एका भाविक वृद्ध बाईनें दहीभाताचा नैवेद्य नदीपुढें ठेवला त्या दिवशीं बाईवर नंदी प्रसन्न होऊन त्याच्या अतरातील खऱ्या खुऱ्या जीवात्म्यानें तो सारा गट्ट केला! तेव्हा त्याची निशा उतरली! रात्रीं त्या निशेंत त्यांना आपल्यासंबंधीं शिवपार्वतीसवादाचीं स्वप्नें पडत होतीं. पण त्याचा विचार करण्याइतके ते भोळे राहिले नव्हते.

समर्थ रामदासाचा एकांतवासासाठीं घळींत जाऊन बसण्याचा प्रघात असे. त्याप्रमाणें दयानंदही अपरात्रीं उठून लांब कोठें एकातवासासाठीं जात असत. त्या वेळीं त्यांचा मागोसा काढीत त्याच्या चालीनें कोणीं जाऊ म्हटलें तर तें अशक्य होई. कधीं कधीं ते आपली खोली बंद करून तेथेंच योगाभ्यास करीत. अशा एका प्रसंगीं हे खोली लावून आंत काय करितात तें फटींतून चोरून पाहणारे एक शिष्य समर्थांप्रमाणें दयानंदासही भेटले तेव्हां त्यांचें योगासन जमिनीपासून वर अधांतरीं गेलेलें पाहून ते शकेखोर चिकित्सक मनांतच विरमले. दयानंदांजवळ हरल्यास जिव्हाच्छेदनाकरितां हातांत सुरी घेऊन आलेले रामस्वामी मिश्र म्हणजे समर्थांच्याकडे गळ्यांत चाकूचें पातें अडकवून दिग्विजयार्थ

गेलेल्या सदाशिवशास्त्र्याचाच एक नमुना होय. समर्थांच्या वेणाबाई आणि कल्याण यांच्या जागा भरून काढण्यास दयानंदांच्या अनुयायांत पं० रमाबाई आणि पं० गुरुदत्त हीं विशेष बुद्धिमान् माणसें होतीं पण पंडिताबाईचें प्रारब्ध वेणाबाईपेक्षां फारच खडतर निघाले आणि गुरुदत्तांचा दैवयोग कल्याणस्वामींच्या योग्यतेचा ठरला नाहीं! श्रीसमर्थ आपल्या आईस, आपल्या बंधूंस व पुतण्यांस विसरले नाहीत त्यांची पूसतपास करून त्यांच्याही कल्याणाची आस्था त्यांनीं बाळगली, पण दयानदांनीं जें एकदा घर सोडले तें पुन्हा त्यांनीं घराचे किंवा घरांतील मडळींचें नावही काढले नाही व कोणाची वास्तपुस्तही घेतली नाहीं. दयानंद म्हणत कीं, मी माझ्या आईबापांची अवज्ञा केली या पापामुळे माझें कार्य माझ्या पश्चात् योग्य तऱ्हेनें पार पाडील असा सत्पुत्र अर्थात् सच्छिष्य मला कोणी लाभणार नाहीं!

श्रीसमर्थांप्रमाणें दयानंदांचा स्वभाव कठोर तसाच क्षमाशील, गभीर तसाच विनोदी, आणि आग्रही तसाच मनमिळाऊही होता त्याच्या सार्वजनिक चरित्रास आरंभ होण्यापूर्वी कडकडीत ब्रह्मचर्य, तप आणि तीर्थाटन यात उभयतांच्या वयाचीं पहिलीं छत्तीस वर्षे गेली भक्तियोग आणि पातंजलयोग इतका त्यांच्या साधन मार्गात मात्र फरक मानतां येईल. श्रीसमर्थांचे सद्गुरु त्यास पूर्वीच लाभल्यामुळे ते सत्पुरुषाच्या शोधात नव्हते पण दयानदांच्या तीर्थाटनात गुरूचा लाभ हाच हेतु होता ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे कीं, त्याच्या ह्या पूर्व तयारींत त्यांना ज्यांच्या ज्याच्या सगतीचा लाभ घडला ती सारी मडळी पूर्वपरंपरेंतील असतांनाही स्वामींनीं कधींही त्यांची निंदा केलेली नाहीं त्यास ओखी मठाचे महत आणि एक ठिकाणचे वाममार्गी हे केवळ अपवादभूत होत. तसेंच ह्या सत्संगतींत महाराष्ट्रीय पंडितांची आणि संन्याशाची संगतिही बरीच प्रभावशाली झाली हेंही लक्षात घेण्यासारखें आहे. त्यास चतुर्थाश्रम देणारे पूर्णानद, त्यास व्याकरण शिकविणारे कृष्णशास्त्री, तत्त्वज्ञानाच्या अभ्यासास साहाय्यभूत झालेले जोशीमठातील सन्याशी हे सारे महाराष्ट्रीय ब्राह्मण होते.

रामदास आणि दयानद ह्यांच्या पूर्ववयांतील अत्यत खडतर तपश्चर्येनंतर निराशेनें त्या दोघांनींही देहत्याग करण्यास तयार व्हावें हें थोडेंसें विलक्षण दिसतें. ईश्वराच्या नियतीच्या मुशींत शुद्ध झालेल्या बावनकशी सोन्यास आपला पुढें

कोणता अलंकार होणार आहे, याची कल्पनाही नसावी असाच हा प्रकार दिसतो. पुढें ज्यांनीं अनेक मठ व समाज स्थापन करून लोकसंग्रहाचें विस्तृत कार्य केलें, दासबोध आणि सत्यार्थप्रकाश लिहून लोकांसाठीं एकेक धर्मग्रंथ निर्माण केला, आणि मूळ एकाच राजवंशांतील रायगड आणि चितोडगड येथील क्षत्रियकुलावतंसांचे मुगुट ज्यांनीं आपल्या पायीं नमविले, त्यास आपल्या जीवितकार्याची स्पष्ट दिशा अगोदर कळली नव्हती किंवा त्यांनीं ती ठरविली नव्हती, असेंच म्हणावें लागतें. श्रीमच्छंकराचार्य यांचें जें चरित्र उपलब्ध आहे त्यावरून त्यांच्यासंबंधानें मात्र असें म्हणता येत नाहीं. शंकराचार्यांच्या ठिकाणीं जी लोककल्याणाची आस्था होती ती समर्थ व दयानंद यांच्या ठिकाणीं पूर्ववयांतही कदाचित् असेल तशा त्यांच्याही आख्यायिका प्रसिद्ध आहेत. परंतु हें लोकोद्धाराचें कार्य मीं करावें व मी तें करीन असा दृढ आत्मविश्वास त्यांच्या ठिकाणीं अगोदर नसला पाहिजे. एरव्हीं त्यांची निराशेची मीमांसा लागत नाहीं. श्रीसमर्थ रामदास किंवा दयानंद हे स्वयंस्फूर्तीनें लोकसंग्रहाच्या कार्यास लागले असें म्हणवत नाहीं ते दोघे आत्मघातास तयार झाले तोंपर्यंत ते आपल्याच व्यवधानांत गर्क होते. लोकांच्या दुःस्थितीचा अनुभव घेण्यास त्यांस अवसरही मिळाला नव्हता. समर्थ तर तपस्याच करीत होते आणि दयानंदही जनसमर्दा-पासून दूर पहाडावरून किंवा नदीकिनाऱ्यानीं जंगलांतूनच साधूंच्या शोधार्थ हिंडत होते. त्यांचे आत्मघाताचे विचार लोकस्थितीला पाहून विटल्यामुळें किंवा दुःखी झाल्यामुळे उत्पन्न झालेले नसून साधकावस्थेंतील अत्यंत निराशेची ती एक भूमिका होती साधुवर्य तुकाराम आणि श्रीरामकृष्ण परमहंस असेच निराश होऊन जीवावर उठल्याचें प्रसिद्धच आहे. निराशेनें व्याप्त होऊन अगदींच निष्क्रिय बनलेले हे दोघे महापुरुष पुढें अत्यंत उज्ज्वल असे पुरुषार्थ—वादी बनले. याचें कारण त्यांच्या तुंबलेल्या महत्त्वाकांक्षेला किंवा प्रचंड कर्तृत्वशक्तीला पाट फोडून वाट काढणारा तसाच समर्थ कोणी भेटला असला पाहिजे. श्रीसमर्थांना प्रभुरामचंद्राचा साक्षात्कार झाल्याचें त्यांच्या चरित्रांत आहे. अवतार न मानणाऱ्या दयानंदांस स्वामी विरजानंद भेटले. स्वामी विरजानंद हे अत्यंत एककल्ली, विलक्षण महत्त्वाकांक्षी आणि फारच आग्रही होते. त्यांनीं एकदा एका महत्त्वाकांक्षी राजाला असें सांगितलें कीं, " तीन लाख रुपये खर्च करून त्यांनीं एक विद्वत्सभा भरवावी. त्या सभेंत आर्षग्रंथ हेच केवळ प्रमाणभूत कसे

आहेत व इतर सारे ग्रंथ कसे खोटे आहेत हें मी सिद्ध करीन. त्या योगानें तुझी विक्रमादित्याप्रमाणें कीर्ति होऊन तुझ्या नावाचा संवत् सुरू होईल." ही न होणारी गोष्ट पुढें घडली नाहीं, ही गोष्ट वेगळी, पण दयानंदांच्या गुरूचा स्वमताबद्दल अभिनिवेश, आणि महत्त्वाकाक्षा किती अमर्याद होती याची यावरून कल्पना होते. दयानदाचा स्वभावही या वृत्तीस अनुकूलच होता यामुळे सूर्यास प्रेरणा करण्यास सूर्यकांतमणि लाभावा असा योग येऊन जो अग्नि प्रदीप्त झाला, त्यानें मतमतांतराचे गठ्ठे कापसाप्रमाणें पेटविण्यास सुरुवात केली.

श्रीसमर्थांनीं मतमतांतरातील फोलपणा दाखविण्यास कमी केलें नाहीं. पण कर्मसंगी जे अज्ञानी जीव त्याचा सहसा बुद्धिभेद करू नये, त्याचप्रमाणें आडदांड जे मुसलमानभाई त्याचाही विरोध बुद्ध्या वाढवू नये, तर ठायीं ठायीं जीं कार्यकर्तीं माणसें असतील त्यास हुडकून काढून त्यास गुपचूप कार्यास लावावें, असा सर्वांविषयीं फार सावधपणाचा मार्ग समर्थांचा होता. दयानदाचा लोकोद्धाराचा मार्ग याहून अगदीं भिन्न होता तो व्याघ्रमुखी होता. असेंही म्हणतां येईल कीं, हिंदु शरिरातील विकार सूक्ष्म प्रमाणांत होते तोंवर सौम्य उपाय चालले, पण हिंदभूचें माथें बिघडून अगदींच शुद्धि गेल्यावर तेथें डागण्यावांचून इलाज राहिला नाहीं. पण आम्हांला ही कारणमीमांसा पटत नाहीं. दयानंदांना जे लोक अनुकूल झाले व जे प्रतिकूल राहिले, त्यांचीं कारणें वेगळीं असावींत. त्याचा सविस्तर विचार पुढें करू. थोडक्यांत आम्ही इतकेंच म्हणतों कीं, समर्थ आणि दयानद हे दोघेही जीवाचा अंत करण्यास तयार झाले ते पुढे केवळ लोकोपकाराकरितांच उरले, ही गोष्ट खरी, पण दोघांचे प्रेरक भिन्न गुणांचे मिळाल्या मुळें दोघाचे मार्ग भिन्न झाले. विरजानंदांनीं दयानदांस आशीर्वाद दिला कीं " दयानंद, तुझ्याशीं कोण काय वाद करणार ! तू तर कालजिव्ह आहेस. कालाप्रमाणेंच तुझा तर्क सर्वत्र विजयी होईल." याप्रमाणे अखेर स्वामी विरजानंद या गुरूची आज्ञा त्यास मार्गदर्शक झाली. आणि त्या आज्ञेंतच त्यांच्या पुढील यशापशाचें बीज रुजले गेलें.

हे दोघेही पुरुष लोकसंग्रहाचे कार्यास लागल्यावरही त्यांच्या विचारांत फरक पडत गेला असावा असे दासबोध आणि सत्यार्थप्रकाश यांच्या सुधारून वाढविलेल्या आवृत्तीवरून दिसून येतें. स्वता आदित्य ब्रह्मचारी व अत्यत संन्यस्त वृत्तीचे असूनही त्या दोघांनींही जनतेस आधीं प्रपंच करावा नेटका त्याच पुरुषार्थवादाची घोषणा केली.

आपल्या समकालीन ब्राह्मणवर्गावर ह्या दोन्ही पुरुषांनीं टीका केली, आणि शास्त्र्यांचे गर्वपरिहारही दोघांनीं केले. तथापि दोघांसही गोब्राह्मणधर्मप्रतिपालक किंवा त्यांचे गुरु असेंच म्हणावें लागेल समर्थांच्या मठस्थापनेंत आणि दयानंदांच्या चातुर्वर्ण्यरचनेंत धर्मसंशोधनाची आणि धर्मरक्षणाची जबाबदारी त्यांनीं विशेषेंकरून ब्राह्मणांवरच टाकलेली आहे तसेंच ब्राह्मण हे जन्मतः असोत किंवा गुणकर्मानें ठरोत, पण ब्राह्मणवर्णाचें श्रेष्ठत्व दयानदांनीं अवमानिलें नाहीं. तात्पर्य, दयानद हे ज्या ब्राह्मणविद्येचेंच फल होते त्या ब्राह्मणविद्येचाच त्यांनीं पुरस्कारही केलेला आहे त्यांनी केलेली ब्राह्मणांची निंदा त्यास त्यांच्या कर्तव्याची जागृति व्हावी एवढ्याचसाठीं आहे त्यांची पायमल्ली व्हावी अथवा त्यांनीं अस्पृश्याच्या पंक्तीस यावें यासाठी खचित नव्हे आतां समर्थांस जसे ब्राह्मण महंत आणि स्वयसेवक मिळाले तसे दयानदांस त्यांच्या मतवैचित्र्यामुळें मिळाले नाहींत हा कांहीं अंशी देशकालाचाही महिमा असूं शकेल परंतु स्वामी विशुद्धानंद आणि बालसरस्वतिप्रभृति ब्राह्मणानीं माझ्या अंगीकृत कार्याची पूर्तता करावी असे दयानद यांच्याही मनात फार होतें

त्याचप्रमाणे इस्लामी सस्कृतीचे हिंदुधर्मावर होत असलेलें आक्रमण बंद करावें हा जरी उभयतांचा एक मुख्य हेतु होता तरी प्रत्यक्ष मुसलमानांशीं त्यांनीं वैर केलें नाहीं रहिमखानाच्या कोठींत लाहोरच्या आर्यसमाजाची स्थापना व्हावी आणि सज्जनगडावर समर्थांच्या समाधीसमोर मुसलमानांच्या पीराचीही धूपदीपाची व्यवस्था त्यांनीं लावावी, ह्या दोनच गोष्टी वरील वृत्तांच्या पुरेशा निदर्शक आहेत अर्थात् मुसलमानी धर्मावर प्रत्याक्रमण करण्याचा उद्योग जसा समर्थांनीं केला नाहीं तसाच तो दयानदांनाही फारसा अभिप्रेत नसावा असें आम्हांस वाटतें ज्यास वैदिक तत्त्वज्ञान पटेल त्यास आर्यसमाजांत दाखल होण्यास हरकत नसावी या विचाराचे ते होते खरे. पण इतरांचें धर्मांतर घडवून आणण्याचा आर्यांनीं एक उद्योगच आरभावा अशा मताचे ते असतील असें वाटत नाहीं. कारण तसे ते मनांत आणते तर पुढील शुद्धि चळवळीचे एक प्रमुख प्रवर्तक स्वामी श्रद्धानंद यांच्यापेक्षांही त्यांची छाप नव्या जुन्या मुसलमानांवर अधिक पडली असती.

श्रीमच्छंकराचार्यांशीं दयानंदांची तुलना करतांना दयानंदांपुढील कार्य अधिक कठीण होतें, असें आर्य लेखक दाखवितात. कारण, शंकराचार्यांच्या



दयानंदांच्या गुरुकुल-कल्पनेचे आधुनिक मूर्तस्वरूप.—स्थापना इ सन १९०२.

वेळीं राजसत्ता हिंदूंचीच होती. तसेंच आचार्यांचे प्रतिस्पर्धी कट्टे वेदनिष्ठ, बुद्धिमान् आणि समजुतदार होते. पण या दृष्टीनें पाहतां समर्थांचें कार्य फारच अवघड ठरतें. कारण त्यांच्या वेळची मोगलशाही इंग्रजी सत्तेप्रमाणें सौम्य आणि उदासीन नव्हती. तात्पर्य, औरंगजेबाच्या कडव्या कारकीर्दीत बिनबोभाट हजारों मठ स्थापन करणें किंवा मडनमिश्रादि महा आग्रही आणि अतिविद्वान् पडितास शास्त्रार्थांत जिंकून आपले कट्टे अनुयायी बनविणें, असें यश इंग्रजांच्या शांततेच्या राज्यांत दयानंदास मिळाले नाही दयानंदांचे जे शेकडो शास्त्रार्थ झाले व व्याख्याने झाली, त्यांचा परिणाम श्रोतृसमाजावर थोडा-फार झाल्यावांचून राहिला नाहीं पण त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांची समजूत पटून ते त्यास येऊन मिळाले असेही फारसे झाले नाही याचे कारण हिंदु पडिताच्या मनाचा सकुचितपणा आणि दुराग्रह असे आर्यलेखक मानतात हिंदु पंडिताच्या-पेक्षां जास्त व्यापक आणि उदार कल्पना असणारे ख्रिस्ती, मुसलमानी, ब्राह्म आणि थिऑसफिस्ट ह्या धर्मसुधारकांशीं सहमत करण्याचाही त्यांनी थाट घातला पण समर्थ-पचकाप्रमाणे हे दयानद सुधारक-पंचकही सिद्ध झालें नाही.

मुख्य हरिकथानिरूपण । दुसरे ते राजकारण। तिसरे ते सावधपण । सर्वविषयीं ॥१॥ ही समर्थांच्या यशाची गुरुकिल्ली होती अर्थात् दयानदांस यावें तितकें यश कां आले नाही याचेंही उत्तर यांतच आहे. मूर्तिपूजकांचें अज्ञान आणि अनेक मतमतांतरें आणि धार्मिक थोतांडें यांजवर समर्थांनींही कोरडे ओढण्यास कमी केलें नाहीं. पण जनस्वभावाचें सूक्ष्म अवलोकन करून त्यांनीं सगुण रक्षून निर्गुण सांगितले जाखाई, जोखाई हीं दैवतेंही राखलीं पाहिजेत असें त्यांनीं ठरविले आणि योग्य अधिकारी साधकाजवळ "जे झालेंचि नाहीं । त्याची वार्ता पुसशी कांई ? ॥" येथपर्यंत मिथ्यावादाची मजल त्यांनीं नेली. अज्ञानी जनता आणि ज्ञानी तत्त्वज्ञ या दोन्ही पक्षांस समर्थांची शिकवण पटली. पण हीं दोन्ही टोकें सोडून दयानंदांनीं अंगिकारलेला मध्यम मार्ग—कांहीं अपवादभूत वर्ग सोडून—बहुजनसमाजासही पटला नाहीं, आणि बहुतेक पंडितांसही मान्य झाला नाहीं. हा अनुभव फार महत्त्वाचा आहे.

अनाथ आणि हिंदुजनतेने तिरस्कृत केलेला एक वर्ग ज्याप्रमाणे परधर्मीच्या गोटांत सहज जाऊन मिळतो, त्याप्रमाणे उत्तर भारतांतील बराच मोठा वर्ग देशकालपरिस्थितीनें ब्रह्मक्षत्रतेज मावळत चालल्यामुळें दिङ्मूढ-निराधार आणि

विस्कळित होत चालला होता. तो दयानदांनीं आपल्या प्रभावशाली वक्तृत्वानें आणि योग वैराग्याच्या बळानें आपल्या झेंड्याखालीं ओढला. त्यात कित्येक आधुनिक विद्वान्‌ही चमकताना दिसू लागले, देशहिताची खरी कळकळ बाळगणाऱ्या न्यायमूर्ति माधवरावजी रानडे याना ज्याप्रमाणे सामाजिक परिषद् फार सोयीची झाली, त्याप्रमाणे त्याना आणि उत्तर हिंदुस्थानातील तत्समवृत्तीच्या अनेक अमलदाराना आणि विद्वानाना दयानदाचा आर्यसमाज फार सोयीचा झाला यामुळे आधुनिक पदवीधराच्या हातीही स्वधर्मनिष्ठेचे नाणे फार खेळू लागलेसे दिसलें खरे, पण बारकाईने पाहता ह्या नाण्यावर स्वदेशाभिमानाचा ठसा जसा स्पष्ट दिसे, त्याप्रमाणे वैदिकधर्मनिष्ठेचा मुखवटा स्पष्ट दिसत नव्हता याचे स्पष्टीकरण पुढे सविस्तर व्हावयाचेंच असल्यामुळे येथे ही गोष्ट नुसती नमूद करूनच पुढे गेलेले बरे

न्यायमूर्ति रानडे, शामजी कृष्णवर्मा, लाला मूळराज प्रभृति अनेक बहुश्रुत आणि मुत्सद्दी अशा आधुनिक विद्वानांच्या सगतीमुळे देशोन्नतीकरता कोणकोणत्या मार्गाचे अवलबन केलें पाहिजे, याचा दयानदानी आधुनिक पद्धतीनेही विचार केलेला दिसतो जर्मनीतील वास साहेब, अमेरिकेतील थिऑसफिस्ट, इग्लंड मधील शामजी कृष्णवर्मा, याच्याशीं त्याचा पत्रव्यवहार सुरू असे. त्याच्या मनोभूमिकेत एका बाजूस स्वामी विरजानद यानी आर्षग्रथ व यौगिक अर्थपद्धति या स्तभावर जडलला वेदनिष्ठेचा कडक धर्मोद्धार दडक आणि दुसऱ्या बाजूस भौतिक विज्ञान आणि समतावाद या खाबावर आधारलेला आधुनिकाचा देशोद्धार दडक, या समातर दडकावर त्याच्या बलिष्ठ तर्काने जी अपूर्व बौद्धिक कसरत केली, ती विसाव्या शतकातील आबालवृद्धास आणि स्त्री-पुरुषास अनुकरण करण्यास कितपत लाभ हानिकारक झाली व पुढे होईल हा फार विचार करण्यासारखा प्रश्न आहे

एकोणिसाव्या-विसाव्या शतकातील पाश्चात्य भौतिक विज्ञानाने लज्जित झालेले वैदिकाचें मुख दयानदाच्या यागिक अर्थपद्धतीने उज्ज्वल केले यास्तव दयानदानी आपल्या हयातींत ही एकच गोष्ट केली असती तरी ती त्याची कीर्ति अजरामर करण्यास पुरेशी होती. ' तसेंच हिंदूच्या हातात वैदिक-संहिता हा ईश्वरनिर्मित एकच ग्रंथ देऊन त्यानीं प्रतिस्पर्धी कुराणवाल्या आणि बायबलवाल्या परधर्मीयांपुढें अभिमानानें छाती वर करून चालण्यास हिंदूस समर्थ केलें,

असें आर्य लेखक मानतात. तसेंच असेही म्हणतां येईल कीं, स्वावलंबन, स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य ही राष्ट्रीय सभेची अखेरची चतुःसूत्री, आणि अहिंसा, अस्पृश्यतानिवारण व असहकार ही महात्मा गांधींची अलिकडील स्वराज्य-प्राप्तीची उपाययोजना, दयानंदांच्या आचारविचारांत राष्ट्रीय सभेचा जन्म होण्या पूर्वीही दिसून येत असे दयानंदांचे सारे जीवनच स्वावलंबनाचें होतें. स्वदेशी-बद्दल त्यास जबरदस्त अभिमान असे एखाद्या वस्तूकरिता जे प्रांत पूर्वीपासून प्रसिद्ध आहेत, त्या ठिकाणी ती वस्तु कोणी विलायती आणून दिल्यास त्यांना फार राग येई कपड्याचा देशी रिवाज सोडल्याबद्दल ब्राह्मणावरही त्यांचा मोठा रोष असे. साऱ्या शिक्षणक्रमांत पूर्वीची शास्त्रप्रणाली आणि वैदिक स्वत्व कायम ठेवण्याबद्दल तर त्यांचा पराकाष्ठेचा हेका दिसतो देशी भाषेला त्यांनी शक्य तितकें उत्तेजन दिले त्यांचे शिक्षणासंबंधी विचारही राष्ट्रीय अभिमानाने भारलेले होते भौतिक विज्ञान येथील विद्यार्थ्यांनी शिकून तयार व्हावे म्हणून त्यांनी जर्मनीत पत्रव्यवहार सुरू केला होता अगदी अलीकडील भौतिकशास्त्रेंही वेदमूलक मानून शिकवावीं, असा त्यांचा बाणा दिसतो त्यांची शिक्षणाची शिस्तही सक्तीचीच होती स्वराज्य हा शब्द तर आजच्या अर्थाने प्रथम त्यांनीच उपयोगांत आणला असे म्हणतात. पहिली गोरक्षणाची सभा हें त्यांच्या अहिंसेचे द्योतक आहे. त्यांच्या संस्कार-विधींतही अहिंसेचे व्रत आरंभींच अंगीकारलेलें असतें. यज्ञकार्यांत लागणारा मधही मधमाशांना न मारतां मिळविलेला असावा असें संस्कारचंद्रिकाकार सांगतात क्षत्रियांचा क्षात्रवृत्ति कायम राहण्याकरित त्यांनीं फक्त हिंस्रपशूंची शिकार करावी असे तें म्हणत ते शाकाहाराचे कडक पुरस्कर्ते होते. त्यांच्या जीवदयेचें उदाहरण म्हणून एक गोष्ट अशी सांगतात की, एकदा एक बैलांची गाडी चिखलांत रुतली असतां गाडीवान बैलांना हाकलण्याकरितां बेदम मारू लागला, तेव्हां त्यास मनाई करून स्वामींनी गाडीचे बैल सोडले आणि गाडीचें जोखड आपल्या खांद्यावर घेऊन त्यांनीं ती गाडी चिखलांतून बाहेर काढली ! ते व्याख्यानास उभे असतां टवाळ लोकांकडून त्यांच्या अंगावर अनेक वेळां दगड येत. एकदा तर त्यांच्या डोक्याला खोकही पडली, पण त्यांनीं जखमेंतून वाहणारें रक्त तसेंच छाटीनें पुसून आपलें भाषण पुढे चालविलें त्यांना जीवें मारण्याचा प्रयत्न करणारावरही त्यांनीं कधीं हत्यार उपसलें नाहीं. त्यांची ही अहिंसा भ्याडपणाची नसून मर्दानी स्वरूपाची होती

पतितोद्धार हाही त्यांचा अगदीं जिव्हाळ्याचा विषय होता एकदां त्यांच्या व्याख्यानास आलेले अतिशूद्र कोणी उठवून लावूं लागले. तेव्हां ते म्हणाले कीं, माझीं व्याख्यानें ही खाटकासारख्या अतिशूद्राकरितांचे आहेत एकदां तर एका भाविक न्हाव्यानें आणलेली भाकरी त्यानीं मोठ्या प्रेमानें खाल्ली, अशी दंत-कथा आहे तात्पर्य, अस्पृश्यता त्याना मान्य नव्हती, असेंच बहुधा त्यांचे अनुयायी मानतात. आतां राहता राहिला असहकार दयानंदाचें ज्याच्याशी जमत नसे अशा पुराणमतवाद्यांशीं व इतर मतवाद्यांशीं त्याचा पूर्ण असहकार असे लाला लजपराय तर असे म्हणतात कीं, 'दयानंदांनी कोणती एक गोष्ट सर्वांपेक्षा अधिक टाळली असेल तर ती विरोधकांची सहानुभूति होय !' त्यांच्या या वृत्तीस अनुसरून लालाजी–अर्थात् हिंदु जनतेच्या हितबुद्धीनेंच–आर्यबंधूंस पुढे असेंही बजावतात कीं, या सहानुभूतीच्या मोहास बळी पडून आर्यसमाज हिंदु धर्माच्या महासागरांत नामशेष होणार नाहीं, याबद्दल आर्यांनी फारच खबरदारी घेतली पाहिजे !

दयानंदांचे जरी असे हे राष्ट्रीय बाण्याचे विचार होते, आणि वरील तत्त्वें त्यांच्या आचरणांत जरी दिसून येत, तरी आपला आर्यपथ शक्यतों सर्वांस सुगम व्हावा म्हणून राष्ट्राभिमान आणि गोरक्षण हे त्यांचे जिव्हाळ्याचे विषय त्यांच्या मतव्यात त्यांनी घातले नसावेत त्याचप्रमाणें त्याच्या नावाच्या पुण्याईवर पुढें सुरू झालेल्या शुद्धिचळवळीचें तत्त्वही त्याच्या मतव्यांत दिसून येत नाहीं असें म्हणतात कीं, त्यानीं एका मुसलमानाचा अलखधारी नामक आर्य केला; आणि एका मलकान्याला यज्ञोपवीत दिलें या दोन गोष्टींपलीकडे त्यांनी शुद्धि चळवळीचा पुरस्कार केल्याचें आढळत नाही तारीख १६ एप्रिल सन १८८१ च्या पत्रांत चोबे कन्हयालालजी यांस त्यांच्या प्रश्नास उत्तरादाखल ते असे लिहितात कीं, "मुसलमानादि अन्य मतवाले वैदिकमतानुयायी झाल्यास ते ज्या वर्णाच्या गुणकर्मानें युक्त असतील त्या वर्णांत त्यांस राहतां येईल रोटी बेटी व्यवहारही आपल्या समान वर्णाशीं त्यांनीं करावा आजकालचे आर्यलोक त्यांच्याशीं असा व्यवहार करणार नाहींत, यास्तव त्यांनीं आपल्याच ( अर्थात् पूर्व धर्मांतील ) लोकांत (रोटीबेटी) व्यवहार करावा आणि ( धर्म ) मतमात्र वैदिक राखावें. यांत कोणत्याही प्रकारची हानि होऊं शकणार नाहीं"

दलितोद्धार आणि पतितोद्धार, शुद्धि आणि शिक्षण, जातपाततोडक-मंडळें

आणि गुरुकुले, यासबधीं आर्यसमाजाची आज जी प्रचंड चळवळ आणि खळबळ दिसत आहे, तिचा दयानदांशीं सबध बाप मेल्यावर जन्मास आलेल्या संताना-प्रमाणेच आहे. एखाद्या श्रीमताने प्रचड वाडा बाधण्याचें मनात आणावे आणि मालमसाला तयार झाला नाहीं तोंच मरून जावें, असाच दयानदाचा प्रकार झाला. जुने इमले उखळून आर्यसमाजाचा पाया त्यानी खणला खरा, पण तो पायाही त्याच्या हातून पुरा भरला गेला नाही सर्व मतमतातराचे चिरे एकत्र करून एक मानवजातीसाठीं एकेश्वराचे एक वेदमदिर बाधावे असेही कदाचित् त्यांच्या मनात असेल, पण बेकीची एकी करू पाहणाऱ्यानें तिरकी करावी असा कांही प्रकार होऊन बसला ! सारे चिरे एकत्र जोडण्याकरिता जे सिमेंट तयार करू घातले तेंच अहकाराचें पाणी खाऊन पृथक्त्वाने असहिष्णु होऊन राहिले, असा कित्येक अनुभव सांगतात. परतु आर्यलेखकाचे म्हणणे याहून भिन्न आहे. त्याच्या मतानें असे दिसतें कीं, अखिल मानवकोटीला वैदिक निष्ठेची गवसणी घालू पाहणाऱ्या दयानदाच्या ठिकाणीं असले देशाभिमान, धर्माभिमान, पथाभिमान इत्यादि कप्पे असावे हे कोणास विसगत वाटण्याचे कारण नाही. कारण, दयानदां च्या विशाल ईशप्रेमात मानवी प्रेम आणि राष्ट्रीय प्रेम याचा बेमालूम मिलाफ झाला होता. आम्ही दयानदाच्या मतव्याच्या भाषेतच बोलावयाचें तर वर्णाश्रम आणि विवाह यांच्या व्याख्याच्या द्वारें दयानदांनी मान्य केलेला सामाजिक सुधारणे-चा क्षेत्रविस्तार त्यानी केलेल्या आर्यावर्ताच्या (हिमालय आणि विध्य यामधील प्रात) व्याख्येच्या सकोचांतच मुरला, असेही म्हणतां येईल मात्र आजचे आर्य मुरला असे न म्हणता पुरून उरला असे कदाचित् म्हणतील असो. दयानदाचीं मूळचीं धार्मिक मते परकीय सस्कृतीच्या सस्कारापासून अलिप्त आहेत हीच गोष्ट कोणास महत्त्वाची वाटेल, तर कोणास त्याची मते सर्वसग्राहक आणि व्यापक आहेत ही गोष्ट अधिक भूषणावह दिसेल.

बाबा छज्जुसिग तर अभिमानपुरःसर असें सागतात कीं, साऱ्या मानवी जगाला सघटित करणारा दयानदाच्या आर्यधर्मासारखा दुसरा धर्म नाहीं त्यांच्या मते खऱ्या वैदिकधर्माचे हे महत्त्व इतर तर जाणत नाहींतच, पण हिंदूही आपल्या मूळ धर्माचें स्वरूप अजिबात विसरून गेले आहेत. याच्या-मतें कोणताही धर्म सार्वत्रिक होण्यास, [१] तो धर्म सृष्टीच्या आरंभकाला-पासूनच निर्माण झालेला पाहिजे. कारण, ज्या परमेश्वरानें सूर्य-चद्र-तारे व पंचमहा-

भूतें निर्माण केलीं, त्यानेंच जगाच्या आरंभीं जगाच्या कल्याणासाठीं धर्मही निर्माण केला असला पाहिजे (तस्माद्दचः सामयजूंषि० ॥—मुण्ड० ॥); [२] तो व्यापक, पूर्ण, प्रमादरहित आणि सर्वांशीं त्रिकालाबाधित असला पाहिजे; [३] तो कोणत्याही विवक्षित समाजास उद्देशून नसून अखिल मानवजातीस सामान्यत्वे उपयोगी पाहिजे, [४] त्यांतील तत्त्वे आणि प्रमेयें परस्पर विसंगत असता कामा नयेत आणि [५] त्याचा भौतिकशास्त्रें व मानसशास्त्रें यांशीं विरोध नसावा. हीं पाच लक्षणें दुसऱ्या कोणत्याही धर्मास लागू पडत नाहीत तीं दयानदांनी उद्घाटन केलेल्या एका आर्यधर्मासच काय ती लागतात यामुळें हाच एक धर्म विश्वव्यापि होण्यास समर्थ आहे बाबा छज्जुसिंग याचा हा अंदाज खरा ठरणें कालाधीन आहे तथापि त्यावरून दयानदांच्या चळवळीचें ध्येय किती व्यापक स्वरूपाचें मानता येण्यासारखें आहे, याचा आजही विचार करतां येईल. तो विचार पुढील भागांतून यथाक्रम होईलच

येथपर्यंत दयानद या व्यक्तीचें स्वभावचित्र, त्यांचें सार्वजनिक चरित्र, त्यांचें उद्दिष्ट कार्य, त्या कार्याचें स्वरूप आणि विस्तार म्हणजे एकदरीत दयानंदांचें महत्त्व यासबधी आम्ही ठोकळ रूपरेषा दाखविली आता याचाच थोडा अधिक विस्तार करून दयानदांच्या कार्यासबधी आर्य जगताच्या दृष्टीने कसकसा आढावा निघू शकतो त्याचाही विचार करू

जन हे त्रिविध आहेत स्वामी दयानदांची केवळ निदाच करणारा वर्ग त्यांच्या हयातींत होता तसा तो आजही आहे दयानदांशीं अशत· मतभेद असलेला असा एक उदासीन वर्ग त्या वेळेप्रमाणे आजही आहे आणि तिसरा त्यांची सांप्रदायिक भक्तीने स्तुति करणारा वर्गही पूर्वीप्रमाणे आताही विद्यमान आहे. किंबहुना ह्या तिन्ही वर्गांचे विद्वान् लेखक खास दयानदांच्या अनुयायांत उत्पन्न झालेले आहेत वैराचे उग्र स्वरूप ज्याप्रमाणे भाऊबदकींत सर्वांत अधिक दिसते, त्याप्रमाणेच एखाद्या सप्रदायातून फुटून बाहेर पडलेल्या लेखकाच्या ठिकाणीं त्या सप्रदायाचे पुढाऱ्याविषयीं तुच्छतावुद्धि आणि मतविरोधाची कटुता जास्त तीव्र आढळून येते, व त्याच्यांत तात्त्विक दृष्टीपेक्षा द्वेषविषयक भावनाच जास्त प्रभावी असते. म्हणून आम्हीं वरील वर्गाचे उद्गार तूर्त विचारांत न घेता दुसऱ्या दोन वर्गांतील दयानंदाच्या अनुयायांचे काय विचार आहेत, त्यांचें यापुढें थोडक्यात दिग्दर्शन करणार आहोंत.

सद्गुरु हे ईश्वरापेक्षांही श्रेष्ठ होत, अथवा धर्मसंस्थापक हे साक्षात् ईश्वराचे अवतार होत, ही भाषा ह्याच शब्दांत आर्यसमाजी वापरणार नाहींत, हें उघड आहे. पण जवळजवळ याच परमोच्च पदावर त्यांनीं आपल्या आचार्यांस नेऊन बसविले आहे हेंही, तितकेंच उघड आहे समक्ष डोळ्यासमोर झालेला मृत्यु पाहून वैराग्यानें तपस्येला लागलेले धर्मसंस्थापक गौतमबुद्ध, अनाथांवर दया करणारे जीझस ख्राइस्ट बंधुवाद सांगणारे एकेश्वरवादी महमद पैगंबर अथवा धुरंधर वाद्यांशीं झगडणारे श्रीमच्छंकराचार्य—अशा अनेक उपमा आर्य, चरित्रकारांनीं दयानंदास दिल्या आहेत इतकेंच काय, पण आत्मिक भुकेप्रमाणें शारीरिक भुकेची व्यवस्था लावणारे निराकार एकेश्वराची पूजा हिंदुसमाजांत पुनरूढ करणारे, वेदावर अनन्यनिष्ठा ठेवणारे, परधर्मसमालोचनापूर्वक वेदमूलक सर्वतंत्रसिद्धान्त सांगणारे, स्त्रियास प्रथमच वेदाधिकार देणारे, शूद्रांचा उद्धार करणारे, हिंदूंतील अस्पृश्यता नाहींशी करणारे, लोकहितबुद्धीनें झटणारे, भौतिक विज्ञानास विशेष उत्तेजन देणारे, निष्क्रिय वादास मूठमाती देणारे, डोळ्यादेखत धर्म-धन लुटलें जात असतां आणि अज्ञ स्त्रीपुरुष भ्रष्ट केले जात असतां, उदासीन-तेनें तें सर्व सहन करणाऱ्या त्यागी पुरुषाचा उघड उघड धिक्कार करणारे, पुरुषार्थाचे जबरदस्त प्रेरक, युरोपची यात्रा आणि युरोपची भाषा हीं नवयुगातील मान्यतेची साधने संपादन केलीं नसतांही, येथील रावापासून रंका पर्यंत, अजाणापासून सुशिक्षित सुधारकवर्गापर्यंत, इतकेंच काय, पण विधर्मी आणि विदेशी विद्वन्मंडळीसही मान्यवर झालेले, आणि अखेर धार्मिक संस्थेसही लोक-प्रातिनिधिक स्वरूप देणारे धर्मसंस्थापक आजवर दुसरे कोणीही कोणी झालेले नाहींत, असेंही आर्य अभिमानानें म्हणतात आणि त्यांच्या ह्या अभिमानांत अंशभागी होण्यास आम्हासही कांही संकोच वाटत नाही

स्वदेशाच्या राष्ट्रीय आणि सामाजिक परिस्थितीच्या दृष्टीनें पाहतां स्वामी दयानंद हे एक जाडे समाजधुरंधर होऊन गेले यांत शंका नाहीं किंबहुना खुद्द आर्यसमाजाची स्थापना करतांनाही स्वदेशहिताची भावनाही स्वामी दयानंदाच्या मनांत प्रामुख्यानें असावी असे म्हणण्यास जागा आहे. ही त्यांची वृत्ति व एकंदरीनें निश्रेयसाप्रमाणेंच अभ्युदयाचीही तितकीच आस्था बाळगण्याची दृष्टि त्यांच्या प्रत्यक्ष वागण्यांतही प्रसंगविशेषीं दिसून येत असे आर्य-इतिहासकार श्रीनरदेवशास्त्री ह्यांनीं आपल्या ग्रंथाच्या मुखपृष्ठावर

स्वामींचें एक अवतरण दिलें आहे, त्याचा आशय असा की, 'ज्या देशाच्या पदार्थांनीं आपलें हें शरीर बनलें आहे, ज्याच्या योगानें आज आपलें पोषण होत आहे आणि पुढेंही होणार आहे, त्या स्वदेशाच्या उन्नतीकरितां सर्वांनीं मिळून तन-मन धनानें प्रीतिपूर्वक प्रयत्न केला पाहिजे. आणि यासाठी आर्यसमाज ज्याप्रमाणे स्वदेशोन्नति घडवून आणण्यास कारणीभूत होईल तसा दुसरा कोणताही समाज होणार नाहीं ही त्यांची राष्ट्रीय वृत्ति आर्यसमाजाच्या बहुमोल कामगिरींत दिसून येत आहे असें कोणासही कबूल करावें लागेल.

श्रीनरदेवशास्त्री याच्या मतानें इतकी गोष्ट खरी कीं, त्या काळीं अशाच धर्मसंशोधकाची जरुरी होती स्वदेशाच्या व स्वधर्माच्या अगदीं हीन परिस्थितींत ते जन्मास आले त्यानीं देशास जडलेल्या विकाराचें निदान बरोबर करून औषधयोजनाही अचुक केली. जुन्या रूढ हिंदुधर्मावर कडक टीका करण्यात नवीन धर्ममत स्थापन करण्याचा त्याचा हेतु नव्हता. कारण ते प्राचीनतेचे अत्यंत पक्षपाती होते. त्याचा खंडनमंडनात्मक सारा वाद एकमत व्हावें यासाठीं होता एका भारताच्या उन्नतीनें अखिल जगाचें कल्याण होईल असें मानणारे ते होते त्यासाठींच त्यानीं आर्यसमाज निर्माण केला त्यात सर्व तंत्र सिद्धान्ताचाच सामान्यतः सर्वांस मान्य होणारा भाग अधिक आहे त्यांची वेदानुकूलता सनातनी हिंदूंसही मान्यच होती पण वेदानुकूल कोणतें आणि वेदविरोधी काय याबद्दलच काय तो सारा वाद होता आणि आमच्यामतें या दिसायला तपशिलाच्या व सूक्ष्म वाटणाऱ्या गोष्टींतच सनातनी व आर्यसमाजी यांमधील तीव्र मतभेदाचें बीज सांठविलेलें आहे

मूर्तिपूजा वेदात आहे कीं नाही ? जीवितश्राद्ध आणि मृतकश्राद्ध यांतील वैदिक कोणतें ? अवताराचें वर्णन वेदात आढळतें की काय ? विधवाविवाह आणि नियोग अवैदिक आहेत कीं कसे ? वर्णाश्रमधर्मासबधीं वेदाचा आशय तरी काय ! द्वैत आणि अद्वैत यापैकीं वेदास मान्य कोणतें ? साकारता आणि निराकारता याबद्दल वेद काय म्हणतात ! ब्राह्मणादि ग्रथ आणि मन्वादि धर्मशास्त्रें यात वेदानुकूल भाग कोणता आणि वेदविरुद्ध कोणता समजावा ? असे हे वादाचे मुद्दे होते. ब्रह्मापासून जैमिनीपर्यंत सर्व शास्त्रग्रथ दयानदास मान्य होते असें त्यानीं म्हटलें आहे. पण ह्या मोघम विधानात कोणकोणते प्रसिद्ध आणि अप्रसिद्ध ग्रंथ किती अंशानें मानावयाचे तें ठरवितां येणें सोपें नव्हतें. बरें, सत्य-

निर्णयासाठीं त्यांच्या मतें अखेर निर्णय देणें तर्काकडेच सोंपवावें तर वेदांचें प्रामाण्य तें काय ? बरें, वेदवित्पुरुषाचे तर्क पहावे असें म्हटलें तरी त्यांच्यांत-ही दृष्टिभेद आहेतच. विद्यासभा निर्णायक म्हणावी तर ह्या पंडिताच्या सभा भरवाव्या कोणीं आणि भरल्या तरी त्यांचे निर्णय मानतो कोण ? त्र्यवरा आणि दशावरा परिषदा विधर्मी परराज्यात काय करू शकणार ? असे हे प्रश्न दयानंदां-पुढें होते. त्याचा विचार त्यानी कितपत समाधानकारक रीतीनें लावला ह्याचा विचार पुढें पाहूं

इतकी गोष्ट खरी कीं, प्राचीन स्थितीचें वर्णन, वर्तमान स्थितींतील दोषाचें निराकरण आणि भविष्य काळच्या मार्गाचें दिग्दर्शन, ह्या तिहेरी दृष्टीने दयानंदां नीं आपले प्रयत्न चालविले. त्यानीं प्राचीन आचार आणि शास्त्रप्रणालींचा उद्धार केला, मृतप्राय झालेल्या सस्कारास आपल्या कल्पनेप्रमाणें अगदीं नवीन स्वरूप देऊन कां होईना—जिवत केलें, बालविवाहनिषेध जास्त आचारांत आणला, वेदविद्येच्या शिक्षणाचें द्वार सर्वांस खुले केलें, शिक्षणाची कडक शिस्त सुरू केली, वेदांबद्दल प्रीति आणि रुचि वाढविली, षड्दर्शनाचें त्यानीं आपल्या मतें एकीकरण केलें, चातुर्वर्ण्याची गुणकर्मावर सपादणी केली, सर्वांच्या हातीं वेदसहिता हा एक प्रमाणग्रथ दिला, आणि देशी भाषेंत अनेक ग्रंथ लिहून त्यानीं वेदविद्या सर्वांस सुगम केली. त्याच्या प्रयत्नामुळे कित्येक तरुण नास्तिकांचे आस्तिक बनले आणि कित्येक तर धर्मांतराच्या पापातून बचले. यासबंधीं गेल्या दयानद शताब्दीच्या महोत्सवात कित्येक आर्य पुढाऱ्यानीं जे आपले कबुली-जबाब दिले, ते लक्षात घेण्यासारखे आहेत.

स्वामी श्रद्धानद हे स्वतः ख्रिस्ती होण्याच्या अगदीं तयारींत असतां त्यांस फिरविण्यास स्वामी दयानद अप्रत्यक्षतेनें कारण झाले हें पुष्कळास ठाऊक नसेल पं० गुरुदत्त विद्यार्थी या महा नास्तिकास श्रीमद्दयानंदाच्या अखेरच्या दर्शनानें आस्तिक केलें, असे मानतात. याशिवाय वरील उत्सवप्रसगीं स्त्रीशिक्षणाचे धुरीण सुप्रसिद्ध लाला देवराज म्हणाले कीं, “मी हिंदुधर्मास कुचकामाचा समजत होतों. माझे उस्ताद मला मुसलमानी धर्म शिकवीत. पण स्वामींचीं व्याख्यानें ऐकून माझी स्वधर्मावर निष्ठा बसली.” महात्मा अलखधारी सागतात कीं, “मी ख्रिस्ती होत होतों, पण माझ्या चुलत्यानें मला स्वामींकडे आणलें. आणि मी मग ख्रिस्ती झालों नाहीं.” भारत-सुदशा-प्रवर्तकाचे संपादक म० गणेशप्रसाद आपला अनुभव

कळवितात कीं, "मी रोज शिवाची एकादश पार्थिवलिंगें पूजीत असें; पण स्वामींचा सत्योपदेश ऐकून मी तें वेड सोडलें" लाला गंगाराम तर विलक्षण हकीगत कळवितात कीं, "मीं मुसलमान होत होतों, आणि माझ्याबरोबर लाला लजपतराय पण मुसलमान होणार होते, पण स्वामींच्या उपदेशाच्या प्रभावानें आम्ही बचलों" आर्यसमाजाचे मुकुटमणि शाहपुराधीश सर नाहरसिंहजी म्हणतात कीं, "मला सरकारनें शिक्षक ठेविला होता तो ख्रिस्ती होता त्याच्या शिक्षणानें मी ख्रिस्ती नाहीं–तरी पुरा नास्तिक बनलो होतो परतु स्वामीजींनीं मला नास्तिकाचा आस्तिक बनविले"

येथपर्यंतचें वर्णन सर्व ठीक आहे. प्रत्याक्रमणापर्यंत आर्यांची तयारी आणून स्वामींनी धर्मांतरास आळा घातला, लोकशिक्षणास चालना देऊन जनतेचें अज्ञान दूर करण्यास आरभ केला, विवाहमर्यादा वाढवून आणि ब्रह्मचर्याचे महत्त्व गाऊन त्यांनी विषयासक्तीपासून तरुणांस राखले मद्य, मांस यांचा मोह कमी केला अशा ह्या वरील सर्व वर्णनांत थोडीफार अतिशयोक्ति असली तरी त्याबद्दल कोणी फारसा वाद घालणार नाही तसेंच हें जं कार्य स्वामींनी केले ते कांहीं लहानसहान नव्हे, हेंही कोणी कबूल करील पण याच्यापुढें जाऊन जर त्यांच्या वैराग्याची कोणी थोरवी मागेल तर ती निःसग सनातनी सन्याशास पटेलच असे नाही. त्यान्या ईश्वरभक्तीचें वर्णन महाराष्ट्रीय वारकरी कबूल करणार नाहीत त्याच्या वैदिक निष्ठेबद्दल ब्राह्मादि चिकित्सक शका काढतील त्यांचा प्रामाण्यवाद स्मार्त भागवतास अशास्त्रीय व अयुक्तिक वाटेल. त्याचे अगाध ज्ञान वेदान्ति मानणार नाहीत त्याची यौगिकपद्धति कित्येक पण्डितास हास्यास्पद वाटेल त्याचा अगाध तर्क ः विकास पाखडी दिसेल त्याचें वाक्चातुर्य आणि कोटिक्रम कोणा मितभाषणी आत्मानुभवी पुरुषास तुच्छ वाटेल त्यांच्या सहानुभूतीच्या ठिकाणी परमतअसहिष्णुता कित्येकास आढळून येईल आणि त्यांची वर्णव्यवस्था व्यावहारिक धर्मशास्त्रज्ञांस फोल वाटेल त्यांची शुद्धि कर्मठांस अशुद्ध वाटेल त्याच्या संस्कारशुद्धीकरणास जुने याज्ञिक नसता उपद्याप म्हणतील. या गोष्टींचा आमच्या आर्यमित्रांनीही अर्थात् विषाद वाटू देतां कामा नये कारण, हे सारे प्रामाणिक मतभेदाचे मुद्दे आहेत. यात व्यक्तिद्वेष नसून फार गंभीर विषयासंबधीं केवळ दृष्टिभेद आहे

तसेंच दयानंदांच्या कार्यांची महती सांगत असतांना स्वामींनीं ब्राह्मणी

वर्णव्यवस्थेचा नायनाट केला, त्यांनीं भटशाही बुडविली, त्यांनीं मूर्तिपूजा धुगारून दिली, त्यांनीं गुरुशाही आणि आचार्यशाही नामशेष केली, त्यांनीं स्त्री-शूद्रांस समान हक्क दिले, अथवा त्यांनीं जातपात मोडून एकंकाराचा पाया घातला, असें जर कोणी म्हणूं लागले तर त्यांसही त्यांच्या आर्यमित्रांनीं "जरा सबूर" असेंच म्हणावे लागेल कारण, वरील सर्व गोष्टींबद्दल दयानदांचें खरोखर काय मत होतें, याचा सूक्ष्म दृष्टीनें विचार करणें फार आवश्यक आहे. शिवाय वरील सर्व गोष्टी स्वामींनीं घडवून आणल्या असे जरी मानले, तरी त्यामुळें ते सर्व विचारी माणसांच्या स्तुतीसच पात्र होतील कीं काय, याचाही शातपणें आणि निर्विकार मनानें विचार केला पाहिजे त्याचप्रमाणे दयानदाचें स्वतःचें व्यक्तिमाहात्म्य व थोरपणा मान्य करून किंवा त्याच्या कामगिरीची जाणीव बाळगूनही धर्म-पंथ या दृष्टीने त्याच्या निरनिराळ्या इतरास मान्य न होणाऱ्या काहीं तत्त्वांवर टीका करण्याचा प्रसंग आला असता त्या वेळींही तत्त्वजिज्ञासेकरितां आर्यसमाजानें त्यास पूर्ण स्वातंत्र्य दिले पाहिजे लेखन-भाषणस्वातंत्र्य हा मानवजातीचा एक प्रधान हक्क समजला जातो तेव्हा अशी टीका झाल्यास तिच्यायोगानें दयानदाविषयीं तुच्छताबुद्धि दर्शविण्याचा लेखकाचा उद्देश आहे, असेंही समजण्याचे कारण नाहीं

असो, येथपर्यंत दयानंदाचे गुणवर्णन झाले, तें या भागास पुरेंसे आहे असें वाटते दयानदाच्या अनुयायात आज आपल्याला मोठमोठे लोक आढळून येतात व त्यांनीं आपल्यापरीने आर्यसमाजाची व स्वदेशाची सेवाही श्रेष्ठ प्रकारे केली आहे त्याच्या ह्या सर्व कार्याचे स्वरूप म्हणजेच सध्याचा आर्यसमाज होय त्याची विस्तृत माहिती दुसऱ्या भागात येणारच आहे येथे विषयपूर्ततेकरिता त्याच्या विषयीं थोडक्यात कल्पना दिली असता पुरे होइल

मागें आम्हीं दर्शविलेच आहे कीं, सवाई माधवरावांनीं पेशव्याची गादी चालवावी त्याप्रमाणे दयानंदांच्या पश्चात् जन्मास आलेली—निदान विशेष वाढीस लागलेली—सध्यांची चळवळ आहे श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्या हयातींतच भरत-खंडाच्या चारी दिशांस मठस्थापना करून धर्मराज्याची नाकेबदी केली किंवा समर्थ रामदासांनीं आपल्या हयातींत हजारों सच्छिष्य निवडून काढून हजार दीड हजार मठांवर आपले महंत नेमून समर्थसांप्रदायाचें जाळें साऱ्या देशभर पसरून दिलें तसें दयानदांस कांहींच करतां आलें नाहीं. करतां आलें नाहीं हा

दोष आम्ही त्याच्यावर लादतों असें नव्हे. हा कालगतीचा महिमा असेल किंवा त्याहूनही तसें करण्यास त्यांस पुरेसा अवसर मिळाला नाहीं हेंही कारण जास्त संभवनीय आहे. इ० सन १८६४ सालीं दयानंदांना सार्वजनिक दृष्टीची चाळिशी लागली त्यानंतर उर्णीपुरीं वीस वर्षे त्यांस धर्मसंस्थापनेस मिळालीं खरीं, पण या कालातील त्यांच्या कार्याचे संहारणी आणि उभारणी असे दोन भाग केल्यास, निदान सन १८७५ सालापर्यंत विधायक कार्यास सुरवातच झाली नसल्यामुळें, संहारणीच्या मानानें उभारणीस पुष्कळच अधिक काळ मिळावयास पाहिजे होता, तो त्यांस तितकाही मिळाला नाही. त्यांच्या महत्त्वाकांक्षेच्या मानाने त्यास अकालींच मृत्यु आला! त्यापूर्वी त्यांनीं मोठ्या खटपटीनें कित्येक आर्य-समाज आणि एक मोठी परोपकारिणी सभाही स्थापन केली होती पण सार्व-जनिक कार्यांतील अशा ह्या कार्यकारी सभा आणि संस्था लवकरच कशा नामधारी ठरतात हे वाचकांस ठाऊक असेलच पण त्याबरोबर हा एक ऐतिहासिक चमत्कार दिसून येतो कीं, श्रीरामकृष्ण परमहंस, श्रीमद्दयानंद, ब्रह्मानंद केशव चंद्रसेन असे भारतवर्षांत केंद्रीभूत असलेले महापुरुष जवळ जवळ एकाच सुमारास दिवंगत झाले, आणि त्यानंतर थोड्याच काळात ते एका अमूर्त स्फूर्ति रूपानें पुन्हा जन्मास येऊन त्यापासून पुढें श्रीरामकृष्ण मिशन, दयानंद कॉलेज, राष्ट्रीय सभा अशा कार्यकर्त्या संस्थांस चालना मिळाली पण ज्याप्रमाणें एंजिन जोराचा धक्का देऊन थांबलें आणि प्रत्यक्ष प्रत्यक्ष जोडणारा दुव्वा सुटला कीं, गाडीचे डबे धावत सुटतात मग त्यांनी सायडिंगला कोणच्या बाजूला जावें ह्याची तजवीज साधेवाला करीत असतो डब्यांना गति एंजिन देतें, पण दिशाची प्रेरणा तें करीत नाही असाच काहींसा प्रकार येथेही दिसून येतो वरील अलौकिक पुरुषाच्या विचाराची प्रेरणाशक्ति आणि स्वामी विवेकानंद, लाला साई-दास आणि आनंदमोहन इत्यादि रजोगुणी साधेवाल्यानीं सांप्रदायिक चळवळीच्या गतीला दिलेली दिशा यांतील कार्यकारणसंबंध जुळावा तितका जुळत नाहीं.

आतां हें खरें कीं, दयानंदाच्या महत्त्वाकांक्षी मनात विशाल भारताची कल्पना नांदत होती. आर्यांचें राज्य आणि व्यापारविस्तार देशदेशांतरीं वाढला पाहिजे असें ते नेहमीं म्हणत. धर्मसंशोधनाप्रमाणें सामाजिक आणि राष्ट्रीय उन्नतीचीही त्यांना विशेष आस्था होती. कोणी असेंही मानतात कीं, पाश्चात्य राज्य, पाश्चात्य सहवास, पाश्चात्य [illegible] पाश्चात्य शिक्षणपद्धती, पाश्चात्य विज्ञान आणि विविध साधनें



पं० गुरुदत्त विद्यार्थी

जन्म—इ सन १८६४] [मृत्यु—इ. सन १८९०

यांच्या योगानें त्यांच्या महत्त्वाकांक्षेस एक संमिश्र स्वरूप प्राप्त झालें होतें. त्यांच्या [ सन १८८० च्या ] पहिल्या मृत्युपत्रांत कर्नल अल्कॉट, मॅडम ब्लॅव्हाटस्की, डॉ० बिहारीलाल हीं पाश्चात्य पद्धतीच्या विद्वान्-मंडळीचीं नांवें पुढील कार्यवाहकांत आढळतात. परतु त्यांच्या अखेरच्या मृत्युपत्रांत हीं नांवें गळून राजस्थानांतील सरदार घराण्यांतील नांवे पूर्वी नव्हतीं तीं झळकूं लागलीं. हा फरक महत्त्वाचा आहे पण ह्या दुसऱ्या मृत्युपत्रानंतर दयानद लवकरच वारल्यामुळे, या फरकातील त्याचे खरे उद्दिष्ट लोकानिदर्शनास येण्यास अवसर राहिला नाहीं.

स्वामी दयानदांच्या निर्याणानंतर स्वामी श्रद्धानद, पं लेखिराम, पं० गुरुदत्त, महात्मा हसराज, लाला लजपतराय, भाई परमानद, रामभुज दत्त इत्यादि आर्य-समाजधुरीण म्हणून ज्यांचीं नावे नेहमीं पुढें येतात, त्यापैकीं पं० गुरुदत्त, म० हसराज आणि लाला लजपतराय हे त्रिकूट स्वामीच्या सार्वजनिक चरित्रास आरभ झाला त्याच वेळीं जन्मास आलें पण वरील आर्य पुढाऱ्यांपैकीं कोणासही दयानदाच्या सगतीचा खरा व पुरा लाभ घडलेला नव्हता. स्वामी श्रद्धानदाना फार तर तीनचार वेळा दयानदाचें दर्शन झाले असेल पं० लेखिराम यांस तें एकदाच घडलें. आणि त्याच वेळीं काहीं थोडा सवाद झाला तितकाच प०गुरुदत्त विद्यार्थी यास तर तोही लाभ घडला नाहीं दयानंदाच्या अतकाळीं त्याची दृष्टिभेट झाली तीच पहिली व अखेरची होय! आणि म०हंसराज याना तर दयानदाचें कधीं दर्शनही घडलें नाहीं. पं० गुरुदत्ताना ईश्वरानें दीर्घायु केले असते तर श्रीरामकृष्णाच्या विवेकानंदा-प्रमाणे दयानदाचे विद्यार्थी गुरुदत्त त्रिखडीं गाजले असते दयानदांच्या यौगिक अर्थपद्धतीचे ते मोठे पुरस्कर्ते होते त्यांच्या हातून बरेंचसें शुद्ध व शाश्वत स्वरूपाचें धर्मकार्य होण्याचा सभव होता, पण तो योग आला नाहीं. कारण ते दयानदांनंतर फार वर्षें जगलेच नाहींत त्यांच्या मृत्युसमयीं त्यांची शांत वृत्ति पाहून एकाने त्यास विचारले कीं, आपण या स्थितींतही प्रसन्न कसे ? त्यावर गुरुदत्त म्हणाले कीं, "या शरीरास दयानद होता आलें नाहीं. आतां पुढच्या जन्मीं याहून पवित्र शरीर धारण करून मीही दयानंद होईन !" आज विद्यमान असलेल्या मडळींत लाला लजपतराय,महात्मा हसराज, भाई परमानंद हेच आर्यांचे भीष्म, कृप, द्रोण होत. लालाजींच्या दृष्टीनें स्वदेशाची भावि ऊर्जितावस्था धार्मिक भावना आणि राष्ट्राभिमान यांच्या समन्वयावर अवलंबून आहे. यांच्या

संलग्नतेच्या जो आड येईल त्या पाप्याच्या पापाची कशानेंही निष्कृति होणार नाही असें त्यांचें भविष्य आहे. व त्यांच्या दृष्टीनें आर्यसमाजाचे श्रेष्ठत्वाचें मुख्य रहस्य हेंच होय. हें लालाजींचें सुवर्णगर्भ रसायन धार्मिक जीवनास कितपत आरोग्यवर्धक झालें व होईल ह्याचा निदर्शक एकच सर्वसमर्थ काल आहे ऐतिहासिक लेखकाचा तरी, तोच एक प्रेरक त्यास जें सुचवील तेंच यास लिहावयाचें आहे तेव्हा त्याचा सविस्तर विचार पुढील भागात करू.



# या भागाची कालानुक्रमणिका.

| इ. सन | |
|---|---|
| १७९८ | विरजानदाचा जन्म |
| १८०८ | गृहत्याग. |
| १८१८ | संन्यास. |
| १८२४ | दयानदाचा जन्म. |
| १८३७ | क्रान्तिकारक शिवरात्र |
| १८४५ | गृहत्याग |
| १८४८ | सन्यासग्रहण |
| १८४९ | पजाब सरकारजमा होतो |
| १८५६ | आत्महत्येचा विचार |
| | श्रद्धानदाचा जन्म. |
| १८५७ | भयंकर दुष्काळ नानासाहेबाचे बड |
| १८५८ | राणीसरकारचा जाहीरनामा. |
| १८५९ | प० लेखरामचा जन्म |
| १८६० | विरजानंदाची प्रथम भेट |
| १८६४ | दयानदाच्या सार्वजनिक जीवनास आरभ. |
| ,, | प० गुरुदत्ताचा जन्म. |
| ,, | म० हसराज याचा जन्म. |
| १८६५ | भागवत—पचदशी-खडनाला सुरवात. |
| | लाला लजपतराय याचा जन्म |

| इ. सन | |
|---|---|
| १८६६ | शास्त्रार्थाला सुरुवात. |
| १८६९ | काशीचा शास्त्रार्थ |
| १८७३ | कलकत्त्याच्या ब्राह्मसमाजास भेट. |
| १८७५ | मुबईस पहिल्या आर्य समाजाची स्थापना [ता १० एप्रिल ] |
| | थिऑसफीची न्यूयॉर्कला स्थापना |
| १८७७ | चा२पूरचा तिरगी सवाद. |
| | लाहोरच्या आर्यसमाजाची स्थापना [ तारीख २४ जून.] |
| १८७९ | मॅडम् ब्लॅव्हाटस्की व कर्नल अल्कॉट याची भेट |
| १८८० | दयानदाचे पहिलें मृत्युपत्र. |
| १८८२ } १८८३ } | परोपकारिणी सभेची स्थापना व दुसरे मृत्युपत्र |
| १८८३ | दयानदाचे निर्याण [ ता. ३० आक्टोबर. बलिप्रतिपदा ] |
| १८९० | पं० गुरुदत्ताचा मृत्यु. |

# मुख्य आधार-ग्रंथांची यादी

श्रीमद्दयानद—**सत्यार्थप्रकाश** [ मराठी भाषातर ], **भाष्यभूमिका** [ इग्रजी भाषांतर ]

**संस्कारविधि** [हिंदी], **आर्योद्देशरत्नमाला** [ इग्रजी. ]

श्रीसत्यानद—**श्रीमद्दयानंदप्रकाश** [ हिंदी. ]

श्रीपरमानद—**वैदिक संध्योपासना.** [ मराठी भाषातर ]

श्रीनरदेवशास्त्री—**आर्यसमाजाचा इतिहास** [हिंदी ]–भाग १।२.

लाला लजपतराय—**आर्यसमाजाचा इतिहास** [ इग्रजी. ]

प्रो॰ इद्र विद्यावाचस्पति—**आर्यसमाजाचा इतिहास** [ हिंदी. ]

बाबा छज्जुसिंग—**दयानंदांचे चरित्र व शिकवण**–भाग १।२ व इतर **लहान लहान चोपडी** [ इग्रजी ]

राजरत्न आतमारामजी—**संस्कारचंद्रिका**. [ हिंदी ]

पं॰ चमूपति—**संध्यारहस्य** [ हिंदी ], **दयानंदर्शन.** [ इग्रजी. ]

महात्मा हंसराज –**ऋषिदर्शन.**

**श्रीमद्दयानंद जन्मशताब्दिवृत्तान्त, काशीचा शास्त्रार्थ, ज्ञानकोश, फर्कुहार, आमच्या आयुष्यांतील आठवणी, मनुस्मृति इ०.**